मनोहर ग्रंथमाला प्रकाशन ३२ वें

# रानोमाळ

शिकारीच्या सत्य-कथांचा संग्रह



लेखक :

रा. वि. फडनरे



किंमत २॥ रुपये

# शिकारी वाङ्मय



मराठी वाङ्मय-वृक्षाला अलीकडे दोन नव्या शाखा फुटलेल्या दिसतात. एक ग्रामीण जीवन-वर्णनाची व दुसरी शिकारी व्यवसायाची. या दोनहि शाखांच्या वाङ्मयानें समाजाच्या जीवनाचें अपरिचित ज्ञान मराठी वाचकांना होऊं लागलें आहे. ग्रामीण जीवनवाङ्मय लिहिण्यांत कादंबरीकार रा. दिघे यांनीं अग्रस्थान मिळविलें आहे. त्याप्रमाणें शिकारी वाङ्मयाचा परिचय करून देण्याचें श्रेय रा. फडतरे यांना द्यावें लागेल. रा. फडतरे हे सुमारें वीस-बावीस वर्षांपूर्वी पुण्यास राहत असून त्यांचा एक छापखाना होता आणि सुधारक, राजकारण, व राष्ट्रहितैषी अशीं तीन पत्रें त्यांनीं कांहीं वर्षें चालविलीं होतीं. पुढें हीं तिन्ही पत्रें बंद पडून रा. फडतरे हे पुणें जिल्ह्यांतील पाटस या गांवीं जाऊन राहिले व शेती-भाती करूं लागले. आणि हें करीत असतांच त्यांची शिकारीची हौस प्रगट झाल्यामुळें ते शिकारी बनले. प्रस्तुतचा ग्रंथ त्यांच्या शिकारी अनुभवाचें व वाङ्मयाच्या आवडीचें फळ आहे.

रा. फडतरे हे अशा भागांत राहत होते कीं, त्यांना शिकार करण्याला क्रूर जंगली श्वापदें फार थोडीं मिळत. परंतु लहान श्वापदांच्या शिकारीलाहि मोठ्या श्वापदांच्या शिकारीचीच बहुतेक परिस्थिति लागते. बंदुकीचा नेम मारण्याचें कौशल्य संपादणें, रानोमाळ धावपळ करणें, दबा धरून बसणें, धोका पत्करणें, हाके वगैरे घालण्यास उपयोगीं पडणाऱ्या खेडवळ जंगली लोकांच्या सहवासांत काळ काढणें व त्यांच्याशीं समरस होणें, शिकारीच्या नादांत तहानभूक विसरणें-- या सर्व गोष्टी मोठ्या श्वापदांची शिकार व लहान श्वापदांची शिकार यांना सर्वसाधारणच असतात. या सर्व दृष्टींनीं रा. फडतरे हे अनुभवी व पटाईत शिकारी बनलेले असून त्या व्यवसायाची त्यांना खरी गोडी लागली आहे, हें या पुस्तकांतील त्यांच्या अनुभवावरून वाचकांना दिसून येईल. विशेष गोष्ट ही कीं, निशाणबाजीच्या कौशल्याइतकेंच लेखनकौशल्यहि त्यांना साधलेलें आहे. त्यांच्या प्रत्येक शिकारीचें वर्णन हें एखाद्या चटकदार लघुकथे-प्रमाणें वाटतें. मग ती कथा आनंदपर्यवसायी किंवा निराशापर्यवसायी असो. त्यांची भाषा इतकी समर्पक असते कीं, त्या त्या प्रसंगाचें चित्र ते वाचकांच्या डोळ्यांपुढें हुबेहुब उठवूं शकतात. शिवाय शिकारी व्यवसाय व ग्रामीण जीवन हीं दोनहि प्रगट करणारे त्यांचे शब्द, त्यांची परिभाषा, जिवंतपणाची असून त्यांत ओढूनताणून आणलेले विचार किंवा शब्दप्रयोग कोठेंच नसतात.

खाद्यलालसा पुरविणें हा त्यांच्या शिकारीचा हेतु नसतो, तर ती केवळ एक कला या नात्यानें ते शिकलेले असून, त्या व्यवसायांतील त्यांचा आनंद, हा केवळ कलेच्या आस्वादावर आधारलेला असतो. खेडोपाडीं राहणारे शेतकरी बागाईतदार यांना ही कलेची दृष्टि नसली तरी आपलीं शेतें, बागा, आपलीं पाळीव जनावरें इत्यादिकांच्या रक्षणाकरितां तेहि शिकार करतात. पण त्यांना कोणी शिकारी म्हणत नाहींत, किंवा त्यांच्या व्यवसायाचें वर्णनहि वाङ्मयांत प्रगट होत नाहीं. शिकार यशस्वी करण्याला लागणारी विद्या व धैर्य हीं दोन्ही त्यांच्या जवळ भरपूर असतात. परंतु रा. फडतरे यांच्यासारखा सहकारी लाभल्याशिवाय त्याची ओळख समाजाला कशानें होणार! त्या बिचाऱ्यांच्याजवळ बंदूकहि नसते. हत्यारांच्या कायद्यामुळें खेडोपाडीं असलेलीं जुनीं हत्यारेंहि नाहींशीं झालीं. तथापि रा. फडतरे यांच्यासारखा नागरिक शिकारी बंदूक व काडतुसें वापरणारा संगतीला मिळाला म्हणजे त्यांचीहि शिकारीची हौस जागृत होत असेल यांत शंका नाहीं.

किर्लोस्कर मासिकांत भानू शिरधनकर यांनीं रा. केरकर या नांवाच्या एका बड्या शिकाऱ्याची माहिती वाचकांना प्रथमच करून दिली व ती फार मोलाची वाटते. आमच्या संस्थानिकांपैकीं बऱ्याचजणांना शिकार करितां येतें असें वाटतें. परंतु त्याना लेखनकलेची हौस नसल्यामुळें त्यांचे अनुभव अप्रकाशित राहिले. कसेंहि असो, शिकारी वाङ्मयाचें हें नवें दालन आतां उघडलें गेल्यानें त्यांत दिवसेंदिवस अधिक भर पडेल अशी आशा करण्यास जागा आहे. युद्धप्रसंगाव्यतिरिक्त मनुष्यमात्रांतील क्षात्रवृत्ति प्रगट करण्याला शिकार हें एवढेंच साधन असतें. परंतु हत्यारांच्या कायद्याचा अंमल इतका कृपण व कडक असतो कीं, ज्यांना हत्यारें जवळ बाळगण्याचें द्रव्यसाधन अनुकूल असतें अशाहि लोकांना हत्यार जवळ बाळगणें हें धोक्याचें वाटूं लागलें आहे. नाहीं तर इतर मर्दानी खेळांप्रमाणें शिकारीचा हा खेळहि चालू पिढींतील तरुणांना प्रिय होण्यासारखा असून त्याचा प्रसारहि पुष्कळ झाला असता. सुदैवानें हल्लीं तरुण पिढी लष्करांत जाऊं लागल्यामुळे लुप्त झालेल्या या मर्दानी खेळाचें पुनरुज्जीवन होण्याचा संभव दिसतो. आणि तसें घडून यावें, अशी इच्छा प्रगट करून हा लहानसा परिचय-लेख संपवितों.

— न. चिं केळकर

# अगदीं थोडक्यांत

जवळजवळ दोन तपें मीं केलेल्या शिकारींच्या हकीकतींपैकीं कांहीं थोड्या आज मी पुस्तकरूपानें प्रसिद्ध करीत आहे.

'एक दुर्दैवी घटना' या शीर्षकाखालीं दिलेली हकीगत, मीं माझ्या मुलीच्या स्मरणार्थ – केवळ स्वतःच्या मनाच्या समाधानासाठीं– दिलेली आहे.

हल्लींच्या महागाईच्या दिवसांत, पुस्तकास उत्कृष्ट प्रकारचा कागद वापरून आणि छपाईहि सुंदर करून श्री. मनोहरपंत केळकर यांनीं हें एक प्रकारचें धाडसच निःसंशय केलें आहे. पण, त्यांचें हें धाडस अनाठायीं नसल्याचें लवकरच त्यांच्या प्रत्ययास येईल असा मला पूर्ण भरंवसा आहे.

परमवंदनीय महाराष्ट्रीय पुढारी श्री. रा. तात्यासाहेब केळकर यांनीं, प्रकृति असावी तशी नसतांहि, माझ्या गोष्टी वाचून मला प्रोत्साहन येण्यासारखें परिचयपत्र पुस्तकांत छापण्याकरितां दिलें याबद्दल त्यांचे, आणि प्रकाशक श्री. मनोहरपंत केळकर यांचे आभार मानावेत तितके थोडेच होणार आहेत.

पाटस } लेखक
ता. १५ एप्रिल १९४४ }



# होतकरू शिकाऱ्यांस कांहीं सूचना

१. शिकाऱ्याचा पेहेराव पांढरा किंवा कोणत्याही भडक रंगाचा नसावा. भोंवतालच्या—जंगलच्या—परिस्थितीशीं मिळता असावा. (खाकीच असलेला बरा.) पादत्राण वाजणारें — आवाज करणारें — नसावें.

२. बंदूक—रायफल—नेहमीं साफ करून आणि तेलपाणी देऊन तयार ठेवावी.

३. **निशाण मारणेची प्रॅक्टिस** — अ — एका उंच झाडावर तिरपी कांबीट बांधून तिला एकाद दुसरा नारळ टांगून ठेवावा, व प्रथम छऱ्यांच्या काडतुसांनीं हे वाऱ्यानें हलणारे नारळ फोडावेत. चांगला सराव झाल्यावर, उडत्या पांखरांवरहि नेम मारण्याची प्रॅक्टिस करावी.

**ब** — T च्या आकाराचें, दोन देवद्वारी फळ्यांचें, अडीच ते तीन फूट उंचीचें एक निशाण तयार करावें. या T चा वरचा आडवा दांडा सहा इंच रुंदीचा ठेवावा व साठ-पाऊणशें कदमांवरून त्यावर बक् शॉट्स्‌चा नेम मारावा.

**क** — जमिनीपासून चार फूट उंच असलेल्या एका खांबावर, एक पांच इंची खिळा उभा ठोकावा व त्यावर अडीच-तीन इंच व्यासाची पत्र्याची नळी ठेवावी. शंभर फुटांवरून गोळीनें नेम धरून त्या नळीस भोकें पाडावींत.

वरील टार्जेट् प्रॅक्टिस पूर्ण झाल्यावर शिकारीस जंगलांत निघावें.

आवाज टाकते वेळीं बंदुकीचा दस्ता खवाट्यास नीटपणें दाबून धरावा. बंदूक ढिली राहिल्यास धक्का बसण्याचा संभव असतो.

केव्हांहि आलेली संधि जाऊं देऊं नये. नेम हुकला म्हणून निराश होऊं नये. निशाणबाजीचा सतत व्यासंग ठेवल्याशिवाय आपली चूक लक्षांत येऊन शिकारीच्या खेळांत सुधारणा होणार नाहीं.

आवाज टाकते वेळीं, माऱ्याचा — गोळीचा अथवा छऱ्यांचा — वेग आणि गति, पृथ्वीचें आकर्षण, हवेचा विरोध, सावजाची हालचाल या बाबीहि अवश्य ध्यानांत घेतल्या पाहिजेत.

४. कोणतेंहि फाजील उत्तेजक अथवा मादक पेय शिकारीचे वेळीं घेऊं नये.

५. बंदूक भरलेली असो अथवा खाली असो, बंदुकीच्या नळीचें तोंड – मझल – नेहमीं आकाशाकडे अथवा खालीं जमिनीकडे राहील अशी खबरदारी घ्यावी.

६. शिकारीचे प्रसंगीं वाऱ्याची दिशा कशी आहे तें पहावें. आपल्या अंगावरून वारा लक्ष्यावर वाहता नसावा. शिकाऱ्याचा – बंदुकीचा – वास लागल्यामुळें, सावज सावध होऊन निघून जाईल.

७. शिकारी मत्सरी स्वभावाचा, अनुदार आणि कंजुष वृत्तीचा नसावा. ॲम्युनिशन् – काडतुसें खर्चीं घालतांना 'हिशेबी' दृष्टि कामाची नाहीं. खेळाच्या वेळीं ज्याच्या मनांत 'हिशेब' घोळत असतो तो उत्कृष्ट शिकारी होऊं शकणार नाहीं.

८. शिकार हेरणें, सावजाचा माग सोडविणें, नीर घालणें वगैरे हरएक बाबींची शिकाऱ्यास संपूर्ण माहिती पाहिजे. तसें नसेल तर, हाके, रानकाढे वगैरे शिकारी लोक पुष्कळ वेळां शिकाऱ्याची दिशाभूल करून त्याला फसविण्यास कमी करीत नाहींत.

९. होतां होईतों, शिकार पूर्ण आवाक्यांत– नेटांत किंवा बंदुकीच्या टप्प्यांत आल्याशिवाय आवाज टाकूं नये. लांब पल्ल्यावर असलेल्या सावजावर आवाज टाकणें म्हणजे खेळाचा चुथडा करणें होय.

१०. बरोबरच्या शिकारी लोकांस, हाक्यांस आणि मदतानिसांस राजी ठेवावेत, पण त्यांचा आगाऊपणा अथवा चढेलपणा बिलकुल चालूं देऊं नये. त्यांस शिस्तींत वागवावेत. शिकार मनाजोगी झाल्यावर शिकारी लोकांस त्यांच्या मेहनतान्याशिवाय चांगली बक्षिसी द्यावी.

११. जेथें मनुष्यांस शिरतां येत नाहीं, किंवा फराहि धरतां येत नाहीं, अशा जंगलाच्या दाट अडचणीच्या भागांतून आणि जाळ्या-खोपांतून श्वापदांस उठविण्याकरितां, भूक टाकण्यास शिकविलेलीं लहान लहान तल्लख कुत्रीं शिकाऱ्यानें अवश्य पाळावींत.

**घोड्यावरची डुकरांची शिकार—**

१२. ही शिकार फार खर्चाची आणि जिवावरची आहे. या शिकारीकरितां घोडे उत्कृष्ट ट्रेन केलेले, सरावलेले आणि बिनबुजार असावे लागतात. स्टिकांचे

दोन-तीन जादा सेट जवळ पाहिजेत. हाके, बावटेवाले ( फ्लॅग्ज्मेन ) वगैरे शिकारी लोक आपापल्या कामांत तरबेज असावे लागतात. एक दोघे हुशार वॉचमेन सावधगिरीनें आणि सशस्त्र असे— विशेष प्रसंगाकरितां, टेहेळणीसाठीं गाजावाजा होऊं न देतां, खेळावयाच्या मैदानासभोंवार फिरते ठेवावेत. प्रथमोपचाराचें साहित्य, अवश्य तीं औषधें, बॅन्डेज् वगैरे सज्जड तयारी पाहिजे. जमिनीस भळी असल्यामुळें आणि शिकारी, सावज उठल्यावर बेभानपणें सावजामागें कुदत असल्यामुळें, घोड्याचा पाय भळींत शिरून अपघात होण्याचा फार संभव असतो.

१३ सिंह, हत्ती, गेंडे वगैरे श्वापदांच्या बड्या शिकारींचे प्रसंग मध्यम स्थितींतल्या सामान्य शिकाऱ्यास बहुतकरून दुष्प्राप्य ! मुरलेले, पूर्ण तरबेज आणि सधन अशा शिकाऱ्यांसच या शिकारी खेळणें शक्य असतें, म्हणून त्यासंबंधीं माहिती येथें दिली नाहीं.

**किरकोळ**—जखमी झालेलें सावज जिवावर उदार होऊन शिकाऱ्यावर बेजरबपणानें तुटून पडतें. जखमी वाघ कोठें तरी अडचणींत दबा धरून बसतो, आणि शिकारी गद्दाळ असल्यास फार लांबून किरण घेऊन शिकाऱ्या-वर झेप घालतो.

हरणें, डुकरें, लांडगे, वाघ, सिंह, गवे वगैरे श्वापदांचे मुखवटे तयार करून घ्यावयाचे असल्यास, त्या त्या श्वापदांचीं शिरें तावडतोब कापून चांगल्या टॅक्सि-डर्मिस्ट्कडे द्यावींत. पुण्यास कॅन्टोन्मेंटमध्यें मेन स्ट्रीटवर व मुंबईस फोर्टमध्यें उत्कृष्ट टॅक्सि-डर्मिस्ट्स आहेत.

हरण–रु. १५; डुक्कर–रु. ३५; लांडगा–रु. १५; वाघ–रु. ३०; सिंह–रु. ४०; गवा–रु. ५० ते ८० याप्रमाणें मुखवटे तयार करून घेण्याचे अनुक्रमें दर आहेत.

# रा नो मा ळ

| अनुक्रम | | पृष्ठ |
|---|---|---|
| १ एक दुर्दैवी घटना | ... | १ |
| २ पंकमग्नौ व्याधौ | ... | ११ |
| ३ माळवाडीचा दादा ! | ... | १८ |
| ४ देऊळगांवच्या शिवारांत | ... | २३ |
| ५ अग्रहार | ... | ३० |
| ६ एका दगडानें तीन पक्षी ! | ... | ३२ |
| ७ गिरीमच्या वाघळ्यांतील तीन दिवस | ... | ३५ |
| ८ कष्टसाध्य शिकार | ... | ४५ |
| ९ पाडस | ... | ५२ |
| १० घोड्यावरची डुकरांची शिकार | ... | ६२ |
| ११ अतितृष्णा न कर्तव्यम् ! | ... | ७१ |
| १२ रक्तरंगील रंगपंचमी | ... | ७४ |
| १३ ...पूर संस्थानांतील वाघाची शिकार | ... | ८२ |
| १४ एक प्रेक्षणीय सामना | ... | ८८ |
| १५ विंध्याचलाच्या पायथ्याशीं | ... | ९२ |
| १६ लोहगडच्या जंगलांतील वाघाची शिकार | ... | ९७ |
| १७ चित्त्याची शिकार | ... | १०० |
| १८ शौकीन शिकाऱ्याचा शोकपर्यवसायी शेवट ! | ... | १०५ |
| १९ 'गोमेनी'च्या जंगलांतील सिंहाची शिकार | ... | ११५ |
| २० माझी आफ्रिकेंतील दुसरी शिकार | ... | १२० |
| २१ माझी आफ्रिकेंतील तिसरी शिकार | ... | १३१ |
| २२ पाणघोड्यांची शिकार | ... | १३९ |

# एक दुर्दैवी घटना : : १

घराजवळील नवीन विहीर पाडते वेळीं स्थापन केलेली 'मंगल मूर्ति' आज बरेच दिवस उन्हांत तळपत असल्यामुळें, मीं एक लहानसेंच पण सुंदर देवालय बांधून त्यांत त्या संगमरवरी गजाननाची पुनरपि प्रस्थापना केली; आणि घराच्या व देवालयाच्या प्रशस्त आवारांत पुष्कळ खर्च करून उत्कृष्ट बगीचा तयार केला. हरतऱ्हेचीं फुलझाडें व फळझाडें पुण्याहून नेऊन मीं माझ्या बगीचांत लाविलीं होतीं; कांहीं जुने वृक्षहि त्या ठिकाणीं होते.

मुलांबाळांसह माझे दिवस तेथें मोठ्या आनंदांत जात होते. रानांतील रंगीबेरंगी सुंदर पक्ष्यांनीं सर्व सुखसोई पाहून तेथें वास्तव्य केल्यामुळें माझ्या कुटुंबीयांचा आणि माझा आनंद द्विगुणित होत होता. कावळ्यांचीं पांच-चार जोडपींहि तेथें वस्तीस येऊन राहिलीं.

दुष्टांचा सहवास प्राणिमात्रास दुःखदच व्हावयाचा. शेजारधर्माची ओळखहि नसल्यामुळें, कावळ्यांनीं त्या बिचाऱ्या सुंदर पक्ष्यांच्या घरट्यांतील अंडीं आणि त्यांचीं सुकुमार पिलें मारून खावींत आणि मासकंडाचे तुकडे आणि हाडकें जिकडे तिकडे विखरावींत असा त्यांचा क्रम सुरू झाला. इतक्यानेंहि न भागतां, त्या कावळ्यांनीं बनविलेल्या बाभळीच्या आणि इतर काट्यांच्या कोट्यांचे काटे वाऱ्यानें इतस्ततः पसरावेत; मुलांस ते बोचूं नयेत म्हणून मीं वेचावेत अथवा वेचवावेत हा माझा नित्याचाच व्यवसाय होऊन बसला. कित्येक वेळा त्यांचीं झाडांवरील कोटीं काढून टाकलीं तरीहि ते आपली मिरासदारी सोडीनात. विधिघटना अटळ म्हणूनच कीं काय, या उपाधीला कंटाळून, त्यांस मारून टाकण्याची कल्पना माझ्या मनांत अखेर ठाम झाली.

ता. २५ जूनचा तो बुधवार उगवला आणि उजाडतांच मीं पांच-चार कावळे तर फटकावले.

पाटसास दोन मोठे सरकारी तलाव आहेत. त्यांचा गाळपेरीचा लिलांव दरसाल होत असतो. त्या सालीं मीं तो घेतला होता. अवेळीं पाऊस झाल्यानें

पुढें तलावांतील तें बहुतेक पीक बुडालें. कडेकडेचा कांहीं माल हातीं लागला तो तलावाच्या पाळीवर काढून टाकला होता तो वाहून आणण्याकरतां घरच्या व कांहीं भाड्याच्या गाड्या लावाव्या अशा हेतूनें मी आसपासच्या वस्तीवर गाड्या पाहण्याकरतां गेलों होतों.

उन्हांतून हिंडून आल्यामुळें आणि कावळेहि आतां पांगले असल्यामुळें मी घरांत जाऊन जरा लवंडलों होतों. दरम्यान थोडा वेळ जातो न जातो तों, बरेच कावळे आपल्या भाईबंदांसह जमून येऊन तेथें कलकलाट करावयास लागले. मीं बंदूक भरली आणि कावळे दिसत असलेल्या विहिरीजवळच्या कलमी आंब्याच्या झाडावर, जाईचे ताटव्याआडून आवाज टाकला.

कावळा आणि 'दुसरें कांहीं तरी' झाडावरून पडलेलें मला लांबून दिसलें. मोटकऱ्याचें गोधडी-कपड्यांचें झाडावर ठेविलेलें बोचकें पडलें असावें अशी कल्पना मनांत येऊन पुढें झालों तों, त्या उंच पाटाच्या आड, 'छबू' नांवाची माझी नऊ वर्षांची मुलगी, डोक्यांतून छर्रे आरपार गेल्यामुळें रक्तानें न्हालेली अशी दिसली !

शरीरांतील रक्त गोठून गेल्यामुळें का सर्वांगांतील रक्ताचा थेंबन् थेंब नाहींसा झाल्यामुळें— काय असेल तें असो— माझ्या हातची बंदूक गळून पडली. जवळच असलेला माझा चार वर्षांचा मुलगा, तो भयंकर प्रकार पाहून, बहिणीस चिलगून रडावयास लागला तेव्हां माझ्या डोळ्यांवरची झापड उडाली आणि मीं मुलीस उचलून मांडीवर घेतलें. थोडें पाणी आणावयास गड्यास सांगितलें, इतक्यांत माझी बायकोहि तेथें आली आणि– आणि... पण काय उपयोग !

दोन मिनिटेंच तिच्या छातींत किंचित् धुगधुगी होती आणि नंतर सर्व संपलें ! माझ्या पोटच्या त्या चिमण्या जीवाची हत्या मजकडून घडली !

हें कसें झालें ?

छबूची वेणी घालून तिची आई घरांत कशाकरतां तरी गेली होती, आणि हरी छबूला स्नानाकरतां पाणी काढीत होता. विहिरीजवळचीं कलमी आंब्यांचीं झाडें नव्या कोंवळ्या पालवीनें कमालीचीं डवरलीं होतीं आणि त्यांतील एका झाडावर कावळ्याचें कोटें होतें. झाडें लहान रोपटींच असून, चढावयास सोपीं होतीं. "तात्या सकाळपासूनच कावळे मारीत आहेत, मी तें झाडावरील

कोटेंच काढून टाकतें" म्हणून पाणी काढीत असतांच, आणि हरी 'छबूताई' 'छबूताई' म्हणून हाका मारीत असतांच, ती झाडाकडे पळाली.

नजर वर लावून, कोट्याच्या काट्यांचा एकेक फनगडा काढून खालीं टाकीत असल्यामुळें, तिचा काळस्वरूपी बाप तिला दिसला नाहीं ! आपल्याच नादांत रंगून गेल्यामुळें, गाड्या पाहावयास गेलेला आपला बाप परत आल्याची चाहूल तिला लागली नाहीं !

त्या गेंददार झाडाचे आंतील आपलें अस्तित्व बाहेरच्यास एकाएकीं दृग्गोचर होणार नाहीं याचीहि जाणीव त्या चिमुकल्या जीवास खचितच नव्हती ! !

—आणि तिची घटका पुरेपूर भरून आलेली असल्यामुळें—बंदूक भरून निघालेला मी, हरीचे अंगावरून निघून जात असतां—दुर्लक्ष झाल्यामुळें, त्यास दिसलों नाहीं आणि त्याच्याकडूनहि मला आगाऊ सावधगिरीची सूचना मिळूं शकली नाहीं ! !

पण मी एवढा वयस्क !

पशु असो, पक्षी असो; जेथें सावजाचें अस्तित्व, तेथें मनुष्याचें अस्तित्व संभवत नाहीं, ही एकच गोष्ट गृहीत धरून, हलगर्जीपणानें मीं बेलाशक आवाज टाकावा काय ?

कोटें काढून टाकीत असतां, तिला टोचावयास जात असलेले कावळेच तेवढे मला हतभाग्याला बाहेरून दिसले!

× × ×

घडलेल्या प्रकाराची वर्दी गेटावर देण्याकरितां गांवांत पाठविलेला मनुष्य कांहीं वेळानें परत आला आणि कॉन्स्टेबल शेजारच्या गांवीं कांहीं कामगिरीवर गेलेला असल्यामुळें, हेड कॉन्स्टेबलच दौंडास पोलिस कचेरींत जाण्यास निघाल्याचें त्यानें सांगितलें; आणि दौंडहून पोलिस सब् इन्स्पेक्टर येईपावेतों कोणत्याहि क्षुल्लक बाबतींत देखील बदल न करण्याबद्दलची त्याची ताकीदहि त्यानें मला सुनावली.

दोन प्रहरीं पोलिस सब् इन्स्पेक्टर आपल्या परिवारासह येऊन दाखल झाले आणि प्रथम सांत्वनपर चार शब्द माझ्याशीं बोलून ते पुढील उद्योगास

लागले. पंचनामा, माझ्या बायको-मुलांचे, कांहीं गडीमाणसांचे जबाब आणि अवश्य असलेल्या इतर शेजारीपाजारी साक्षीदारांचे जाबजबाब होतां होतां संध्याकाळ झाली. माझ्या मुलीचा प्राण हरण करणारें तें मोकळें काडतूस पुराव्याकरितां पाहिजे होतें. बंदुकींत असलेलें दुसरें भरलेलें काडतूस काढून टाकिते वेळीं, मीं उडालेल्या काडतुसाचें टरफल सकाळीं कुठें तरी फेकलें होतें. पुष्कळ तपास करूनहि तें काडतुसाचें टरफल सापडेना. सकाळीं उडविलेल्या इतर काडतुसांचीं टरफलेंहि जाग्यावर राहिलेलीं नव्हतीं. "तें मिळालेंच पाहिजे" असें इन्स्पेक्टरांचें म्हणणें पडल्यावरून, मीं आणि इतरांनीं तें धुंडण्यांत बराच वेळ घालविला; पण तें कांहीं मिळेना. शेवटीं उद्वेगानें, 'मी आणखी एक आवाज काढून त्याच नंबरचें काडतूस तुम्हांस दिलें तर नाहीं का चालणार?' असें म्हणतांच आलेलें हसूं मोठ्या प्रयत्नानें दाबून—आणि आपले आधींच मोठे असलेले डोळे आणखीच विस्फारून, "मी एरवीं येतों तसा आज आलेला नसून, पोलिस अधिकारी या नात्यानें आपलें कर्तव्य बजाविण्यास आलों आहे, हें तुम्ही विसरलां काय?" असा त्यांनीं मला सवाल टाकला. यावर मी कांहीं उत्तर देणार तोंच, माणकू नांवाचा म्हातारा माळी आमच्या शेजारींच राहत असे, तो त्याच्या नातवानें खेळावयास घेतलेलें रिकामें काडतूस घेऊन तेथें आला. कोलंबसास अमेरिका सापडल्यानेंहि झाला नसेल इतका आनंद त्या दुःखद प्रसंगींहि मला झाला. बरीच मंडळी कांहीं तरी शोधीत आहेत असें त्यास वाटल्यावरून त्यानें पूसतपास केली आणि नातवाच्या हातीं तें दिसतांच तो मोठ्या लगबगीनें तें घेऊन आला होता.

'पोस्ट मॉर्टेम्'करितां पुण्याच्या 'ससून हॉस्पिटल'मध्यें जाणें आतां प्राप्त होतें. नारायण बेटांत येरझाऱ्या करणाऱ्या मोटारींपैकीं एकादी मिळाल्यास पाहावी म्हणून केडगांव स्टेशनवर मीं मनुष्य पाठविला होता. मोटार घेऊन तो आला तों बरीच रात्र झाली होती. दोन कॉन्स्टेबलांसह आम्हां सर्वांची रवानगी पुण्यास केल्यावर, सब् इन्स्पेक्टर गेटावर निघून गेले. जातांना 'पुण्याहून आल्याबरोबर एकंदर हकीकतीचा रिपोर्ट मला द्या' म्हणून ताकीद देण्यास ते विसरले नाहींत.

मोटार हलली त्यासरसें माझें अंतःकरणहि हदरून गेलें. मळ्यांत माझी बायको आणि लहान लहान मुलें यांशिवाय जवळचा माझा सुहृद् असा

कोणी नव्हता. गडीमाणसें पुष्कळ होतीं, पण उगाचच भेदरल्यासारखीं होऊन तीं चोरासारखीं वावरत होतीं. गांवांतील हमेशा येणाऱ्या एक दोन बाया कांहीं ना कांहीं कारणानें आज या बाजूस फिरकल्या नव्हत्या. स्वयंपाकास एक बाई येत असे, ती परगांवीं असलेल्या आपल्या लेकीच्या बाळंतपणाला नेमकी याच वेळीं निघून गेली.

हरीनें आपल्या आईकडून भातपिठलें करवून घेऊन आपल्या घरींच नेऊन, माझ्या मुलांस जेवूं घातलें होतें.

पोलिस मंडळीस आणि मला त्यानें दोन वेळां चहा करून दिला होता. आपले मालकिणीसहि त्यानें दोन्ही वेळां चहा घेण्याबद्दल म्हणून पाहिलें; पण तिनें नकार दर्शविल्यामुळें त्याचा नाइलाज झाला होता; आणि आज मला तिच्यापुढें जाण्यास धीर होत नव्हता.

आज आख्ख्या दिवसांत तिच्या पोटांत पाण्याचा थेंबहि गेला नव्हता. पुण्याहून परतण्यास मला दुसऱ्या दिवसाची संध्याकाळ होणार होती, आणि तोंपावेतों तिनें अन्नपाणी न घेतल्यास कसें ? वगैरे विचारांनीं माझ्या डोक्यांत काहूर उठविलें होतें.

बुरबुर सुरू झाल्यामुळें मोटार संथपणें चालली होती. हवेंत आतां चांगलाच गारठा आला होता. चौफुल्यापाशीं मोटार थांबतांच मोटार-ड्रायव्हर व कॉन्स्टेबल खालीं उतरले आणि त्यांनीं भय्यास चहा फर्माविला. मुलीच्या त्या निर्जीव शरीराकडे सारखें बघत बसल्यामुळें तिच्या बालपणांतील अनेक आठवणींनीं माझें हृदय पिळवटून निघालें होतें. आतांपर्यंत मोठ्या विवेकानें डोळ्यांना घातलेला बांध अगदीं फुटण्याच्या बेतांत आल्यामुळें, माझ्याबरोबर-च्या कामगार रामोशास आणि गड्यासहि मीं चहाच्या निमित्तानें माझ्यापासून दूर केलें.

मध्यरात्रीच्या सुमारास हॉस्पिटलच्या आवारांत येऊन आम्ही दाखल झालों. 'पोस्ट मॉर्टेम्' रूममध्यें टेबलावर तिला ठेवून जड अंतःकरणानें गांवांत आमच्या बंधूंच्या घरीं गेलों. उजाडतांच माझे दोघे बंधु व एकदोघे स्नेही असे आम्हीं हॉस्पिटलमध्यें येऊन हजर झालों. अकरा-साडेअकराच्या सुमारास दहनाकरितां मुलीस आमच्या स्वाधीन करण्यांत आलें आणि पोलिस-कचेरींत हजर करण्याकरितां अवश्य असलेला दाखलाहि मला देण्यांत आला.

स्मशानांतील एकंदर विधि उरकल्यानंतर पुढील सर्व तजवीज करण्याबद्दल माझ्या बंधूंस सांगून पाटसास परतलों, तों दिवेलागणीचा सुमार झाला होता. वेशींत शिरतांच प्रथम मुलकी पाटील भेटले; त्यांनीं त्या दिवशीं माझ्या पश्चात् घडलेला एकंदर प्रकार मला सांगितला. हरजीराव यांनीं, 'तुम्हीं जाणून-बुजून—कायद्याच्या भाषेंत बोलावयाचें म्हणजे सहेतुक– मुलीचा खून केला,' अशा आशयाचा अर्ज कालच्या रात्रींच फौजदारांकडे देऊन त्याची नक्कल पुण्यास डि. पोलिस सुपरिंटेंडेंट यांच्याकडे टपालानें रवाना केल्याचेंहि त्यांनीं सांगितलें. गुरुवारीं उजाडतांच पो. इन्स्पेक्टर, हरजीराव, त्यांचे दोघे दोस्त व पोलिस पाटील यांसह मळ्यांत जाऊन त्यांनीं पुन्हा जाबजबाब घेतले. हरजीराव यांचा एक मळा माझ्या मळ्यास लागूनच आहे. त्यांच्या सांगण्यावरून त्यांच्या खंडकऱ्याचा जबाबहि घेण्यांत आला. पण हरजीरावांचें उद्दिष्ट साधण्यासारखें त्यांत कांहींच निष्पन्न झालें नाहीं.

पोलिस इन्स्पेक्टरांनीं अच्युत नांवाच्या माझ्या चार वर्षांच्या मुलाचा जबाबहि घेतला, आणि त्यावर हरजीरावांची आणि पोलिस पाटलाची सही घेतली. माझ्या लहानग्या मुलाच्या जबाबानें बापूसाहेब इनामदार मनांत चूर होऊन गेला.

हरजीराव ऊर्फ बापूसाहेब हे तेथील एक कर्तबगार इनामदार आणि वतनदार होते. त्यांच्या-माझ्यामध्यें असलेली अदावत अलीकडे कळसास पोंहोचली होती.

पाटस हा गांव मूळचा शिंदे सरकारचा. राज्यकारभाराच्या सोईसाठीं हिंदुस्थान सरकारनें तो आपणाकडे घेऊन, त्याच्या बदला संस्थानास जोडून कांहीं मुलूख शिंद्यांस देण्यांत आला होता. तेथें असलेल्या प्रसिद्ध नागेश्वराच्या देवालयास पूर्वीच्या अमदानींत शिंदे सरकारकडून मोठी नेमणूक आणि इनाम मिळालें होतें, आणि ब्रिटिश राजवटीसहि करारान्वयें तें चालविणें बंधनकारक असल्यामुळें, आजतागायत तें निर्वेधपणें चालूच आहे. सदर देवालयाचे हरजीराव हे सरपंच असून, कांहीं वर्षें तेथील को-ऑपरेटिव्ह क्रे. सोसायटीचे आणि ग्रामपंचायतीचे चेअरमनहि तेच होते, आणि पुणें डि. लो. बोर्डांत भिमथडी तालुक्यातर्फें मेंबर म्हणूनहि ते निवडून आले होते. त्यांच्या खट्याळ स्वभावामुळें, सरकारी अधिकारीहि त्यांस थोडेफार वचकून असत. माझ्या पाटस

येथील वास्तव्यामुळें, आपलें गांवावर असलेलें वजन घटलें आहे आणि आपल्या महत्त्वास ओहोटी लागत चालली आहे असा गैरसमज त्यांनीं करून घेतल्यामुळें, ते माझा व्यर्थ द्वेष करीत असत.

पाटलांच्या तोंडची हकीकत ऐकतांच माझें मस्तक सुन्न होऊन गेलें.

गेटावर फौजदारास पुण्याच्या हकीकतीचा रिपोर्ट देण्यास निघालों तों पेठेला एका दुकानांत हरजीराव, कांहीं उदमी मंडळी आणि हरजीरावांचे कांहीं दोस्त गप्पा छाटीत बसलेले दिसले. त्या उंच दुकानाच्या पायऱ्या चढून मी हरजीरावांसमोर जाऊन उभा राहिलों. माझ्या अंगाचा नुसता तिळपापड उडून राहिला होता. "तुम्हीं इतके अधम असाल असें मला वाटलें नव्हतें. हिंदुस्थानांत आणि ब्राह्मण जातींत मी जन्मास आलों म्हणूनच तुम्ही आज जिवंत राहूं शकतां. माझ्याऐवजीं एकादा साहेब असता तर तुमच्या डोक्याच्या केव्हांच ठिकऱ्या उडाल्या असत्या !" इतकेंच बोलून मी दुकानाच्या पायऱ्या उतरलों आणि गेटावर जाऊन फौजदारांस भेटलों. फौजदारांनींहि मला, मजवर झालेल्या अर्जाची दखल दिली आणि पुढें घडलेला वृत्तांत थोडक्यांत सांगितला. "आणखीहि एक अर्ज मजवर होण्याचा संभव आहे," असें बोलून त्यांच्या स्वाधीन मीं दाखला केला आणि त्यांची परवानगी घेऊन घरीं जाण्याकरितां निघालों.

बाहेर अंधार मिट्ट पडला होता. घराच्या ओढीनें, पावलांना पंख फुटल्याप्रमाणें मी झपाझप रस्ता काटीत होतों. घरांतील परिस्थितीचें चित्र डोळ्यांपुढें उभें राहिल्यामुळें मनांत कालवाकालव सुरू होती. घराच्या वळणावर आलों असेन नसेन, इतक्यांत कोठें तरी भटक्या मारीत असलेल्या 'डॅन्'नें मला पाहून माझ्या अंगावर झेप घेतली आणि लडिवाळपणानें तोंड चाटून, तोंडानें विशिष्ट शब्द करीत, जणूं काय मजबद्दल सहानुभूतीच व्यक्त केली.

फाटकांतून आंत शिरतांच माझी नजर त्या आंब्याच्या झाडाकडे गेली. जें दिसूं नये असें मला वाटे तेंच तें कालचें दारुण दृश्य, तसल्या अंधारांतहि तेथें मला स्पष्ट दिसलें. कोणी तरी खेचून नेल्यासारखा मी तिकडे गेलों आणि झाडाखालच्या पाटावर बसलों. माझें भारावलेलें अंतःकरण थोडें हलकें झाल्यासारखें मला वाटलें. मिनिट दीड मिनिटच अशा स्थितींत मी बसलों असेन, इतक्यांत झाडावरून कांहीं तरी माझ्या अंगावर पडलें. त्यासरशीं माझ्या

डोक्याची टोपी खालीं पडली आणि मानेस कोणी तरी ओरखडल्याचा मला भास झाला. खिशांतली काड्यांची पेटी काढून मीं काडी शिलगावली आणि पाहतों तों, एक मेलेला कावळा माझ्या पायांशीं पडलेला दिसला. निमिषार्धांत माझ्या डोक्यांत एक कल्पना चमकून गेली. काल सकाळींच छर्रे लागून तो त्या आंब्याच्या दाट डहाळ्यांत अडकून राहिला होता. वाऱ्यानें फांद्या सलावून अगदीं अलगलेला तो कावळा केवळ योगायोगानेंच या वेळीं माझ्या डोक्यावर पडला. खालीं घसरतांना त्याच्या पायांच्या नख्या लागून माझी मान ओरखडली गेली. "तात्या अजून आले नाहींत का?" असे कोणी तरी मोठ्यानें उच्चारलेले शब्द माझ्या कानांवर पडले आणि मी भानावर आलों. इतका वेळ झाडाखालीं करीत बसलेल्या चाळ्यांची माझी मलाच लाज वाटली आणि मी घराकडे जाण्यास निघालों.

× × ×

क्षुब्ध अंतःकरणानें मी घरांत पाऊल ठेविलें. जिकडे तिकडे उदासीनता पसरली होती. मला पाहतांच आज दोन दिवस दाबून ठेविलेला दुःखाचा आवेग सहन न झाल्यामुळें माझ्या पत्नीनें एक दीन हंबरडा फोडला. सुकलेल्या धोतऱ्याच्या फुलासारखा तिचा चेहरा ओढून गेला होता. तिचें सांत्वन करण्यास मजपाशीं शब्दच उरले नव्हते. मुलांची उल्हासयुक्त चिलबिलहि आज अगदीं बंद पडली होती, आणि साऱ्या जगांतील कारुण्य तिथें एकवटल्यासारखें झालें होतें.

× × ×

पुढें चार दिवसांनीं जामीन देण्याबद्दल मजवर हुकूम बजाविण्यांत आला. इं. पी. कोडाच्या ३०२ व कलमान्वयें 'मनुष्यवधा'चा आरोप मजवर ठेवण्यांत आला होता.

वकीलबिकील देण्याची यावत्कालपर्यंत मीं कांहीं एक तजवीज केली नव्हती. वकिलापेक्षां मींच मांडलेली वस्तुस्थिति मॅजिस्ट्रेटच्या मनावर जास्त परिणाम करील असें मला वाटे. तसें न झाल्यास, आणि मला सजा झाल्यास, ती इष्टापत्तीच वाटण्यासारखी माझी मनःस्थिति त्या वेळीं झाली होती.

माझ्या वडील बंधूंनीं, 'झालें इतकें पुष्कळ झालें' म्हणून पर्यायानें माझी

कानउघाडणी केली आणि स्वतःच वकिलाची आणि पुराव्याची सर्व तजवीज केली. प्रत्येक तारखेस ते पुण्याहून येऊन, दहा-बारा साक्षीदारांसह मला पुढें घालून नेत.

दोन-तीन तारखा झाल्यानंतर मॅजिस्ट्रेटसाहेबांनीं गुन्ह्याच्या जागीं जाऊन 'सिच्युएशन्' पाहण्याचें ठरविलें आणि एक दिवस पाटसास येऊन ते 'सिच्यु-एशन' पाहूनहि गेले.

सर्व साक्षीदारांच्या साक्षी वगैरे होण्यास आणखी कांहीं तारखा झाल्या. आतां फक्त आरोपीची म्हणजे माझी जबानी होण्यावर शेवटची तारीख होती.

माझे बंधु पुण्याहून नेहमींप्रमाणें आले होते. तारखेच्या दिवशीं मला एका-एकीं चांगलाच ताप भरला आणि अंगहि मनस्वी ठणकावयास लागलें. माझ्या बंधूंनीं निरुपायानें वकिलास तशी तार देऊन आम्हीं अशा अशा कारणामुळें येत नसल्याचें कळविलें.

तिसरे दिवशीं आम्हीं मॅजिस्ट्रेटपुढें हजर झालों. भेदक दृष्टीनें मजकडे पाहून, "परवां तुमची तारीख होती आणि तुम्ही आज उगवलां आहां! तुमच्यावर कोणत्या कलमाखालीं आरोप आहे याची जाणीव तुम्हांस आहे ना?" असें त्यांनीं मला म्हटलें. मीं 'तार केली होती' हे शब्द पुटपुटल्या-सारखें करून स्तब्ध उभा राहिलों. 'थोड्या वेळानें तुम्हांस पुकारतों', असें म्हणून मॅजिस्ट्रेट आपल्या कामांत गढून गेले.

सरासरी पाऊण-एक तासानें मला पुकारण्यांत आलें. माझ्या वकिलास त्यांनीं प्रथम बोलाविलें, आणि 'तुमची फी तुम्हांस मिळाली ना? तुमची आतां विशेष गरज नसल्यानें तुम्ही आपला दुसरा उद्योग बघा,' असें सांगितल्यावरून माझे वकील निघून गेले.

एकाएकीं माझ्या घशास कोरड पडली आणि माझ्या पायांखालची जमीन निसटून गेल्याचा मला भास झाला.

मी पिंजऱ्यांत उभा राहिलों. वहिवाटीप्रमाणें नांव, गांव, जात, उमर वगैरेची विचारणा झाल्यानंतर मला एकहि प्रश्न विचारण्यांत आला नाहीं. सरासरी अर्धा तास मी चित्रासारखा तटस्थ उभा होतों, आणि मॅजिस्ट्रेट-साहेबांचा हात मात्र सरासर चालला होता. शिरस्तेदारहि हनुवटीस बोट

लावून, एकदा माझ्याकडे आणि एकदा साहेबांकडे पाहत वेळ काढीत होते. मला या प्रकाराचा कांहीं बोधच होईना!

मॅजिस्ट्रेटसाहेबांनीं लिहून झालेले कागद शिरस्तेदाराच्या हातीं दिले, आणि 'माझी जबानी' मला वाचून दाखविण्यास फर्माविलें!

जबानी ऐकून मी तर चकितच झालों. माझ्या वकिलाला अथवा मला, इतका सुंदर 'डिफेन्स' खचित देतां आला नसता.

"आणखी कांहीं सांगावयाचें आहे काय?" एवढा एकच प्रश्न मॅजिस्ट्रेट-साहेबांनीं मला शेवटीं केला. मी 'नाहीं' म्हणतांच, "तुम्हांस दोषमुक्त केलें आहे; तुमची बंदूकहि पोलिसमार्फत तुम्हांस मिळेल."

एवढें बोलून मॅजिस्ट्रेट ताडकन् आपल्या खुर्चीवरून उठले आणि बंगल्या-वर निघून गेले.

मी एखाद्या वेड्यासारखा मॅजिस्ट्रेटसाहेबांच्या पाठमोऱ्या आकृतीकडे पाहत, पिंजऱ्यांतच उभा होतों!

झंकार,
२१-२८ मार्च १९४३

---

## पंकमग्नो व्याधो ! : : २

थंडी मी म्हणत होती. गारवाटेनें संथपणें माझी गाडी चालली होती आणि गाडीच्या दोहों बाजूंनीं माझ्याबरोबरचीं माणसें हूः हूः करीत, विळ्यांचे सटक्यावर सटके मारीत अन् दंव पडलेलें असल्यामुळें जोख्यांस लडबडलेला पेंड मध्येंच कुठें तरी दगडाला अथवा झाडाच्या बुंध्याला खरडीत मोठ्या लगबगीनें माझ्याबरोबर मार्ग आक्रमीत होतीं. शेताशेतांनीं असलेल्या कोप्यांपुढें आगट्या पेटल्या होत्या, आणि बाटकीं बांधलेल्या खिल्लारां-खोंडां-खालचे शेणाचे पोह पायांनींच बाजूला सारून, शेतकरी बाटकाचे कवळेच्या कवळे आपल्या लाडक्या अन् होत्या वस्तूपुढें मुक्त हस्तानें रिचवीत होते.

गारच्या पाणवठ्यावर येऊन आम्ही दाखल झालों तों, लाल रविबिंब पूर्वक्षितिजावर चढून आलें होतें. गरम चहा बशींत ओतला कीं कशा वाफा निघतात, तशा मंद मंद वाफा पात्रांतल्या पाण्याच्या पृष्ठभागावर तरंगून विरत होत्या. कमरेएवढाले उंच पांढरेशुभ्र पाणढोक प्रवाहाच्या कडेला आपल्या माना आखडून घेऊन समाधि लावलेल्या योग्यांप्रमाणें अधोमुख होत्साते नितान्त निश्चल उभे होते; पण प्रवाहांत मासा दृष्टीस पडावयाचा अवकाश, कीं टेनिसचा खिलाड्र चेंडू आवाक्यांत येतांच जसा सफाईनें स्ट्रोक मारतो, त्याप्रमाणें आपल्या लांब पल्लेदार माना सपाट्यानें प्रवाहांत फेकून त्यास गट्ट केल्याशिवाय ते राहत नसत.

भीमेचें तें रुंद पात्र ओलांडून आणि पैलतीरावरली नदीची ती अवघड दरड चढून आम्ही सपाटीवरल्या हिरवळीवर चढून आलों तों, तेथें बिनघोर-पणें विहरत असलेला हरणांचा एक मोठा खांडवा आम्हांस पाहून वाऱ्या-सारखा उधळला आणि हां हां म्हणतां कुरणाच्या बाजूला दिसेनासा झाला. त्या खांडव्यांतील हरणांचें लक्ष वेधून घेण्याकरितां, मीं माझीं माणसें आणि गाडी धडक वाटेनेंच रवाना करून दिली आणि फक्त एकच इसम बरोबर घेऊन त्या हरणांच्या पिछाडीकडे मी कुरणाच्या रोखानें लवणालवणानें निघालों.

'सहज जातां जातां कांहीं भवानी झाल्यास पाहावी,' इतकाच माझ्या मनांतला हेतु होता. हरणांच्या शिकारीकरितां आम्ही आज बाहेर पडलोंच नव्हतों. बाभळेश्वरच्या शेजारच्या दोन-तीन गांवांच्या हद्दींतील रानांची नव्यानेंच तोड झाल्यामुळें तेथलीं ठळक ठळक रानजनावरें (रानडुकरें) बाभळेश्वरचें रान धरून राहिल्याची वर्दी मला लागली होती, अन् रायफलीचीं काडतुसें शिल्लक नव्हतीं म्हणून जोडनळीची बंदूक खांद्यावर टाकून आज मीं बाभळेश्वराकडे कूच केलें होतें.

जरासा वळसा घेऊन त्या गहाळ पडलेल्या खांडव्याच्या पिछाडीस तर मी येऊन पोंहोचलों. पण अद्यापहि त्या खांडांतले काळे बंदुकीच्या टप्प्याबाहेर असल्यामुळें मी किंचित्काल वाट पाहत स्वस्थ उभा राहिलों. माझीं माणसें अन् गाडी आस्ते आस्ते पुढें सरत होती. थोड्याच वेळांत मला हवी असलेली संधि मिळाली. तो खांडवा आतां अगदीं माझ्या नेटांत आला, अन् अत्यंत सावधगिरीनें आवाज टाकून त्यांतले, एकाद्या मस्त हेल्याप्रमाणें आपल्या गर्दना पेलीत पेलीत अन् सावकाश पावलें टाकीत चाललेले, लांब लांब शिंगांचे दोन तुंद काळे मीं जमिनीवर लोळविले. क्षणार्धांत आमचा लवा-जमाहि तेथें येऊन दाखल झाला. माझ्या माणसांनीं त्या पुष्ट काळवीटांचीं पोटें चिरून त्यांचे कोठे काढून टाकले आणि दोन दोन टांके टांचून त्या काळ्यांस गाडीच्या शिडींत स्थानापन्न करून दिल्यावर आम्हीं पुन्हा थोरल्या कुरणाची वाट धरली.

आम्ही आमच्या नियोजित स्थलीं आलों तों, सावल्या सरळ अंगाखालीं येऊं लागल्या होत्या. एक क्षणहि न घालवितां मीं मागावर माणसें सोडलीं. माझ्या सुदैवानें, कुरणांत शिरलेल्या जनावरांचे ताजे ठळक माग आम्हांस आढळले, अन् जनावरें बाहेर न पडल्याची खात्री होतांच, रान उठविणारीं माणसें मीं झपाट्यानें आंत घातलीं.

मी माझ्या बारीवर तयार होऊन राहिलों होतों. सरासरी अर्ध्या-पाऊण घंट्यानें एक मोठा सुळेवाला नर अन् एक नुकतेंच सुळ्यांवर येत असलेलें जवान बांडगें मी असलेल्या बारीवाटे भडाडलें. मीं नीट शिस्त धरून, त्या दोन्ही जनावरांवर अचूक आणि माझ्या समजुतीप्रमाणें निर्णायक असे आवाज

टाकले. पण तीं दोन्ही जनावरें, दुडकत दुडकत, अंगें झटकीत संथपणें माझ्यासमोरून शाबूत निघून गेलीं! हा प्रकार पाहून मी स्तंभितच होऊन गेलों. माझी विचारशक्तीच नष्ट झाल्यासारखी झाली. इतक्या नेटांतलीं जनावरें स्वप्नांतसुद्धां माझ्या हातून कधीं निसटलीं नव्हतीं! थोड्याच वेळांत सगळे गडी माझ्याभोंवतीं गोळा झाले, आणि जो तो माझ्याकडे डोळे फाडफाडून साश्चर्य बघूं लागला! त्यांच्या त्या प्रश्नार्थक दृष्टींतला भावार्थ मला पुरा पुरा कळून चुकला, पण त्यांचें शंका-समाधान मी त्या वेळीं करूं शकलों नाहीं. बिलकुल न कळत माझा हात वर कपाळाकडे उचलला गेला, अन् उद्वेगानें हातांतली बंदूक तेथेंच गवतावर फेकून मी विड्यांमागें विड्या फुंकीत शून्य मनानें कुठें तरीच बघत बसून राहिलों. कांहीं तरी अनुचित आणि अनपेक्षित घडल्यासारखें त्या अडाणी लोकांसहि भासलें.

केवळ मला बरें वाटावें म्हणून ते पुन्हा आंत जाण्याकरितां उठले, आणि मला नवोत्साह येण्यासाठीं मजबरोबर मोठ्या लाघवपूर्ण— गोड गोड गोष्टी करून, हसतमुखानें माझे ते सारे सहकारी पुनरपि कुरणांत घुसले.

खालच्या गवतावर पडलेली बंदूक मीं उचलून घेतली, आणि त्यांतलीं उडालेल्या काडतुसांचीं टरफलें काढून नवीं काडतुसें भरण्याकरितां ती मीं खोलली. टरफलें काढून हातांत घेतलीं मात्र, मला एकदम जोराचा धक्का बसल्यासारखा झाला. मोठमोठ्यानें हाका मारून, मी कुरणांत शिरलेल्या माझ्या माणसांस परत बोलाविलें, आणि बोलण्यासवरण्याच्या गडबडींत भूल झाल्यानें, गोळीऐवजीं, ससांवर टाकावयाचीं बाजरीएवढाल्या बारीक छऱ्यांचीं चार नंबरच्या काडतुसांचीं बंदुकींतून उपसलेलीं टरफलें मीं त्यांच्यापुढें झोकलीं!

आज श्वापदें माझ्या समोरून साकसुरत निघून गेलीं. पण कैक शिकाऱ्यांचे प्राणहि असल्या हलगर्जीपणामुळें निघून गेलेले ठाऊक असूनहि ही अक्षम्य व लाजिरवाणी चूक आज मजकडून घडली होती. सांगण्यांत मोठेंसें भूषण नाहीं— मला मोठी चुटपूट लागून गेली, आणि एकाद्या आडमुठ्याप्रमाणें अनेक प्रकारें स्वतःच्याच मुखानें मीं आत्मनिषेध करून घेतला!

माणसें पुन्हा कुरणांत शिरलीं न शिरलीं तोंच मोठा आरडा झाला.

मी बंदूक सरसावून, मघांच्या चुकीचें परिमार्जन करण्याच्या इराद्यानें

डोळ्यांत तेल घालून सावधगिरीनें उभा होतों, इतक्यांत कुरणाच्या कडेवरच असलेलीं तीनचार कोल्हीं, आपल्या झुपकेदार शेपटया मागल्या दोन्ही तंगड्यांत खुपसून घेऊन 'सूं बाल्या' करतीं झालेलीं माझ्या नजरेस पडलीं. आंतल्या माझ्या सहकाऱ्यांमध्यें पिकलेला हशा स्पष्टपणें माझ्या कानीं आला अन् मीहि स्वतःशींच पण मनमुक्त हसलों !

घटकाभर सर्वत्र सामसूम झाल्यासारखें झालें. पण लवकरच हाक्यांच्या आरोळयांनीं सारें जंगल दणाणून गेलें. दक्षिण बाजूनें नदीची कड धरून, आणि पश्चिम कोपराहि दाबून, उत्तरेकडच्या– मी उभ्या असलेल्या बारीवर– जनावरें काढण्याकरितां हाके आपल्याकडून शर्थ करीत होते. एक चांगली सणसर डाडर ( मादी ) आणि सात-आठ मध्यमसर बांडगीं त्यांनीं कुरणाच्या मध्यापर्यंत मोठ्या कौशल्यानें चेपीत आणिलीं होतीं, पण दाट काटवणामुळें आणि गुंतागुंतीच्या झडोऱ्यामुळें किंबहुना अंगचुकार गड्यांच्या ढिलाईमुळें, फऱ्यांत किंचित् फट्टा पडतांच, तीं सारीं श्वापदें अकस्मात् उलटलीं आणि कुरणांत दिसेनाशीं झालीं. एक मोठा सुळेवाला नर मात्र बराच पुढें सरसावला होता, त्यावर त्यांनीं आपलें सारें लक्ष आतां एकवटलें आणि अक्षरशः जिवाचें आणि तोंडाचें रान करून त्यांनीं जवळ जवळ त्याला कुरणाच्या कडेपर्यंत दाबीत आणून मला मोठ्यानें तसा इशारा केला. मी बंदूक किंचित् वर उचलली, कपाळ विनत केलें, अन् एकाद्या भाबड्या भाविकाप्रमाणें माझ्या हातांतल्या त्या माझ्या सिद्धिदेवतेला डोळे मिटून मनःपूर्वक अभिवादन केलें. एकदा बॅरलवरून मीं हात फिरविला आणि दोन-तीन वेळां बारीकडे नुसतीच शिस्त धरून पाहिली; इतक्यांत एकाद्या बिनजोड मल्लाप्रमाणें बेदरकारपणें मुसमुसणारा, पण ज्याच्या आयुष्याची संपूर्ण घटका भरून आलेली होती असा तो दर्शनीय वराह माझ्या समोरच्या बारीवाटे बाहेर पडला आणि पांदी-कडे आडवा निघाला. नेमकी बरगडी वेधून मीं त्यावर दोन्ही आवाज टाकले. दहाबारा कदमांवर जाऊन तो फारच भेसूरपणें रोंरावला आणि पडतां पडतांच मलोत्सर्ग करून त्यानें तत्काल प्राण सोडला. आनंदून गेलेले माझे सगळे जंगली दोस्त निर्मिषार्धांत तेथें जमा झाले. एक-दोघांनीं त्याचे रठ दाभणासारखे केस खरडून काढले आणि ते पुरचुंडींत बांधून घेऊन, कस्तण आणि सुकलेलीं फाटीं आणण्याकरितां पुन्हा ते इतस्ततः पांगून गेले. थोडक्याच

अवधींत बरेंचसें कस्तण अन् फाटीं जमा करून त्यांनीं तीं चेतविलीं आणि त्यांत तो पुष्ट रानडुक्कर भाजावयास घातला.

मी तेथून उठलों आणि वाऱ्याच्या विरुद्ध दिशेला जरासा लांब जाऊन बसलों.

घंटाभरानें तो चांगला खरपूस भाजल्यावर त्यांनीं त्याच्या खरबुजाप्रमाणें खापी काढून वाटे घातले (एरवीं कुऱ्हाडीच्या घावासहि जें शरीर दाद देत नाहीं, तेंच चांगलें भाजून काढल्यावर सहज लीलेनें चिरतां येतें. इतर प्राण्यांच्या चमड्याप्रमाणें रानडुकराचें चमडें सोलून काढतां येत नाहीं. खरपूस भाजल्या-नंतर चमडें व मांस यांचा पेरूप्रमाणें एकमिलाफ होऊन जातो.) आणि आम्ही आतां परत फिरण्याच्या तयारींत होतों, इतक्यांत दूरवर नदीच्या बाजूनें, अगदीं अपरिचित आणि चमत्कारिक घोगऱ्या अशा आवाजांतल्या आरोळ्या आमच्या कानांवर आल्या.

निघतां निघतां पुन्हा आम्ही राहते झालों, आणि केवळ जिज्ञासेनें, काय भानगड आहे तिचा तलास लावण्याकरिता पांच-सहा इसमांस बरोबर घेऊन, आरोळ्या येत असलेल्या दिशेनें मी निघालों.

सूर्यास्त केव्हांच होऊन गेला होता, पण थोडासा संधिप्रकाश अजूनहि होता.

आम्ही पुढें पुढें सरूं लागलों, तसतशा आरोळ्या स्पष्ट ऐकूं येऊं लागल्या. कुणी तरी मोठ्या संकटांत असून मदतीकरितां कुणास तरी पाचारीत आहे हें आम्हीं अनुमानानेंच ताडलें. चरचर वाळू तुडवीत आम्ही अगदीं प्रवाहा-पाशीं आलों. तों वरच्या अंगास, नदीला येऊन मिळालेल्या एका रुंद ओहोळाच्या मुखापासल्या पोयट्यांत कमरेपर्यंत फसलेले दोघे सोजीर आमच्या नजरेस पडले. घसा फुटेल इतक्या मोठ्यानें ओरडून प्रथम मीं त्यांस धीर दिला, आणि तत्काल माझ्या माणसांस, हाताच्या पंजाप्रमाणें रुंद व पसरट अशा फनगड्या राखून, चार लांब अन् मजबूत फोंकाट्या आणण्यासाठीं रवाना केलें.

'बिलकुल चुळबूळ करूं नका,' म्हणून मीं पुन्हा त्या दोघांस इशारा दिला, आणि माझ्या माणसांची वाट पाहत व घडून आलेल्या या विस्मयकारक घटनेबद्दल विचार करीत तेथेंच वाळूवर अस्वस्थ चित्तानें उभा राहिलों.

थोड्याच वेळांत गडी माझ्या सांगण्याबरहुकूम फोंकाट्या घेऊन आले, आणि त्या चारी फोंकाट्यांनिशीं, त्या दुकलीस काढून आणण्याकरितां मीं माझे दोघे गडी त्या चिखलांत घातले.

हळुवारपणें माझे गडी, त्या रुंद फनगड्या असलेल्या फोंकाट्यांच्या आधारानें जात होते, तरीही फसाफस ढोपरांपर्यंत त्यांचे पाय चिखलांत रोवत!

त्या गोऱ्या दुकलीपाशीं माझे गडी एकदाचे जाऊन भिडले आणि त्यांनीं बरोबर नेलेल्या दोन्ही फोंकाट्या त्या दोघांच्या हातीं दिल्या. त्या सोजरांनीं आमचें काम फारच कठीण करून सोडलें होतें; पण आमचें कर्तव्य काय वाटेल तें करून आम्हांस करावयासच हवें होतें. घबराटपणामुळें धडपडून धडपडून त्या लष्करी रांगड्यांनीं आपल्याभोंवतालीं नुसता राडा करून टाकिला होता. त्यांच्या बंदुकाहि चिखलांत खोलवर रुतून बसल्या होत्या आणि बुटां-सुद्धां त्यांना त्या आळलेल्या कर्दमांतून उपसून काढणें मोठ्या मुष्किलीचें होऊन बसलें होतें. चंद्रोदय होण्यास अद्याप थोडा अवधि होता, आणि काळोखांत नीटसा उमग पडण्यासारखा नसल्यामुळें, मजबरोबर असलेले दोन्ही कंदील मीं लावून आणविले आणि आणखी दोघां गड्यांस पूर्वोक्त साधनांनीं सुसज्जित करून त्यांच्या मदतीस रवाना करून दिलें.

पुष्कळच आदबल्यानंतर मोठ्या शिकस्तीनें ते सारेजण वाळूवर येऊन उभे राहिले, आणि त्या दोघा शिकारी सोजरांनीं कमालीच्या कृतज्ञतेनें आम्हां सर्वांचेच आभार मानले. झालेल्या विटंबनेमुळें ते मेल्यापेक्षां मेले होऊन गेले होते, आणि शत्रूलाहि कींव येण्यासारखी त्यांची अनुकंपनीय अवस्था झाली होती. माझ्या माणसांकडून मीं त्यांच्या अंगांस लिंपलेला गिलावा फरशांनीं खरवडून काढविला. त्यांच्या बंदुका साफ करून त्यांच्या हातीं दिल्या आणि त्यांच्या पायांतले बूटहि काढवून स्वच्छ धुऊन आणविले. त्यांजवर येऊन कोसळलेल्या या आकस्मिक आणि खेदजनक प्रसंगाची इत्थंभूत हकीकत त्यांस विचारून घेतली आणि 'गुड्-नाइट्' म्हणून त्यांस निरोप दिला. माळा-वरल्या महादेवाच्या देवळापाशीं त्यांची भाडोत्री गाडी सुटली होती, तेथें त्यांस नेऊन पोंहोचविण्यास माझ्या माणसांस फर्माविलें आणि एक विडी शिलगावून मी माझ्या माणसांबरोबर गोष्टी करीत बसलों. आज सारा दिवस-भर ते दोघे सोजीर हरणांमागें भटकत होते. त्यांच्यापैकीं एकाजवळ रायफल्

आणि एकापाशीं जोडनळीची बंदूक होती. हरणें कांहीं त्यांना प्रसन्न झालीं नाहींत. पण सायंकाळच्या सुमारास नदीच्या लगत्याला एका उडत्या पाण-बदकांच्या थव्यावर आवाज टाकून त्यांतलीं दोन बदकें त्यांनीं जाया केलीं. उडतां उडतां तीं दोन्हीं बदकें त्या पोयट्याच्या भागांत जाऊन पडलीं आणि धाधावल्यासारखे हे दोघे वीर त्या बदकांच्यामागें दौडत सुटले. त्या पोयट्यावर सायटें धरल्यामुळें वरल्या सुकलेल्या चिखलाच्या वड्या बनून राहिल्या होत्या आणि खालीं चिखल असेल अशी कल्पना नसल्यामुळें, फसगतीनें त्या दुकलीची वरीलप्रमाणें दुर्दशा झाली. केव्हां केव्हां योगायोग कसे विचित्र येतात पहा! सरत्या इंग्रजी संवत्सरांतला महत्त्वाचा नाताळाचा सण साजरा करण्याच्या उद्देशानें आज ते आले होते. पण आम्हां हिंदूंचा सरत्या संवत्सरांतला महत्त्वाचा सण अक्षरशः **शिमगा करून अन् धुळवड खेळून** साजरा करण्याची पाळी अवेळींच, त्या क्षुद्र भासणाऱ्या बदकांच्या दुकलीनें मरतां मरतां आमच्या या गोऱ्या शिकारी दुकलीवर आणिली!!

वाङ्मयशोभा,
जानेवारी १९४४

---

## माळवाडीचा 'दादा !' : : ३

'अति तिथं माती !'

माझे आप्तइष्ट, स्नेहीसोबती, अन् सारं जग माझ्या नांवानं खडे फाडीत होतं. कित्येक पुण्यवान् पुराणे आत्मे, 'ब्राह्मणजन्माला येऊन, मी करीत असलेल्या हिंसेच्या पातकामुळं, मेल्यानंतर मला सद्‌गति प्राप्त होणार नाहीं,' म्हणून मनांत हळहळत झुरत होते; अन् कित्येक 'वेदोनारायणांनीं' अन् 'धर्ममार्तंडांनीं' मला पंक्तिबाह्य ठरवून मला जवळ जवळ वाळींत टाकल्यासारखं केलं होतं.

माझं सारं गणगोत अशा रीतीनं मजवर रुष्ट होऊन गेलं होतं, अन् माझंहि मन, कधीं कधीं सवड असली म्हणजे, त्याबद्दल दिलगीर झाल्यावांचून राहत नसे. वस्तुस्थिति अशी होती खरी, पण त्या बाबतींत माझा अगदीं नाइलाज होऊन गेला होता. आज बावीस-तेवीस वर्षे मला जडून गेलेलं तें व्यसन आतां सुटण्यासारखं नव्हतं. 'शिकार' हा माझा स्वभावधर्मच बनून गेला होता. त्या व्यसनापायीं मी अलीकडे मातीला मिळाल्यासारखाच झालों होतों, अन् वास्तविकतेनं मी मातीला मिळाल्यावर तें माझ्या कलेवराबरोबरच सहगमन करणार होतं.

जवळ जवळ हें ठाम ठरल्यासारखंच होतं. त्यांत आतां कांहीं फरक होण्यासारखा नव्हता, अन् म्हणूनच त्याबद्दल विचार करण्याचं मीं अजीबात सोडून दिलं होतं.

टपालवाल्यानं आणून दिलेला 'केसरी' उलथा-पालथा करीत मी माझ्या घराच्या पडवीला बसलों होतों. एका बाजूला घोडके मास्तर मुलांबरोबर डोकंफोड करीत बसले होते, अन् दोनतीन नवखीं माणसं फाटकांतून आंत शिरून, माझ्या गड्याजवळ कांहीं तरी विचारपूस करीत घोटाळत उभीं होतीं. विलायतेचं ताम्हनकरांचं बातमीपत्र वाचून झालं, अन् इतर मजकुराकडे मी दृष्टि वळविणार, इतक्यांत माझा गडी माझ्यापाशीं येऊन मला म्हणाला,

" माळवाडीचीं माणसं जनावरांची वर्दी घेऊन आलीं आहेत." " त्यांना घेऊन ये," म्हणतांच तो त्यांना घेऊन आंत आला, अन् त्या लोकांनीं, "आम्हां माळवाडीच्या लोकांना रानजनावरांनीं अलीकडे भारीच सतावलं आहे, अन् त्यांच्या डोंगरांतल्या अन् गांवखुराजवळच्या दोन्ही ओढ्यांच्या चिमट्यांतल्या निवडुंगांतल्या खोपाहि आम्हांला ठाऊक झाल्या आहेत," म्हणून मला वर्दी दिली.

हातांतला 'केसरी' मीं कॉटवर फेकून दिला, अन् खुंटयांवरली बंदूक खालीं काढून, आंतून-बाहेरून पुसून मीं ती स्वच्छ केली. पट्टयांत, पांच-चार एल्. जी., अन् बरींचशीं 'लेथेल'चीं (वर शिरा असलेलीं गोळीचीं काडतुसें–हीं काडतुसें शरीरांतल्या हाडांचा पार चुरा उडवितात, आणि जखमी झालेलें सावज जागचे जागींच जाम होतें.) काडतुसें भरलीं, अन् रामोशी मंडळींस बोलावून आणण्याकरितां तत्काल गांवाकडे मनुष्य रवाना केला. घंटाभरानें सगळी रामोशी मंडळी जमून आली. त्यांस मी अन् त्या माळवाडीच्या माणसांनींहि इत्थंभूत हकीगत सांगितली, अन् जेवण करून ताबडतोब निघावयाचें म्हणून मीं त्यांस फर्माविलें. मुक्कामालाच तेथें जाण्यांत, उद‍ईक खेळावयास आख्खा दिवस सापडावा असा माझा हेतु होता. गांवावरूनच जावयाचें असल्यामुळें, 'जेवण उरकून, मी तुम्हांस वेशीपाशींच गाठतों,' असें रामोशी मंडळींस सांगून निघण्याची तयारी करण्याकरितां मीं त्यांस पुढें रवाना करून दिलें, आणि माळवाडीकर गडीहि नेहेऱ्या करून आलेले असल्यामुळें, दिवस मावळावयाच्या आंत आम्ही येतों, तुम्ही पुढें चला,' असें सांगून त्यांसहि मीं निरोप दिला.

* * *

थोडासा दिवस असतांच आम्ही माळवाडींत येऊन दाखल झालों. बहिरोबाच्या देवळापुढें येऊन आम्हीं तळ दिला. गांवकरी आमची वाटच पाहत होते. आमच्या आगमनामुळें सारे गांवकरी आनंदित झालेले दिसत होते, अन् गांवांतलीं पोरंसोरंहि, 'उद्यां मोठी गंमत पाहावयास सापडणार,' या आशेनें, मोठ्या खुषींत येऊन, चिलबिल करीत इकडून तिकडे देवळा-भोंवतीं घिरटया घालीत हिंडत होतीं.

थोडेंसें ताजें दूध आणवून चहा करून मीं घेतला, अन् एक विडी पेटवून गांवकऱ्यांबरोबर गप्पा छाटीत बसलों.

"खांडव्यांत दोन-तीन टपकळ जनावरं हायेत; अन् एक एकांडाच लांबलांब सुळ्यांचा भुरका डुकार हाये, तो तर लईच भारी– त्यानंच आमचा पार सत्यानास केला. हानावयास जायची बी कुनाची सुरानी न्हाई. बेलाक्षी रुकून अंगावर धावतो. आमच्या वाडींत तर त्येला 'दादा' म्हनत्यात, अन त्येच्या वाटेला अक्षी कुनीबी जात न्हाई."

बरीच रात्र पडेपर्यंत गांवकऱ्यांशीं मी गोष्टी करीत बसलों होतों. त्यांच्याबरोबर झोडलेल्या अघळपघळ गप्पाष्टकांतला उपरोक्त इत्यर्थ मीं नीट ध्यानात ठेवला, अन् "रात्रीं कुणाच्या पिकांत 'दादा'साहेबांची फेरी आल्यास मला अवश्य वर्दी द्या अन् सकाळीं लवकरच उठून तयार राहा," असें त्यांस बजावून, उद्यांच्या कार्यक्रमाबद्दलचा विचार करीत मी गाडींतल्या माझ्या पथारीवर पसरलों.

* * *

पहाटे उठून मुखमार्जन करून मीं व माझ्याबरोबरच्या माणसांनीं अगोदर चहा ढोसला. गांवची कारभारी मंडळीहि तेवढ्यांत येऊन दाखल झाली, आणि त्यांनीं, "बारवेच्या मळ्यांतला, विठोबा माळ्याचा हुरड्यावर आलेला मका रात्रीं दादानं पार खुर्दळून टाकला," म्हणून आम्हांस वर्दी दिली.

रात्रभर मला ज्या गोष्टीचा निदिध्यास लागून गेला होता, अन् ज्याची कांहीं तरी चाहूल लागावी या आशेनें माझे कान अगदीं अधीर होऊन गेले होते, नेमकी तीच बातमी मिळाल्यामुळें माझा हर्ष आतां गगनांत मावेना! 'डुकरांचा तो खांडवा गांवानजीक इतक्या वर्दळींत दम काढावयाचा नाहीं, पण तो 'दादा' मात्र रगेलपणामुळं अन् मस्तीमुळं त्या दोन्ही ओढयांमधल्या चिमटयांत कुठं तरी पडून असण्याचा बराच संभव आहे,' असा माझा कयास झाला, अन् मी माझ्या माणसांस, "रात्रीं 'दादा'नं लोळविलेल्या मक्याच्या पट्टीपासून माग धरीत पुढें व्हा, मी तुमच्या पाठोपाठ येतोंच," म्हणून पुढं रवाना करून दिलं. गांवकऱ्यांनीं गांवांतल्या जोशाकडून करवून आणिलेला शिरा मीं यथेच्छ चापला, अन् पुनरपि एकवार चहा घेऊन गांवकऱ्यांसमवेत मी गांवाबाहेर पडलों.

वाटेनें गप्पागोष्टी करीत थोड्याच वेळांत आम्ही ओढ्याजवळ येऊन पोंहोचलों. ओढ्याच्या अलीकडल्या डगरीवर त्या सगळ्या गांवकऱ्यांस मीं बसून राहण्यास सांगितलें, अन् मी पुढें सटकलों. सरासरी दोन अडीच घंट्यांनीं दोघे तिघे रामोशी गडी माझ्यापाशीं आले, अन् त्यांनीं मला 'घाया'–( व्यावयास झालेली डाडर, आपल्या पिलांकरितां जमिनीवर झाडांच्या खांद्या आणि दाट झुडपें अंथरून, त्याखालीं खोल गर्दाड तयार करते त्या जागेस 'घाया' म्हणतात. ) करून त्यांत पडून असलेली एक डाडर जाग्यावरच हेरली आहे,' अशी वर्दी दिली.

" मरूं द्या ती डाडर, तुम्ही फक्त त्या 'दादा'च्याच मागानें जा, अन् मला इथं वर्दी द्या." इतकंच बोलून मीं त्यांना परत पिटाळलं, अन् तिथंच चोपणावर बसून राहिलों.

अर्धा कलाकहि मधें लोटला नसेल ! मघांशी मीं परत फिरविलेले गडी पुन्हा मजपाशीं आले, अन् त्यांनीं, " जनावर अगदीं कडेवरच कुठं तरी पडून असावं, बहुतकरून तें लवकरच उठेल, अन् डोंगरबारीकडंच निघावयास पाहील, सावध असा," म्हणून मला सूचना दिली.

" सावधपणानं, बिलकुल गहाळ न पडतां नीर घालीत चला, अन् दक्षिण बाजूच्या डोंगरबारीकडच्या रहिवासलेल्या बारीवरच त्याला बाहेर काढा," असं त्यांस सांगून, मी त्या बारीसमोरच असलेल्या एका मोठ्या वारुळाआड जाऊन बसलों.

हाक्यांच्या आरोळ्या अंतराळ भेदून जाऊं लागल्या, अन् माझी छातीहि आंतल्याआंत धडधड उडूं लागली. वारुळावर बंदुकीची नळी ठेवून मी अत्यंत सावधगिरीनें सावजाची वाट पाहत बसलों. हाक्यांच्या आरोळ्यांवरून, हाके कडेवरच्या एका मोठ्या ढापाच्या जवळ जवळ येऊन पोंहोचल्यासारखे वाटत होते. 'तरीहि जनावर अद्याप गच्च कसें ?' असें माझ्या मनांत येतें न येतें तोंच तो खवळून गेलेला अन् बेहोष बनलेला मस्त रानडुकर, धडाधड ढाप उलथून देऊन माझ्या समोरच्या बारीवाटे बाहेर पडला. माझ्या बंदुकीचें तोंड मीं किंचित् उजव्या बाजूस फिरविलें, अन् डोळ्याचें पातें लवतें न लवतें तोंच, त्याच्या बरगडीवर शिस्त धरून बार टाकला. दुसऱ्या ट्रिगरवर बोट ठेवून

मी एकदम उठून उभा राहिलों. मला पाहून त्या पोळलेल्या जनावरानें त्वेषानें मजकडे मोहोरा फिरविला. पण, त्याची जीवनशक्तीच संपुष्टांत आल्यामुळें पुरते पांच-चार कदमहि तें येऊं शकलं नाहीं. बघतां बघतां माळवाडीचा तो 'दादा' तिथंच चोपणावर पसरला, अन् त्याच्या वासलेल्या जबड्यावाटे त्याची 'दादागिरी'हि बाहेर पडून निसर्गात विलीन होऊन गेली!*

वाङ्मयशोभा,
फेब्रुवारी १९४४

---

*सदरहू रानजनावराचें शिर, पाटस येथील माझे स्नेही श्री. रा. गंगाजीराव जानराव शितोळे देशमुख यांचे वाड्यांतील कचेरींत लावलेलें अद्यापि तेथें आहे.

# देऊळगांवच्या शिवारांत : : ४

'पंत'—योगीश्रेष्ठ अरविंद घोष यांचे गुरु श्री. व्ही. बी. लेले—समाधिस्थ झाल्यासच आज दीड वर्ष झालें, आणि त्याच्या किती तरी अगोदरची हकीगत !

'माणिकतोळा' बॉम्ब प्रकरण बारींद्रकुमारांच्या फांशीबरोबरच संपलें, आणि पंतांनींहि बंगाल्यांतील आपलें वास्तव्य उठवून नारायण महाराजांचे आश्रमांत आपल्या परमार्थसाधनाची सोय लावून घेतली. पुण्यास त्यांच्या खेपा नेहमींच होत आणि ते माझेकडेच उतरत; किंवा एखादे वेळीं लहर लागल्यास हिंगण्यास आश्रमांत जात. शुचिर्भूतपणानें तयार केलेलें जेवण मिळाल्यास ते जेवत, नाहीं तर दुधावरच राहत. केळीचे पानावर जेवण्याचा त्यांचा नियम असे. त्यांची एक मोठी खोड होती कीं, भोजनोत्तर वामकुक्षीचे वेळीं अगर झोपतांना चुकूनसुद्धां ढेकणांचा उपसर्ग त्यांस सहन होत नसे. शिवाय त्यांच्या ध्यानधारणेच्या वेळा फार कसोशीनें संभाळाव्या लागत.

पुढें, पुण्याहून मी माझे शेतीचे गांवीं– पाटसास कायमचा राहण्यास गेलों तरी महाराजांचे दर्शनास येणाऱ्या पाहुणे मंडळींबरोबर मला नेहमीं बेटांत जावें लागे आणि पंतांचे दर्शनाचा लाभहि नित्यशः होई.

पाटसाहून बेट जवळच असल्यामुळें, आणि माझेकडे उतरण्याची– बैलगाडीची सोय– वगैरे सर्व सज्जड तयारी असल्यामुळें, मजकडे पाहुण्यांची आवकजावक नित्याचीच होती.

त्या वेळीं मुलूखभर जिकडे तिकडे निवडुंगच निवडुंग. आणि निवडुंगांत वस्ती करून राहणाऱ्या रानटी पशूंचें वैपुल्य. बेटाचे सभोंवारहि त्या वेळीं दाट निवडुंग असे आणि त्यांत मनस्वी रानडुकरें असत. तीं बेटांत दर्शनास येणाऱ्या आणि तेथें कायमची वस्ती करून राहिलेल्या भक्त मंडळीस आणि आसपासच्या शेतकऱ्यांस फार उपाधि देत. एक मोठें मस्त जनावर तर दिवसाउजेडींच खोपेबाहेर पडून शेतकऱ्यांच्या पिकांतून घुसून पिकांची नासाडी

करी, वैरणीच्या गंजी उस्तरी व प्रसंगीं माणसांवरहि रुकून धावे. महाराजांचे बंगल्याच्या पिछाडीसच या पठ्याचा मुक्काम असल्यामुळें त्याचें जीवन मोठें निर्धास्त होतें.

महाराजांचे अंवतींभोवतींचे परिसरांत हिंसा– शिकार– करावयास कोणी धजत नव्हता. महाराजांस तें मानवणार नाहीं अशी सर्वत्रांची समजूत होती.

असाच, बेटांत एका खेपेस मी गेलों असतां पंत मला म्हणाले, " तिकडे हरणें मारीत फिरतोस तो, ही एथली पीडा एकदां काढून टाक ना ! "

मला नवलच वाटलें व मीं म्हटलें, " पंत, माझी कुठें ना आहे ! डुकरें म्हणजे कांहीं वाघ नव्हत, त्यांत आहेच काय ? पण तुमचे महाराज रागावतील म्हणून मी भीत होतों. तसें नसल्यास, मी माणसें– सरंजाम घेऊन येतों व तेव्हांच त्यांचा फडशा पाडतों; महाराजांचें मात्र तुम्ही पाहून घ्या."

त्या बाबतींत पंतांनीं मला कांहीं सूचना केल्यावर मी पाटसास परत आलों व एका आठवड्यानें देऊळगांव–बेट येथें शिकारीस जाण्याची तयारी केली. त्याचे आदले दिवशीं संध्याकाळीं मजकडे पुण्याहून माझी कांहीं स्नेही-मंडळी हुरडा खाण्याचे निमित्तानें आलेली होती त्यांसहि शिकार पाहण्यास घेऊन गेलों. आम्ही आणि आमचे बरोबरची रामोशी मंडळी असे सर्व संध्याकाळीं देऊळगांवासच ( बेटांत आगाऊ गवगवा होऊं नये म्हणून ) मुक्काम करून राहिलों. मोठ्या पहाटेस उठून चांगला हंडाभर चहा उकळला आणि दोन-तीन वाडग्यांतून गोळा केलेलें बकऱ्यांचें दूध त्यांत ओतून दिलें. पुण्याची मंडळी तो शेळीच्या दुधाचा चहा घेईनात. मीं मात्र दोनतीन पितळ्या चहा आपल्या पोटांत रिचवून दिला. तेथील नाना कोळी शिकारीचा मोठा नादी होता. त्यास बरोबर घेतला आणि उजाडतांच आम्ही बाहेर पडून माग सोडदिण्याचे उद्योगास लागलों. कांहीं माग सोडवून ठेवले; पण ज्या मुख्य जीवाकरितां म्हणून आम्ही आवर्जून आलों होतों त्याचा मागमुद्दा कांहीं लागेना. मी आणि रामोशी मंडळी बंगल्यामागील टेकाडावर जरा खट्टू मनानेंच विचार करीत बसलों होतों. इतक्यांत मला उत्तरेच्या बाजूनें एक भुरक्या-राखी रंगाचें जनावर निवडुंगाभोंवतीं चाचरत फिरत असलेलें दिसलें. इतक्या उशीरा– चांगलें उन्ह पडल्यावर– रानजनावरें– डुकरें, कधीं बाहेर वावरत नाहींत. तांबडें फुटण्याच्या आंतच आपापल्या खोपांतून जाऊन तीं

पडतात. असें असल्यामुळें आणि त्याच्या राखी रंगावरून तें गाढव असावें असें प्रथम मला वाटलें. मी बारीक नजरेनें न्याहाळून पाहूं लागलों. त्याची चाल गाढवासारखी न दिसतां डुकराप्रमाणें मला दिसली. इतक्यांत तें एकाएकीं अदृश्य झालें आणि तें रानजनावरच असल्याबद्दल माझी खात्री झाली. गाढव असल्या दाट निवडुंगांत शिरणें सर्वथा असंभवनीय होतें.

माझ्या बरोबरची रामोशी मंडळी कोणी विड्या फुंकीत, तर कोणी तंबाखूच्या फक्या मारीत; कोणी नाचकणानें पाय टोकरीत, तर कोणी उगाचच दगडावर दगड मारीत बेफिकीरपणें बसली होती. त्यांस जवळ बोलावून माझी कल्पना मीं त्यांस सांगितली, आणि माग बघून या म्हणून त्यांतल्या दोघांतिघांस सांगितलें. 'मला एकाएकींच वेड लागलें असावें', असें त्यांस वाटल्यासारख्या मुद्रा करून ते माझ्याकडे पाहत हसावयास लागले. तें रानजनावरच आहे असें मीं त्यांस जीव तोडून सांगितलें, पण त्यांना तें पटेना. उगाच वेळ घालविण्यापेक्षां टेहळून ठेविलेलीं जनावरेंच अगोदर खतम करावींत असें त्यांचें म्हणणें पडलें. आमची सबंध हयात रानांतच गेली, पण कधीं इतक्या उशीरा खोपेंत पडावयास आलेलें जनावर आम्हीं पाहिलें नाहीं, असें त्यांचें म्हणणें होतें. 'माझ्या समजुतीकरितां का होईना, तुम्ही एकवार पाहून याच,' असें मीं उद्‌मेखून म्हटल्यावरून त्यांतील दोघेजण माग पाहण्याकरितां गेले. जाग्यावर जाऊन त्यांनीं पाहिलें तों, जनावर आंत शिरल्याचा अगदीं ताजा ठळक माग त्यांस दिसला. चौफेर चक्कर मारून त्यांनीं जनावर बाहेर न पडल्याची खात्री करून घेतली, आणि मूळ जागीं येऊन डोक्यांचीं पागोटीं काढून त्यांनीं आम्हांस पालविलें. माझा हर्ष गगनांत मावेना! आम्ही सर्व पळतच खालीं उतरलों आणि तेथें गेलों. मी स्वतः पुन्हा एकवार जनावर शिरलेल्या आळ्याभोंवतीं वेढा टाकून आलों आणि 'अटेन्शन्'ची ऑर्डर दिली. जो तो ठिकठिकाणीं आपापल्या बारीवर जाऊन उभा राहिला आणि मीहि बंदूक भरून माझ्या बारीवर सावधपणानें उभा राहिलों. हाके आंत शिरतात न शिरतात तोंच, जनावर सावध असल्यामुळें झटक्यास हललें आणि पूर्व बाजूच्या बारीनें निघून गेलें. मी विषण्ण मनानें बंदूक जमिनीवर टेकून त्याचेकडे बघत बसलों.

आंतील हाक्यांनीं व त्या बारीवरच्या माणसांनीं, जनावर मोडून माझे

बारीवर घालविण्याचा आटोकाट प्रयत्न केला, पण त्यांस न जुमानतां त्यांचे-मधूनें त्यानें मुसंडी मारली आणि टेकडीवरील गोटे आपल्या खुरांनीं तुच्छतेनें उडवीत तें टेकडीपार झालें. त्यानें फार न लांबतां जवळच कोठें तरी टेकावें म्हणून त्यास अवसर देण्याकरितां आम्ही 'हॉल्ट' केला आणि आम्हीं सर्वत्रांनीं न्याहारी उरकून घेतली. थोडा वेळ गेल्यानंतर त्याचे मागाचे अनुरोधानें आम्ही निघालों तों, तीन साडेतीन मैलांवर तें एका आळयांत शिरल्याचा माग लागला. अति सावधगिरीनें सर्व बाजूंनीं माग सोडविला आणि पुन्हा आम्ही सर्व तयार होऊन राहिलों. पुण्याची मंडळी कोणी आमचेबरोबर आली होती आणि कोणी बेटांत प्रयाण केलें होतें. येथूनहि जनावर निसटल्यास त्यास वाखरीचे कुरणाशिवाय टेकावयास दुसरी जागा नव्हती, म्हणून त्याच बाजूचे बारीवर जनावर निघेल असा कयास करून मी त्या बारीवर उभा राहिलों, आणि हाके आंत घातले. निमिषार्धांत–हाक्यांनीं त्यास हेरण्याचें अगोदर त्यानेंच त्या हाक्यांपैकीं 'हिरा' नांवाच्या रामोशास हेरलें, आणि बारीवर न जातां एक प्रचंड ढाप सहज लीलेनें त्याचे अंगावर उलथून देऊन तें बाहेर भडाडलें. 'मेलों, मेलों' असा आर्त ध्वनि वातावरणांत उमटला.

कुरणाच्या रोखानेंच तें निघालें होतें. बंदुकीच्या टप्प्याबाहेर तें आहे असें मला वाटलें, पण त्याचा मोह न सुटल्यामुळें मीं एक आवाज टाकला. आवाज खाली जाऊन जनावर हुकलें असें मनांत येऊन मी विमनस्कपणें उभा राहिलों होतों, इतक्यांत, 'जनावर लागलें' म्हणून कोणी तरी खिळयाच्या बाजूनें ओरडलें. धावतच मी चढण चढून गेलों. सुमारें एक फर्लांगावर गेल्यावर, तें सरळ 'झाड' होऊन आपल्याभोंवतींच फिरलें आणि जमिनीवर आपटलें. जवळ जाऊन पाहिलें तों तें पाय खुडीत होतें, म्हणून आणखी एक गोळी त्याचें डोक्यांत घातली तेव्हां तें लांब झालें. जवळच्या नेपताडाच्या झाडा-खालीं सावलीला जाऊन मींहि माझा श्रांत झालेला देह लांबवून दिला. पडल्या पडल्याच खिशांतून काढलेली सिगारेट शिलगावली आणि पुढील योजना मनांतलें मनांत आखूं लागलों. क्षणभर मी अशा स्थितींत पडलों असेन, तोंच मला एकाएकीं हिराची आठवण झाल्यामुळें ताबडतोब मी तिकडे निघालों. तिघांचौघांनीं त्याला ढापाखालून मोकळा करून, लिंबाच्या पाल्यावर घोंगडी अंथरून एका झाडाखालीं निजविलें होतें. आमच्यापैकीं चौघा इसमांस

हिरास झोळींत घालून आमचे मुक्कामाचे जागीं नेण्यास सांगून, पुनश्च हरिः ॐ म्हणून सकाळीं हेरून ठेवलेली डाडर असलेल्या, बेटाचे पश्चिम बाजूच्या टेकाडापलीकडच्या आळ्याकडे तातडीनें वळलों. शिरवळ पडूं लागल्यामुळें राहिलेला कार्यक्रम झटपट उरकावयास पाहिजे होता. अपेक्षित ठिकाणीं येतांच, तेथें इतस्ततः चरत असलेलीं गुरेंढोरें पार हाकून काढलीं आणि गुरांच्या वर्दळीनें सकाळचे माग खुर्दळून गेले असल्यामुळें, जाग्यावरच जनावर हेरून मारावें म्हणून, हाके न घालतां बंडू रामोशास बोळींत कोंबला. त्यानें बाहेर येऊन जनावर खोपेंतच स्वस्थ पडून आहे म्हणून सांगितलें. जनावर उठवावें, कीं जाग्यावरच मारावें असा आतां मला मोठा विचार पडला. बोळींत शिरून आवाज टाकणें म्हणजे आपल्या हातानें आपणांवर संकट ओढवून घेण्यासारखें होतें. जनावर जागचे जागींच जाम झाल्यास ठीक; नाहीं तर आमची धडगत नव्हती याबद्दल वादच नव्हता. माझे मनाचा कांहीं निश्चय होईना. रामोशी मंडळीस विचारतां, 'भलताच धडा करण्यांत अर्थ नाहीं,' असाच त्यांचा अभिप्राय पडला. मीं टाकलेला आवाज कदापि खाली जाणार नाहीं, असा मला आत्मविश्वास होता; परंतु जनावर पोकळ मार्शी लागल्यास कसें ? वगैरे विचारांनीं माझें मन द्विधा झालें होतें.

विद्युद्वेगानें एक कल्पना माझे मनांत चमकून गेली. शिकारीचे सरंजामांत बरोबर नेहमीं दोन भाले ठेवण्याचा माझा रिवाज असे. त्यांपैकीं एक बंडूजवळ देऊन, त्यास 'अवचुकून जनावर धावून आल्यास त्यास तूं, मी बंदूक भरीपर्यंत कसें तरी रोखून धर' म्हणून सांगितलें.

एका क्षणांत, मी अंगावरचे कपडे उतरून टाकून, बंदूक भरून बंडूस घेऊन आंत शिरलों. बंडूनें जनावर दाखवितांक्षणींच 'हुश्शार'चा खुणेनेंच इशारा केला आणि एकामागें एक दोन आवाज टाकले; तों ती डाडर पुढल्या दोन पायांवर उभी होऊन त्वेषानें कचाकच निवडुंगाच्या फण्या चावून टाकीत असलेली मला दिसली. घामानें माझें अंग डबडबून निघालें. कंबर आणि मागला फरा मोडून गेल्यामुळें 'मूव्ह' घेण्याचें सामर्थ्य तिच्यांत राहिलें नव्हतें. आमचें नशीब शिकंदर असल्यामुळेंच असें घडून आलें. नाहीं तर आम्हां दोघांचाहि केव्हांच 'हिरा' झाला असता !

बंदूक खोलून पुन्हा काडतुसें भरण्याइतकी पैस जागा तेथें नव्हती. जरा

हाल्चाल केल्यास सर्वांगास कांटे आणि कुसें लागून जीव हैराण होई. बंडू-जवळून काडतुसें घेऊन कशी तरी मीं बंदूक भरली, आणि तिचें मस्तक वेधून पुन्हा आवाज टाकला तेव्हां ती पडली. बंडू व मी मागें सरकत सरकत—शिस्तींत माघार घेत म्हणा हवें तर—एकदांचे बोळीबाहेर पडलों. बाहेर येतांच आम्हांस 'हायसें' वाटलें !

उत्साहामुळें जणूं नवजीवन प्राप्त झाल्याप्रमाणें मला झालें होतें. अंगाचीं कुसें वगैरे झाडून काढिलीं आणि जवळच—बांडगीं असलेल्या पीलाकडे जाण्याचे इराद्यानें, लोकांस तिकडे चलण्याबद्दल इशारा दिला. आतां ते जरा कंटाळल्यासारखेच झाले होते. मी त्यांना, 'डाडरीवर काढिलेल्या आवाजांनीं तीं सावध झालीं असल्यामुळें आतां तीं दम काढणार नाहींत, बाहेरूनच दगड वगैरे टाकून कोलाहल केल्यास तीं भडाभड बाहेर पडतील' वगैरे लांब-लचक व्याख्यान झोडल्यावर ते तयार झाले.

अक्षरशः मीं म्हटल्याप्रमाणें झालें. एकामागें एक पांच-सहा बांडगीं भडाडलीं, आणि माझ्या बंदुकींतून सुटलेल्या दोन्ही गोळ्यांनीं दोघांचा बळी घेतला. राहिलेलीं चारीं बांडगीं फिरवून, शेजारच्या आळ्यांत घालण्यास या वेळीं मोठी नामी संधि होती. पण गहाळ पडल्यामुळें माझे लोकांकडून तेवढें होऊं शकलें नाहीं.

सूर्यास्ताचा सुमार झाल्यामुळें आम्हीं खेळ संपविला, आणि गाड्या बोलावून घेऊन आमची सबंध दिवसाची कमाई त्यांतील एका गाडींत लादली.

बेटांत जाऊन मी पंतांस भेटलों आणि एकंदर वृत्तांत त्यांस निवेदन केला. गाडीपाशीं बेटांतील भगत मंडळींची झुम्मड उडाली होती. पंतहि गाडीकडे आले आणि गाडीकडे एक दृष्टिक्षेप टाकून, माझे पाठीवर प्रेमानें थाप मारून एक प्रकारें त्यांनीं माझें अभिनंदन केलें. पंतांस अभिवादन करून आणि त्यांची परवानगी घेऊन आम्हीं तेथून कूच केलें.

* * *

आतां चांदणें टिपूर पडलें होतें. आमचा प्रवास मोठ्या मौजेनें सुरू झाला. अंतराळांत टिटव्यांचा तारस्वर आंदोलत होता. माझेबरोबरचे लोक रस्त्याचे कडेच्या शेतांतील शाळूचीं रसभरित ताटें बेदिक्कतपणें आसडीत चालले होते.

शेताशेतांनीं शेतकऱ्यांनीं कोप्या घातल्या होत्या, आणि त्यांचेपुढें बाटकीं बांधलेल्या जनावरांच्या दावणी मोठ्या मनोरम दिसत होत्या. लक्ष्मीनें आपलें सारें वैभव जणूं रानांत विखरून दिलें होतें. भुकेनें माझ्या पोटांत आकांत केल्यामुळें पुण्याचे मंडळींनीं शिल्लक ठेविलेलीं थालीपिठाचीं अर्धुकें आणि करंज्यांचीं टरफलें आधाशाप्रमाणें मी भरीत होतों. डोलींत घालून चालविलेला हिरा, झालेल्या वेदनांनीं व्याकुळ होऊन विव्हळत होता; आणि रामोशीच ते! 'सागुती खावयास हवी का?' म्हणून साऱ्या वाटेनें त्याच्या खिल्ल्या करीत होते!!

झंकार,
१८ एप्रिल १९४३

## अपहार : : ५

सूर्य अस्तास गेला होता तरी पश्चिमेकडच्या क्षितिजावर थोडा थोडा प्रकाश अजूनहि दिसत होता. ससे चरणावर निघण्याची वेळ केव्हांच होऊन गेली होती, पण त्या चिमुकल्या प्राण्यांचा आज कोठेंच पत्ता नव्हता. त्या नदीप्रमाणें रुंद पात्र असलेल्या ओढ्याच्या मऊ वाळवंटांत स्वैर स्वच्छंदानें बागडणारे व तीरावरल्या हिरवळींत दोन पायांवर बसून कानोसा घेतां घेतां मध्येंच तृणांकुर कुरतडणारे ते माणकाप्रमाणें लाल डोळ्यांचे पिटुकले प्राणी, आज कुठें रमले होते कुणास ठाऊक! सभोंवतीं आणि दूरवर न्याहाळून पाहतां पाहतां माझे डोळे ताठून गेले होते. उगाचच मीं मागें वळून पाहिलें तों, पश्चिम बाजूच्या त्या सपाट माळाच्या मध्यभागीं तीन लांडगे पायांनीं कांहीं तरी खरवडल्यासारखें करीत उभे असलेले मला दिसले. आतां माझ्या मनांतली सशांबद्दलची आशा पार नाहींशी झाली होती; आणि पुढें काय होतें तें पाहत मी अगदीं स्तब्ध बसून राहिलों होतों. त्या लांडग्यांच्या जवळ जाऊन त्यांच्यावर आवाज टाकणें शक्य नव्हतें. लपत छपत जाण्यास अडचण अथवा झुडपें नव्हतीं, आणि ते लांब बंदुकीच्या टप्प्याबाहेर होते.

दोन-तीन जागीं चांचणी पाहून त्यांनीं एका भुसभुशीत जागीं आपल्या पंजांनीं माती उकरण्यास सुरुवात केली आणि थोडीशी खाच केल्यावर त्यांतील एक लांडगा, डोकें तेवढें वर काढून, त्या खाचेंत पालथा पसरून पडून राहिला. त्याच्या दोस्तांनीं आपल्या मागल्या पायांच्या पंजांनीं त्याच्या शरीरा-वर हळुवारपणानें माती पसरली, आणि नंतर ते दोन्ही लांडगे दोन दिशांनीं, लांबून वळसा घेऊन कोठेंसे निघून गेले.

मी विचार करीतच राहिलों. कांहीं तरी अद्भुत घडत असल्यासारखें मला वाटलें. थोडाच वेळ मध्यें गेला असेल तों, हरणांचा एक खांडवाच्या खांडवा पश्चिमेकडून उधळत नीट माझ्या रोखानें येत असल्याचें मला दिसलें. पश्चिमेचा वारा असल्यानें आणि मी पूर्वेला ओढ्याचे कडेला काटवणांत छपून बसलेला असल्यामुळें, त्या हरणांस माझ्या बंदुकीचा वास लागला नसावा

आणि एखाद्या धनगराचें अथवा शेतकऱ्याचें कुत्रें मागें लागल्यामुळें तीं उधळलीं असावींत असा माझा तर्क झाला. तों मघा दोन्ही बाजूंनीं निघून गेलेले ते दोन्ही लांडगे त्या भेदरलेल्या हरणांच्या खांडव्याच्या दोही बगलांनीं धावत येत असल्याचें मला स्पष्ट दिसलें.

आतां माझ्या डोक्यांत लख्ख प्रकाश पडला. आणि त्या जंगली– पाशवी डोक्यांची ती अजब करामत पाहून मी आश्चर्यानें तोंडांत बोट घालून राहिलों!

फासेपारधी फासे लावून ज्याप्रमाणें हरणें वळवून आणून त्यावर घालतात त्याप्रमाणें मोठ्या हिकमतीनें, त्या दोघां लांडग्यांनीं आपल्या त्या गाडून घेतलेल्या दोस्ताचे अंगावर तो खांडवा वळवून आणिला होता. एक मध्यमसर काळा ( काळवीट ) आवाक्यांत येतांच त्या खाचेंतल्या लांडग्यानें एकदम झेप घालून त्या काळ्यास जायबंदी केलें, तरीहि तो जिवाच्या आशेनें तसाच पळत राहिला होता. इतक्यांत त्याचे दोन्ही दोस्त येऊन तेथें भिडले आणि त्या तिघांनीं त्या काळयास ठार केलें. त्या काळ्यानें मरतां मरतां आपल्या त्या दुष्ट शत्रूंस माझ्या बंदुकीच्या टप्प्यांत आणून सोडण्याची कामगिरी न कळत बजावली होती. त्या तिघांनींहि एकवार आपली शिकार हुंगून पाहिली, आणि विजयी मुद्रेनें आकाशाकडे बघत मागल्या दोन्ही पायांनीं ते माती उकरूं लागले.

चार नंबरचीं काडतुसें काढून टाकून, मीं दोन बक्शॉट् आपल्या बंदुकींत भरले आणि संथपणें शिस्त धरून मीं माझ्या बंदुकीचे दोन्ही ट्रिगर एकामागें एक ओढले. त्या त्रिकुटांतले दोघे तत्काळ ठार झाले, आणि तिसरा विलक्षण भेसूरपणानें दांत विचकीत आणि आपली केसाळ शेपूट वारीत वारीत काळोखांत दिसेनासा झाला.

त्या भुकेनें वखवखलेल्या जंगली श्वापदांनीं आज मोठ्या धूर्ततेनें आपल्या उपाहाराची तजवीज केली होती; पण त्यांच्या दुर्दैवानें त्यांच्या 'उपाहाराचा' अपहार झाला होता!

वाङ्मयशोभा,
मे १९४३

# एका दगडानें तीन पक्षी ! : : ६

[ एक इतिहासकालीन कथा ]

काय ! एका दगडानें त्यांनीं तीन पक्षी मारले ?

होय. खरोखर एकाच दगडानें त्यांनीं तीन पक्षी—प्रतिपक्षी मारले !

शहाजी राजे यांचें वय त्या वेळीं बहात्तर वर्षांचें होतें. पराक्रम आणि मुत्सद्देगिरी यांचा त्यांचे ठिकाणीं अद्वितीय मिलाफ झालेला होता आणि ते अद्यापि 'सेवानिवृत्त' झाले नव्हते.

त्यांचा सारा जन्म, इकडचीं राज्यें तिकडे करण्यांत, आणि युद्धें व स्वाऱ्या-शिकारींतच गेला होता. इतरांच्या दृष्टीला ते वृद्ध झाल्यासारखे दिसत होते, पण त्यांना स्वतःला मात्र तसें वाटत नव्हतें. रिकाम्या वेळींहि हल्लींच्या सेवा-निवृत्तांप्रमाणें, त्यांनीं कधीं दशावतारी गंजिफा आपल्या हातांनीं चाळविण्याचा चाळा केलेला नव्हता; अथवा हाडकांचे फासे झेलतां झेलतां पटावरच्या सोंगट्या उधळून 'पोबारा' केला नव्हता.

राजांस शिकारीचा अतोनात छंद होता आणि आतां तर दुसरा व्याप कांहींच न राहिल्यामुळें, शिकार हेंच त्यांना करमणुकीचें एकमेव साधन वाटत होतें.

ती १६६४ च्या जानेवारीची तेविसावी तारीख होती आणि वार शनिवार होता.

* * *

बेदनूरकर नाईक हे विजापूरच्या अदिलशहाचे ताबेदार असतां, अलीकडे ते त्यास जुमानीनातसे झाले होते आणि आपणांस 'स्वतंत्र' म्हणवून घेऊं पाहत होते. महाराष्ट्रांत शिवाजी राजांचा स्वराज्यसंस्थापनेचा उद्योग अव्याहत सुरू होता आणि कर्नाटकांत, राजांनीं, आपले धाकटे पुत्र व्यंकोजी यांस तंजावरचें राज्य ( नव्हे जहागिरी ) प्राप्त करून दिलें होतें, तरीहि राजे आपणांस अदिल-शहाचे दोस्त, आणि वेळ पडल्यास 'एकनिष्ठ सेवक' म्हणवून घेतच होते.

बेदनूरकरांचा काटा काढील असा हिंमतबाज लायक माणूस त्या वेळीं विजापूरच्या दरबारांत कोणी नसल्यामुळें, अदिलशहानें शहाजीराजे यांजकडे ती कामगिरी सोपविली आणि त्यांचे मदतीस विजापुराहून मोठी फौज आणि हरएक प्रकारची युद्धसामुग्री रवाना करून दिली.

एका पंधरवड्यांतच राजांनीं बेदनूरकरांस नेस्तनाबूद केलें आणि अदिल-शहानें राजांचा मोठा गौरव करून त्यांजवर बहुमूल्य देणग्यांचा नुसता वर्षाव केला.

बेदनुराहून परत येत असतां तुंगभद्रेच्या तीरीं, बसवापट्टणनजीकच्या 'होद्देगिरी'* या लहानशा गांवीं राजांच्या फौजेचा तळ पडला होता. राजे आज आपल्या डेऱ्यांत स्वस्थ चित्तानें हुक्का पीत बसले होते. त्यांच्या डोक्यांत कांहीं तरी विचार चालल्याप्रमाणें त्यांची मुद्रा दिसत होती. " एका दगडानें आपण आज तीन पक्षी मारले! बेदनूरकरांचें पारिपत्य करण्यांत आपले तीन हेतु साध्य झाले. आपला दोस्त अदिलशहा यानें आपणांवर सोपविलेली कामगिरी फत्ते झाली, निकटच्या सान्निध्यामुळें तंजावरच्या गादीस पुढेंमागें उपसर्ग पोंहोचण्याचा संभव होता तो नाहींसा झाला, आणि तिसरी गोष्ट म्हणजे शिवाजी राजांच्या राज्यविस्ताराचे कामीं विरोध करणारा एक भावी प्रति-स्पर्धीहि नाहींसा झाला!"

शहाजी राजांची मुद्रा एकदम कमालीची प्रसन्न दिसूं लागली, आणि वर उद्धृत केलेले विचार मनांत येऊन ते स्वतःशींच स्मित करीत राहिले.

क्षणभरानें ते उठले आणि डेऱ्यांतल्या डेऱ्यांत इकडून तिकडे येरझारा घालूं लागले. त्यांनीं आपल्या खासगी चिटणिसांस आंत बोलावून घेतलें आणि ताबडतोब रानांत निघण्याची तयारी करण्याचा त्यांनीं हुकूम दिला. राजांनीं शिकारीचा खास पेहेराव आपल्या खिदमतगारांकरवीं अंगावर चढ-विला आणि प्रवेशद्वारापाशीं येऊन ते उभे राहिले.

---

* म्हैसूर संस्थानच्या हद्दींतल्या शिमोगा जिल्ह्यांत तुंगभद्रेच्या तीरावर 'होद्देगिरी' गांव असून तेथें शहाजी राजांची छत्री आहे, आणि छत्रीचे खर्चाकरितां 'येरगटनहळ्ळी' हा गांव अदिलशहानें लावून दिलेला आहे. पुण्याच्या भारतेतिहास संशोधक मंडळाच्या खटपटीनें अलीकडे समाधीची पूजाअर्चा वगैरे व्यवस्था फार उत्कृष्ट होत असते. माघ शुद्ध पंचमीला राजांच्या पुण्यतिथीचा उत्सवहि होत असतो.

थोड्याच वेळांत, राजांचा 'सारंग' मोतद्दारानें डेऱ्याचे प्रवेशद्वाराशीं आणून खडा केला. राजांनीं एकवार तंगांतून बोटें फिरविलीं आणि रिकिबींत पाय ठेविला. राजांच्या हातांतल्या भाल्याचें रुपेरी पातें चम्‌चम् करीत तळपत होतें आणि 'सारंग' मोठ्या डौलानें माना फेकीत इशाऱ्याची वाट पाहत होता.

'येरगटनहळ्ळी' गांवाच्या रोखानें सर्वांनीं घोडे वेगानें फेकले, आणि अस्तमानाच्या सुमारास मंडळी गांवाच्या सीमेवरच्या सपाट शिवारांत येऊन दाखल झाली.

दूरवर लांब लांब शिंगांचा एक एकांडा काळा राजांचे नजरेस पडला आणि तत्क्षणीं राजांनीं त्याचे रोखानें वायुगतीनें घोडा फेकला. लवणालवणानें लांबून वळसा घेऊन त्यांनीं त्यास गाठला आणि तो आवाक्यांत येतांच त्यावर जोरानें भाला फेकला.

एक सफाईदार तिरकस किरण घेऊन तो काळा उडाला आणि राजांकडे मुरडत मुरडत बघत तो टिपण टाकीत निघाला.

राजे आतां बेभान होऊन गेले होते. ओढेनाले ताड्ताड् उडत त्यांचा 'सारंग'हि बेहोषपणानें कुदत होता. राजांनीं निमिषार्धात त्या काळ्यास पुन्हा गाठलें आणि राजांच्या हातांतील भाला त्याच्या बरगडींतून आरपार निघाला. इतक्यांत—

'सारंग'चा पाय खालीं जमिनीवर फैलावलेल्या एका वेलीच्या भेंडोळ्यांत गुंतला व राजे आणि तो भयंकर जोरानें दोन वाव अंतरावर जाऊन पलटी खाऊन पडले.

'सारंग'च्या साऱ्या हाडांचा चुराडा होऊन गेला होता, आणि राजांची मान मोडून त्यांचें प्राणोत्क्रमण झालें होतें!

ती १६६४ च्या जानेवारीची तेविसावी तारीख होती आणि वार शनिवार होता!!

तो काळवीट, 'सारंग' आणि शहाजी राजे असे तीन पक्षी, एकाच अणकुचीदार दगडानें त्या कृतांतकाळानें याच दिवशीं मारले!!!

वाङ्मयशोभा,
जून १९४३

---

# गिरीमच्या वाघळ्यांतील तीन दिवस : : ७

पाटस गांवापासून दौंड रस्ता जातो, तेथून समांतर अशी एक डोंगराची ओळ जाते. आणि दुसरी कुरकुंभ घाटाकडून येते ती गिरीमच्या शिवारांत घुसते. या दोन डोंगरांच्या ओळींच्या खोपाडांत पांचसहा इसमांच्या जमिनी असून, त्या त्यांनीं ओढून आणि ताली वगैरे घालून नीटनेटक्या केलेल्या होत्या. डोंगरावरील पावसाचें पाणी आणि पाण्याबरोबरच खिल्लारांच्या मेंढरांच्या लेंड्यांचें खत वाहून येऊन त्या जमिनींतून साठून राहतें, आणि यामुळें इतरत्र अवर्षण असलें तरी, या मंडळींच्या शेतांतून बागायती पिकासारखें पीक येतें. ज्येष्ठाच्या अखेरीस एक मोठा वाहवणी पाऊस झाला होता, आणि या पांचसहा इसमांच्या ताली भरून राहिल्यामुळें यांच्या जमिनीला चांगल्या ओली होत्या आणि वापसा होतांच त्या त्यांनीं पेरूनहि काढिल्या होत्या.

असें होतें तरी, तें आलेलें पीक पूर्णपणें त्यांच्या पदरांत असें कधींच पडत नसे. 'दैव देतें आणि कर्म नेतें' अशी त्यांची अवस्था होती. शेताच्या दोहों बाजूंस डोंगरांवर दाट निवडुंग आणि जंगल असून भकास ओशाडी होती; आणि बरींचशीं मोठमोठीं जुनाट रानजनावरें ( रानडुकरें ) तेथें कायम वस्ती करून राहिलीं होतीं. अंधार पडला कीं डोंगर उतरावयाचा, एखाद्या हक्कदारासारखें या शेतांतून मनमुराद चरावयाचें, खाल्ल्याच्या दसपट मस्तवालपणानें पाडावयाचें आणि तांबडें फुटल्यावर आपापल्या गर्दोडांतून जाऊन दिवसभर खुशाल घोरत पडावयाचें, असें त्यांचें आज कैक वर्षांचें वेळापत्रक ठरून गेलें होतें ! शेतकऱ्यांच्या त्या भिकार कुत्र्यांचा त्यांना हिशेबच नव्हता आणि उखळीबाराला त्यांचे कान चांगले सरावले होते.

पाटसला रामोशांचा भरणा मोठा होता. मजुरी करून ते आपला उदरनिर्वाह करीत आणि कोठें कामधंदा नच मिळाल्यास, खांद्यावर वाघरा टाकून जंगलचा रस्ता धरीत. त्यांतल्या कांहींजणांना सरकारी कामगिरीबद्दल प्राचीन कालापासून जमिनी इनाम होत्या. आणि अद्यापहि त्या ते वहिवाटून खात आहेत.

सालोसाल अशी नुकसानी सोसावी लागत असल्यामुळें, गिरीमच्या या पांचसहा शेतकरी मंडळींनीं पाटसच्या रामोशी मंडळीला पिकाचा पंचादेवीचा वाटा देण्याचें कबूल केलें, आणि त्यांनीं डोंगरांतील कायम वस्ती करून राहिलेलीं हीं टपकळ जनावरें, जितकीं मारतां येतील तितकीं मारावींत असें ठरलें. आणि असा मनसुबा करून ते एके दिवशीं दहावीस रामोशांसह माझ्याकडे आले. त्यांचा पुष्कळसा फायदा सहजासहजीं होत असल्यामुळें, मी या कामांत मोडना घालणार नाहीं; उलट करतां येईल तितकी मदतच करीन याची अर्थात् त्यांना खात्री होती.

त्यांचा मनसुबा मीं ऐकून घेतला. मोठमोठीं जनावरें मारिलीं तरी बारीकसारीक जनावरें अगदीं टिपून मारणें शक्य नव्हतें, आणि दूरवरच्या जंगलांतून दुसरीं जनावरें येऊन पीक खाऊन गेल्यास यांच्या करारांत वांधे येण्याचा संभव होता. 'काम होऊन गेल्यावर, तुम्हीं आपला शब्द पाळाल याला काय हमी ?' म्हणून मीं त्या शेतकऱ्यांना विचारिलें असतां, 'आम्ही तसें लिहून देतों, आणि तेवढ्याकरितांच आम्ही तुमच्यापर्यंत आलों', असें ते म्हणाले.

पाटसचे हे रामोशी गरीब होते, तरी त्यांच्यांतील कांहींजण मोठे इराद्याचे होते, आणि त्यांचा विश्वासघात करणें जरा जोखमीचेंच होतें. गिरीमकरांपासून करार लिहून घेण्याची कांहीं तितकीशी जरूर मलाहि वाटत नव्हती; पण एकवार हडसून खडसून त्यांना बजवावें म्हणून त्यांच्याशीं मीं वरीलप्रमाणें भाषा केली होती. खुंटा जास्त बळकट बसविण्याकरितां मीं तो हालविला होता.

* * *

आज पहाटेसच उठून मीं स्नान केलें. मंगलमूर्तीचें दर्शन घेतलें. चहा घेतला आणि खांद्यावर बंदूक टाकून घराबाहेर पाऊल ठेविलें. वारा गार वाहत होता. पूर्वेकडे आकाश तांबडें लाल झालें होतें, आणि माथ्यावरचा चंद्र ॲनीमियानें ग्रासलेल्या रोग्याप्रमाणें फिका पडला होता. मळ्याशिवाय साऱ्या शिवारात कोठें मोड दिसत नव्हता. शेतें काळींभोर दिसत होतीं आणि माळ उन्हाळ्यांतल्याप्रमाणें तांबडसर होते. जुन्या आणि नव्या–दोन्ही

तळवांत पाण्याचा एक टिपूसहि नव्हता. ओढयानाल्यांना पाणी नसल्यामुळें, लान्हेलीं हरणें मळयाच्या आसपास रेंगाळत होतीं; पण त्यांच्याकडे लक्ष पुरवण्यास आज मला फुरसद नव्हती.

'गोलांडी'वर दोघे-तिघेजण माझी वाट पाहत बसले होते आणि बाकीचे गडी त्यांनीं पुढें रवाना करून दिले होते. खेळाला सुरुवात झाल्यावर भाकरी खाण्यास बनेल न बनेल, म्हणून त्यांनीं न्याहऱ्या उरकून घेतल्या आणि गोलांडीच्या पायऱ्या उतरून ते पाणी पिऊन आले.

बोलत चालत आम्ही वाघळ्यांत येऊन पोंहोचलों. वाघळ्यांत आमचीं माणसें कोठें आढळेनात, म्हणून रामोशांच्या पठारापर्यंत आम्हीं डोंगरप्रदेश पालथा घातला आणि विसांवा घेण्याकरितां त्या सुळक्यावरल्या एका गोट्यावर टेकलों. थोड्याच वेळानें, वाघदरीच्या चढणीवरून येत असलेले आमचे गडी दिसले. त्यांना पालवून आम्हीं येथें असल्याबद्दल त्यांना इशारा दिला. शिरसाईपासल्या लहानशाच पण दाट ढापांत, दोन मोठीं जनावरें गहाळ पडून आहेत अशी वर्दी त्यांनीं दिली.

एक मिनिटहि आम्हांला आतां तासाच्या ठिकाणीं होतें. द्रुतगतीनें आम्ही निघालों आणि एका घटकेंत शिरसाईच्या आळयाजवळ आलों. आळयाभोंवतीं हिंडून माग सोडविला आणि तय्यार झालों. फरा धरून, धपाधप रामोशी निवडुंग पांडीत चालले. क्षणभरांत तोंडाशींच असलेलें जनावर उठलें आणि नीट मी उभा असलेल्या बारीवर निघालें. माझ्या बंदुकींतून सुटलेली गोळी त्याच्या बरगडींतून पार गळयापर्यंत जाऊन रुतली आणि जनावरानें जमीन धरली.

सावज जितकें धट्ट आणि रगेल असेल तितकें शिकाऱ्याला इष्टच असतें; भेकड आणि दुबळीं जनावरें तोंडें चुकविण्याचेंच पाहतात आणि मस्त जनावरें आपण होऊन शिकाऱ्याची कार्यसिद्धि करून देतात.

* * *

आंतले गडी हलचलले आणि वीत वीत सुळे असलेलें दुसरें जनावर भलत्याच बाजूनें बाहेर भडाडलें. त्याला मोडून माझ्या बारीवर घालविण्याकरितां त्या बाजूला उभ्या असलेल्या दोघांतिघां गड्यांनीं खूपच धेंगट केली आणि बंडू

नांवाच्या रामोशानें त्याच्या मागल्या फऱ्यावर फरशीचा जोराचा वार केला. वेगानें दूरवर गेलेलें तें जनावर त्वेषानें तसेंच फिरलें आणि बंडूच्या बरगडींत एक जोराची ठोस लावून त्याला त्यानें जमिनीवर लोळविलें. वर्मी मार बसूं नये म्हणून पडल्यापडल्याच बंडूनें त्याच्या तोंडांत आपला पंजा दिला, तों त्या पिसाळलेल्या जनावरानें त्याच्या पंजाचीं चारीं बोटें तासल्याप्रमाणें खुडून टाकलीं! मी धावतच तेथें गेलों. बंडूची ती स्थिति पाहून माझें सर्वांग थरारलें. जनावर त्याच्या अंगाशीं भिडलेलें असल्यामुळें मला गोळीहि घालतां येईना. इतक्यांत ते दोघे गडी तिकडून धावले आणि त्या जनावराला भिवविण्या-करितां मीं एक आवाज नुसताच खाली काढला. त्या गड्यांनीं केलेल्या फरशीच्या जोरकस प्रहारांमुळें तें चांगलें जरबलें, तेव्हां तें बंडूला सोडून पळूं लागलें आणि एका क्षणांत, करवे पाडलेली 'लेशेलची' गोळी चरचरत त्याच्या काळजांत घुसली.

झाडून सगळेजण गोळा झाले. त्यांच्यांतल्या एका माहीतगार इसमानें बंडूचा रक्तानें निथळत असलेला पंजा नीट बांधला. निखळलेली बरगडी जेथल्या तेथें बसवून वर तिळवणीचा पाला कुसकरून बसविला आणि पागोट्यानें सर्व बरगड्या व छाती ठीकठाकपणानें लपेटून घेतली.

खरें बोलावयाचें म्हणजे, आज शिकार फर्मास होऊन गेली. दोन जुनाट जनावरें थोड्याच अवधींत खतम झाली.

बंडू अशा रीतीनें घायाळ झाल्यानें रामोशांचा हुरूप कमी न होतां त्यांना जास्तच चेव आल्यासारखा झाला, आणि रागानें त्यांचे डोळे जरा विस्तृत झाल्यासारखे दिसले.

घरून गाडी आणण्याकरितां एकदोघांना पिटाळून आम्ही सर्व बंडूभोंवतीं गप्पा छाटीत बसलों. बंडू मोठ्या धीराचा गडी होता. इतका जायबंदी झाला असतांहि त्यानें तोंडावाटे एकहि दुःखोद्गार काढला नाहीं!

समोर दूरवर गाडीचा धुरळा उठलेला दिसला आणि आम्ही डोंगर उतरूं लागलों. तापलेल्या डोंगरावरून येणाऱ्या झळया जीवास बेचैन करीत होत्या. आमच्याबरोबर माठांत घेतलेलें पाणी तापून गेल्यामुळें बंडूला पाजण्यास गार पाणीहि जवळ नव्हतें. खालीं उतरून येतांच पहिल्यानें गोलांडीवरून माठ

भरून आणविला आणि बंडूला भरपूर गार पाणी पाजलें. आतां तो जरा हुशार झाला.

गाडींत पेंढ्या अंथरून वर तळवट टाकून बंडूला त्यावर व्यवस्थेशीर निजविलें आणि दोन जाणतीं माणसें बरोबर देऊन त्याला दौंड येथें रवाना करून दिला. बोर्डाच्या दवाखान्यांत आस्थेनें रोग्याची व्यवस्था आणि शुश्रूषा होत नसल्यामुळें मीं त्याला ऑस्ट्रेलिअन मिशनच्या दवाखान्यांत पोंहोचाविण्यास सांगितलें आणि खिशांतली कागद-पेन्सिल काढून, तेथील डॉक्टरांना देण्यास चिठीहि लिहून दिली. सर्वांच्या विचारानें दोन दिवसांपुरता शिकारीचा कार्यक्रम तहकूब ठेविला. "सकाळीं मी समक्षच दौंडाला येतों, काळजी करूं नकोस," असें मीं बंडूला सांगितलें आणि माझ्या गड्यासह मीं घरचा रस्ता सुधारला.

* * *

दोन दिवसांनीं पहाटेस पुन्हा मीं खांद्यावर बंदूक टाकून आपल्या कामगिरीवर निघालों. वाटेनें उठलेले दोन ससे फटकावले आणि जरा पुढें जातों तोंच, रामोशांचें टोळकें मला आडवें आलें त्यांच्या स्वाधीन ते करून टाकले. लगेच त्यांनीं ते सोलले, थोडेंसें कस्तण जमा केलें, आणि तें पेटवून त्यांत ते चांगले खरपूस भाजून काढले. प्रत्येकानें एकेक तुकडा हातांत घेतला, आणि तो चघळीत चघळीत मोठ्या खुषींत ते वाट चालूं लागले.

आज पंचपंच उषःकालीं मीं माझ्या रानवट परंतु चालत्या बोलत्या देवाला नाजुक साजुक ताज्या मांसाचा नैवेद्य अर्पण केला होता. देवगण प्रसन्न होता, आणि एकंदर रागरंगावरून आज शिकारीची बहार उडणार असें माझ्या मनाला वाटत होतें. गप्पागोष्टी करीत करीत आम्ही आमच्या नियोजित स्थळीं येऊन दाखल झालों.

एवढ्यांतच ऊन्ह चटकूं लागलें होतें. गड्यांनीं एकवार तंबाकूच्या चिमट्या तोंडांत सोडल्या आणि ते माग बघण्यास निघाले.

* * *

सूर्य आतां माथ्यावर आला होता. रामोशी गडी इकडून तिकडे चाचपडत हिंडत होते. या बाजूला मोठमोठे ढाप असूनहि खालीं कातळ असल्यामुळें

माग नीटसे उमगत नव्हते; म्हणून सरसकट रान उठवीत जावें असें ठरलें आणि मीं एका मोक्याच्या बाऱ्यावर जाऊन उभा राहिलों.

चांगला एक तास होत आला. हाक्यांच्या आरोळ्यांनीं रान दुमदुमून गेलें होतें. धडाधड निवडुंग तुटून पडत होता; पण जनावरांचा ठावठिकाणा कांहीं लागेना. आणखी थोडा वेळ गेला. दोन मोठीं जनावरें कडेपर्यंत सरलीं आहेत, म्हणून आंतल्या गड्यांनीं आरोळी दिली आणि डोळयांत तेल घालून मी त्यांची वाट पाहत बसलों. बराच वेळ गेला पण जनावरें बाहेर पडेनात! कडेपर्यंत काढिलेलीं जनावरें उलटलीं आणि फरा धरलेल्या माणसांना घासून तीं पुन्हा दाट निवडुंगांत दिसेनाशीं झालीं.

सर्व गडी बाहेर निघाले. आतांपर्यंतची सारी मेहनत व्यर्थ झाल्यामुळें ते तापून गेले होते. पाण्याच्या दोनहि घागरी त्यांनीं खलास केल्या आणि पुन्हा ते पूर्व टोकाकडून रान उठवीत पश्चिमेकडे झपाट्यानें येऊं लागले.

अर्धा तासहि पुरा झाला नव्हता, तोंच तीं मघांचीं दोनहि जनावरें बोल-विल्याप्रमाणें माझ्यासमोर निघालीं. मीं तोंड फिरविलें आणि दोघांनाहि आडवे घेऊन दोघांवर दोन आवाज टाकले. पळतां पळतांच बंदूक पुन्हा भरली आणि त्या जनावरांजवळ गेलों; पण त्यांच्याकरितां आतां गोळी खर्च करण्याचें कारण राहिलें नव्हतें.

सारे गडी बाहेर निघाले आणि त्या जनावरांभोंवतीं जमले. तीं मरून पुढें पडलीं होतीं, तरी त्यांच्यावर दांतओठ खात ते त्यांना शिव्या हासडीत होते!

दुसरी फसल होण्यास अद्याप पुष्कळ अवसर होता; म्हणून वेळ न दवडतां सात-आठ निवडक गडी मीं माग टेहळण्यास पुनश्च रवाना करून दिले. इतक्यांत गिरीमकर शेतकरी मंडळी डोंगर चढून वर आली आणि आमच्या जवळ येऊन बसली. त्या मरून पडलेल्या जोडीकडे त्यांनीं नजर लावली आणि ते बेहद्द खूष झाले. पहिल्या दिवशीं अशींच दोन जनावरें मारल्याचें, आणि आमचा एक गडी जायबंदी झाल्याचें त्यांना अवगत होतेंच. गंमत पाहण्याकरितां आज ते आले होते. त्यांस मी जरा एकीकडे जाऊन बस-ण्यास सांगितलें आणि आवाज होईपर्यंत आपली जागा सोडूं नका म्हणून बजाविलें.

मागावर सोडलेले गडी परत आले. एका आळ्याभोंवतीं पुसट पुसट माग होते; पण ते शिळे असल्यासारखे दिसत होते. तरी पण आळ्यांत एकादें तरी जनावर असावें असा त्यांचा होरा होता.

शिरवळ पडावयाच्या आंत काय तो सोक्षमोक्ष करून घ्यावयास हवा होता.

वेळ न दवडतां गडी आळ्यांत शिरले आणि हाका टाकूं लागले. आळ्याच्या मध्यापर्यंत गडी आले असतील, तोंच एक डाडर (डुकरांतली मादी) आपल्या सात-आठ लहान पिलांसह बाहेर पडली. समोर माणसांचा जमाव दिसतांच तीं बांडगीं गोंधळून गेलीं, आणि त्यांतील दोन-तीन पुन्हा उलटून आळ्यांत शिरलीं. ती डाडर आपल्या पिलांकरितां थोडीशी घोटाळल्यासारखी झाली आणि म्हणूनच माझ्या बंदुकींतून सुटलेल्या गोळीला बळी पडली !

दिवसभर श्रांत झालेले गडी घटकाभर हाशहुश् करीत बसले. आणि नंतर तीं तिन्ही जनावरें शिंकाळून नेण्याकरितां, गोलटे वगैरे तोडून आणण्याच्या तजविजीला लागले.

दिवस पार गेला आणि आम्ही खालीं उतरावयास लागलों; इतक्यांत वाटेच्या डाव्या हाताकडच्या झांपांतून दोन मध्यमसर जनावरें आपल्या मनानेंच उठलीं आणि म्हसोबाच्या दऱ्याकडे निघून गेलीं.

आपल्या दृष्टीनें देखलेलीं दोन फक्कड जनावरें, केवळ वेळेच्या अभावीं सायसंगीन निघून गेलीं म्हणून माझ्या मनाला मोठी हळहळ वाटली. या वेळीं सूर्याला अर्घ्य देण्याचें तर दूरच राहिलें, पण त्यानें लवकर 'काळें' केल्याबद्दल मनांतल्या मनांत मी चडफडत मात्र होतों.

* * *

रोजच्यापेक्षां आज मी पुन्हा लवकर उठलों. प्रातर्विधि उरकले आणि चहाऐवजीं पुढें आलेली सुंदर आणि स्वादिष्ट कॉफी यथेच्छ प्यालों. माझी सहचरी नित्याप्रमाणें माझ्या खांद्यावर चढून बसली, तोंच कोंबडयानें दुसरी साद टाकली आणि मीहि घराबाहेर पडलों.

क्षीण चंद्र प्रकाशाऐवजीं धुकेंच उधळून राहिला होता. झपाझप मी रस्ता काटीत होतों. बिरोबाच्या पायथ्याशीं येतों तों तांबडें फुटावयास लागलें होतें. थोड्याच वेळांत माझे सहकारीहि गांवच्या बाजूनें येत असलेले दिसले.

कालच्या वर्दळलेल्या रानांत खेळण्यापेक्षां 'रोटदरा' जरा दूर असतांहि आम्हीं आज तिकडेच मोर्चा फिरविला. पण तेथें येतों तों आमची जवळ जवळ निराशा होण्याचा रंग दिसला. बरेचसे वैदू लोक कोल्हीं धरण्याकरितां रानांत भटकत होते. आणि त्यांच्या कुत्र्यांनीं सारें जंगल जागें करून दिलें होतें. आम्ही तेथून परत फिरणार, इतक्यांत कांहीं वैदू आमच्यापाशीं आले आणि 'दोन-तीन जनावरें मावलाईच्या आळ्यांत उठलीं आणि लळईत निघून गेलीं' म्हणून त्यांनीं वर्दी दिली. तुम्ही म्हणत असाल तर, तुम्हांस आम्ही जनावरें एवढ्यांतच निघून गेल्याचे ताजे माग दाखवितों आणि आम्ही आपला खेळ बंद ठेवितों; पण शिकार झाल्यास, आमच्या आशेचाहि हिरमोड होऊं नये असें ते म्हणाले. पहिल्यानें तुम्ही आपलीं कुत्रीं येथून काढून न्या असें मीं त्यांना सांगितलें; त्यांच्यापाशीं जनावरावर सोडण्यासारखीं मोठीं कुत्रीं नव्हतीं. नाहीं तर जनावरांची खबर प्राण गेल्यानेंहि ते आम्हांस देते ना!

त्यांनीं आपलीं कुत्रीं पालावर रवाना करून दिलीं आणि त्यांच्याबरोबर आम्ही माग पाहण्यास निघालों. माग अगदीं ताजे होते. जनावरें लळईच्या एका कोपऱ्यांवरील ढापांत शिरलीं होतीं. ज्या ढापांत तीं शिरलीं होतीं, त्याच्या एका अंगाला खोल ओघळ होती. ओघळीच्या पलीकडल्या दरडीवर मी जाऊन उभा राहिलों. माझ्या माणसांना आणि त्या वैदांना तिन्हीं बाजूंनीं फरा धरून, नेटानें तीं जनावरें ओघळींत उड्या घेतील अशा प्रकारें प्रयत्न करा म्हणून बजाविलें, तुम्हांस मी राजी करीन म्हणूनहि त्या वैदांस आशा दाखविली.

डोहांतली सुसरहि आपल्या कल्ल्यानें आणि आरडाओरडीनें बाहेर काढणारे ते वैद! त्यांनीं कमाल केली. त्यांचे घसे पिंजून गेले, आणि माझे कानहि तो गोंगाट ऐकून बधिर झाले. रामोशांनींहि सात जन्मींच्या वैऱ्यासारखी निवडुंगाची नुसती कत्तल उडवून दिली. जनावरांना बाहेर पडण्यास मुष्किल झाली. एक जनावर फऱ्यांतून बाहेर पडावयास बघत होतें. त्याच्यावर एकदम तिघांचौघांचे फरशांचे वार पडले, आणि कांकडी चोंचवावी त्याप्रमाणें त्यांनीं त्याची दुर्दशा करून टाकली. बाकीच्या दोन्ही जनावरांनीं निरुपायानें

ओघळींत उड्या घेतल्या. माझी बंदूक त्यांच्याकरितांच खोळंबून राहिली होती. तींतून सुटलेल्या दोन्ही गोळ्यांनीं त्या दोघां जनावरांना गाढ आलिंगन दिलें आणि तीं तेथेंच मऊ मऊ रेतीवर आरामशीर पहुडलीं. आमची आजची पाहिली फसल अनपेक्षितपणें सोळा आणे यशस्वी झाली.

तिन्ही जनावरांत, रामोशांनीं ठार केलेलें जनावर फारच मस्त आणि मोठें होतें. पण त्यांनीं बंडूचा सूडच जणूं त्यावर उगविला होता. शिकाळून नेण्याच्या स्थितींत तें राहिलें नव्हतें, म्हणून मीं तें त्या वैदांस देऊन टाकलें. ते कल्पनेबाहेर खूष झाले, आणि मला मुजरा करून आपल्या पालांवर निघून गेले.

* * *

दिवस कलला होता. ठरलेल्या कार्यक्रमाप्रमाणें आज तिसऱ्या दिवसाची शेवटली फसल होती; आणि तींत पहिल्या फसलीप्रमाणेंच यश आल्यास त्यांस घरबसल्या चार महिन्यांची चंदी प्राप्त होणार होती.

आम्ही आतां माथ्यावरल्या पसाऱ्याच्या दाट आळ्यापाशीं आलों आणि गडी फिरून मागावर सोडले. सर्वांना कमालीचा हुरूप आला होता, आणि ते आज कांहीं तरी विशेष कामगिरी करून दाखविणार असें त्यांच्या उल्हसित चेहऱ्यांवरून स्पष्टपणें व्यक्त होत होतें.

शिरवळ पडण्याचा सुमार झाला होता. गड्यांनीं एक मोठें जनावर जाग्यावरच हेरलें आणि मला वर्दी देण्यास एकजण धावतच मजकडे आला. मी झपाट्यानें तें जनावर असलेल्या आळ्याकडे गेलों आणि अंगांतले कपडे काढून फेकून दिले. बंदूक भरली. काडतुसांचा पट्टा गळ्यांत घातला आणि माझ्या सहकाऱ्यांबरोबर आंत शिरलों. दहापांच हात आंत गेलों असेन नसेन, तोंच जनावराला आमची चाहूल लागली आणि समोरच्या बोळींतून जनावर बाहेर भडाडलें आणि नंतर आम्हीहि बाहेर पडलों. जनावर, त्याच पठाराच्या अगदीं कडेला असलेल्या ढापांत शिरलें. गडी लगोलग त्याच्या मागें धावले आणि त्यांनीं तिन्ही बाजूंनीं त्या ढापाला वेढा टाकला. ढापाच्या चौथ्या अंगाला भिंतीसारखा उभा कडा तुटलेला होता आणि पहिल्या फसलींत, ओघळींत त्या दोन जनावरांच्या झालेल्या प्रकाराचीच पुनरावृत्ति येथें होण्याचा

संभव होता. मी गडयांना, " आपली शर्थ करा, पण जनावर फऱ्यांतून जाऊं देऊं नका, आणि त्याला कडयाच्या बाजूस माझ्या अंगावर काढा " असें सांगितलें. त्यांनींहि मला, " काय वाटेल तें झालें तरी आम्ही जनावर फऱ्यांतून जितें बाहेर जाऊं देत नाहीं," असें आश्वासन दिलें आणि मी कडयाच्या बाजूला असलेल्या निमुळत्या सुळक्यावर एका नेपताडाच्या झुबक्याच्या आड सावधपणानें बसून राहिलों. जनावर सावधच होतें. तें बोलबोलतां बाहेर पडलें, आणि आपला काळ येथें आपली वाट पाहत असल्याचें न उमगल्यामुळें माझ्या अगदीं जवळून जाऊं लागलें. मी सावकाशपणें, त्याचें मस्तक लक्षून आवाज टाकला. आणि काय आश्चर्य ! पांचचार हात जाऊन तें त्या चौदाशें-साडेचौदाशें फुटांच्या कडयावरून एकदम खालीं गडगडलें ! ! !

मीं आजपर्यंत सिनेमांतले पुष्कळ आश्चर्यकारक देखावे पाहिले असतील, पण या वेळीं मीं जो देखावा पाहिला तसला रोमांचकारी, अद्भुत देखावा मीं उभ्या आयुष्यांत पाहिला नव्हता. एखाद्या लॉटरींत लाख रुपये मिळाल्यानेंहि झाला नसता, इतका आनंद मला या वेळीं झाला.

तीन दिवसांचा नियोजित कार्यक्रम आज पुरा झाला होता इतकेंच नव्हे, तर अपेक्षेपेक्षांहि जास्त फलदायी झाला होता.

विविधवृत्त,
११ एप्रिल १९४३

---

# कष्टसाध्य शिकार : : ८

सर्व शिकारींत खराब शिकार असेल तर ती हरणांची.

सिंह, वाघ, हत्ती आणि रानडुकरें या श्वापदांच्या शिकारी तुलनात्मक दृष्टीनें पाहिल्यास कमी आयासाच्या आणि सुखाच्या. खर्चावयास जवळ पैसा, अंगांत थोडेंसें धैर्य आणि आपल्या हत्याराची खात्री; एवढ्या तीन गोष्टी असल्या म्हणजे या बड्या म्हटल्या गेलेल्या शिकारींत दुसरें कांहीं विशेष कौशल्य लागत नाहीं. हरणांच्या शिकारींत जिवास धोका नाहीं ही गोष्ट खरी असली तरी, इतर पुष्कळच गुण हौशी शिकाऱ्यास पैदा करावे लागतात. काटकपणा, उपासतापास काढण्याची सवय, उन्हातान्हांत फिरण्याची तयारी पाहिजे. मिजासखोरपणास फाटा दिल्याशिवाय समाधानकारक शिकार लाभूं शकत नाहीं.

हरणांच्या शिकारीसारखे कष्ट दुसऱ्या कोणत्याहि शिकारींत नाहींत. नादी शिकाऱ्याला खाण्यापिण्याचीहि शुद्ध कशी ती राहत नाहीं. पाठीशीं भाकरी बांधलेल्या असतांहि बरोबरचीं माणसें उपाशी मरतात. गाडीचीं जनावरेंहि चारापाण्यावांचून उपाशी मारावीं लागतात. डोळ्यांपुढें हरणांचा खांडवा दिसत असतां सूर्य मावळला तर किती हळहळ वाटते, तें फक्त 'जावें त्याच्या वंशा तेव्हां कळे!' फिरणें किती होतें याचा पत्ताच नाहीं. उन्हातान्हांत सारखे आठ-आठ, दहा-दहा घंटे भटकतां भटकतां जीव क्लांत होऊन जातो. पण त्या वेळीं त्याचा कांहीं शीण वाटत नाहीं. जवळचीं काडतुसें खलास झालीं आणि खिशांतले पैसे सरले म्हणजे शिकाऱ्याला घराची आठवण होते आणि मग मात्र त्याला परत फिरणें भाग पडतें. डुकरांच्या शिकारींत, घोड्यावरची शिकार फार खर्चाची, धोक्याची आणि अवघड. तट्टीच्या शर्यतींत 'माउंट्' मिळालेल्या जॉकीचें जीवित आणि स्टिक् हातीं घेऊन रिकिबींत पाय घातलेल्या शिकाऱ्याचें जीवित अक्षरशः पाण्याच्या बुडबुड्याप्रमाणें क्षणभंगुर!

भयंकर व क्रूर श्वापदांच्या शिकारी वस्तुतः कठीण वाटावयास हव्यात; पण

त्या तशा नसतात याचें कारण, या श्वापदांस आपल्या सामर्थ्याबद्दल असलेला फाजील आत्मविश्वास. स्वभावजन्य हिंस्रपणामुळें आणि मस्तीमुळें तीं शिकाऱ्यास कस्पटासमान समजून, जीव बचावण्याची विशेष कोशिस न करतां बेगुमानपणें शिकाऱ्यावर तुटून पडतात आणि हकनाहक प्राणांस मुकतात.

पण या हरणांची जात फार इरसाल ! हरणें बंदुकीच्या–दारूच्या–वासामुळें आणि तीक्ष्ण नजरेमुळें शिकाऱ्यास फार दूरवरून हेरतात. शिकाऱ्याच्या अंगावरून वारा हरणांच्या खांडव्याकडे वाहत असेल तर खांडवा कधींच एके जागीं ठरावयाचा नाहीं. हरणांची जात अगोदरच मनस्वी चपळ आणि हराम. त्यांतच अंगांत अनेक हिकमती. स्वतःच्या खांडव्यास तर तीं बचावतीलच, पण आपल्या इतर भाईबंदांसहि तीं इशारा करून सावध करतात. खांडव्यावर आवाज टाकला तरी तो हमखास लागू होईलच असें नाहीं. निश्चल उभ्या असलेल्या हरणांस चांगला निशाणबाज लीलेनें पाडील, पण रबरी चेंडूसारख्या उशा घेत घेत, किंवा पायांस स्प्रिंगा लावल्याप्रमाणें टण-टणा उडत धावणारीं हरणें मारण्यास हात फारच सरावलेला आणि अंगांत फारच कौशल्य लागतें. शिकाऱ्यास हेरल्यानंतर, 'काळे' शिकाऱ्यास वेध घेण्यास अवसरच मिळूं देत नाहींत. ते सारखीं किरणें घेत राहतात आणि किंचित् संधि सापडतांच पसार होतात. याशिवाय इतरहि विघ्नें व अडथळे शिकाऱ्याच्या मार्गांत थोडेथोडके असतात असें नाहीं. सावज जागच्या जागीं ठार झाल्यास ठीक. तसें न झाल्यास शिकाऱ्याची फार परवड उडून जाते. शिकाऱ्याबरोबर, लागलेल्या सावजाच्या मागानें जाण्यास माणसें असतातच. पण ज्वारीच्या शेतांतल्या माळ्यावर बसून राखण करीत बसलेलीं माणसें, सागुतीच्या आशेनें त्यांची मुद्दाम दिशाभूल करून त्यांना चकवितात.

सावज लागून कोठें तरी ज्वारीच्या उभ्या शेतांत किंवा अडचणींत–झाडा-झुडपांत जाऊन पडतें. लागलेलें जखमी सावज एकदां एके जागीं सुस्तावून पडलें कीं तें थोड्याफार वेळानें मरतें. तें वांचूं शकत नाहीं. पण तें शेतकऱ्यांची किंवा कोणी पाहिलेलेंच नसल्यास, रात्रीं कोल्ह्या-लांडग्यांची किंवा दुसऱ्या दिवशीं घारी-गिधाडांची धन होऊन बसतें. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे हरणांची शिकार चांगल्या शिकाऱ्याचीहि पुरी दमछाक करून टाकते. अगदीं पहाटे व शिरवळ पडल्यावर मात्र हरणें जरा गहाळ पडतात. हरणांच्या

शिकारीचा खरा मोसम ज्वारीच्या हंगामांतच असतो. त्या दिवसांत सारें शिवार माणसांनीं फुलून गेलेलें असतें.

*　　　*　　　*

आज मी केवळ हरणांच्या शिकारीकरितांच रानांत निघालों होतों. दोन-तीन दिवसांचा कार्यक्रम ठरवून त्या बेतानें काडतुसें व शिधासामुग्रीहि बरोबर घेतली. अवशींच उठून मुखमार्जन करून चहा घेतला आणि थोडीशी न्याहारी करून आम्हीं लगेच रस्ता सुधरला. थंडी चांगलीच चमकत होती. वाटेनें गप्पागोष्टी करीत हळूहळू आम्ही कडेठाणच्या शिवारांत येऊन दाखल झालों. या भागांत रात्रीं थोडासा पाऊस शिंतडल्यासारखा दिसत होता. त्या शिडशिडीत शिवारांत फारशीं हरणें दृष्टीस पडलीं नाहींत. आम्ही तसेच पुढें चाललों. सादलगांवच्या रोखानें जात असतां, हातवळणाच्या शिवारांत नदीच्या अलीकडे, एका मळ्याच्या बाडीजवळ एक एकांडा 'बामण्या' ( पिंवळ्या रंगाच्या काळविटास 'बामण्या' म्हणतात. याचें चमडें 'काळ्या'-पेक्षा पुष्कळ नरम असतें. ) माझ्या नजरेस पडला. मीं गाडी तेथेंच उभी केली आणि पायउतार होऊन बंदूक घेऊन मळ्याच्या रोखानें निघालों. वारा बिलकुल नसल्यामुळें त्या बामण्यास बंदुकीचा वास लागण्याची धास्ती नव्हती. मळ्यांत पोंहोचतांच त्या बाडीआडून, सरळ तो बामण्या उभा होता त्याच्या वरल्या अंगानें जाऊन किंचित् डोकें वर काढून पाहिलें तों, तो बामण्या आमच्या गाडीकडे जराशा साशंक दृष्टीनें पाहत उभा असलेला दिसला. मीं बंदूक खवाट्यास जोडली आणि सावकाशपणें त्याच्या बरगडीवर शिस्त धरून ट्रिग्गर खेचला. बिचारा जागच्या जागीं, 'कानांत गोष्ट सांगि-तल्याप्रमाणें' पडला आणि आमची 'भवानी' तर झाली. आवाज होतांक्षणींच गाडीवानानें गाडी दामटली आणि माझ्यापुढें आणून उभी केली. तो बामण्या, त्याचा कोठा काढून टाकून मागें खुटल्यास आडवा टांगला आणि नदी ओलांडून आम्ही सादलगांवच्या शिवारांत शिरलों. सादलगांवच्या शिवारांत आम्हांस कांहींच लभ्यांश झाला नाहीं. वाटेंत एका मळ्यांत चहा बनविला आणि मळेकऱ्यानें भाजून दिलेला थोडासा हुरडा चावून आम्हीं इनाम-गांवाकडे कूच केलें.

इनामगांवाच्या शिवारांत अस्तमान होईपावेतों खेळून रात्रौ त्या गांवांतच मुक्काम केला. आजची सर्व कमाई मीं गांवकऱ्यांस नजर केली. अर्थातच माझ्या गाडीच्या बैलांस वैरण आणि बरोबरच्या गडयांची जेवणाखाण्याची सर्व प्रकारची बडदास्त गांवकऱ्यांनीं उत्कृष्ट प्रकारें ठेविली हें सांगणें नकोच.

पहाटे उठून पिंपळखुटीचें शिवार ओलांडून आम्ही शिरसगांवकांटा या गांवीं आलों. शिरसगांवच्या डोंगराळ आडसरांत तुरळक हरणें नजरेस पडलीं. खूप अदखून अदखून आणि पायपिटी करून, शिखळ पडण्याच्या सुमारास एक काळा खतम केला; आणि घोडनदीच्या किनाऱ्याला असलेल्या एका लहानशा कुरणाच्या कडेकडेनें पाण्यावर निघालेला-पांच-सहा सुंदर काळे असलेला एक मोठा खांडवा दृष्टीस पडल्यावरून आम्हीं तिकडे मोर्चा फिरविला, गाडी रस्त्यावर अगदीं मधोमध उभी केली; आणि एका बाजूनें माझीं माणसें आणि दुसऱ्या बाजूनें मी त्यांच्या पाठीवर जलदीनें निघालों. तो हरणांचा खांडवा आतां पूर्णपणें आमच्या आडसऱ्यांत आला होता.

समोर नदीचें पात्र, एकीकडे माझीं माणसें, दुसऱ्या बाजूस मी आणि परत फिरण्याच्या मार्गावर मध्यभागींच उभी असलेली माझी गाडी. शिरसगांवच्या शिवारांतल्या त्या हरणांना त्या वेळीं सुतराम् डंकर्केचा आभास झाला असेल.

तो खांडवा बेहाय गांगरून गेला. त्या मोहक प्राण्यांचे काळेभोर टपोरे डोळे, सुटकेचा एकादा निर्धोक फट्टा कोठें दृष्टीस पडतो कीं काय हें हेरण्याच्या इराद्यानें एकवार चहूंकडे गरगरा फिरले आणि हताश होत्साते, ते गडबडून गेलेले दीन प्राणी क्षणभर जागच्या जागींच किरणें घेत राहिले. किरणें घेतां घेतां त्या मुक्या प्राण्यांनीं खचित कांहीं तरी निर्णय घेतला असावा! आतां तीं हरणें एकदम उसळल्यासारखीं झालीं, आणि त्यांचा सर्वस्वी निरुपाय झाल्यामुळें त्यांनीं शेवटीं धडाधड त्या भरल्या नदींत उडया घेतल्या!!

त्या खांडांतले काळे सर्वच्या सर्व टिपून मारणें म्हणजे कांहीं मोठेंसें कौशल्य नव्हतें. पण सर्वतोपरी असहाय झालेल्या त्या जीवांस अशा प्रकारें खिंडींत गाठून मारणें केवळ निर्घृणपणाचें होईल असें माझ्या मनास वाटल्यामुळें, मीं त्यांवर गोळी न चालवितां हातांतील बंदूक खालीं ठेवली आणि स्वस्थ चित्तानें तो हृदयंगम देखावा पाहत तीरावर बसून राहिलों. माझ्या मनांतल्या

भूतदयेच्या भावनेला शिकारीच्या प्रसंगीं मी कधीं डोकें वर काढूं देत नसे. पण काय असेल तें असो, आज माझें ब्राह्मण-अंतःकरण जातीवर गेलें एवढें खरें! थोडयाच वेळांत तीं हरणें पैलतीराला लागलीं आणि आनंदानें उडया घेत रानांत दिसेनाशीं झालीं.

त्या कुरणापासून जवळच एक छोटेंसें ओंबळ होतें. ओंचळांतलें ज्वारीचें पीक हुरड्यावर आलेलें असल्यामुळें त्या ओंबळाच्या धन्यानें तेथेंच वस्ती टाकली होती. आमच्या गाडीच्या बैलांस वैरण आणि आम्हांसहि चहाकरितां दूध त्या ओंबळाच्या धन्याकडून मिळाल्यामुळें आम्हीं रातोरात तेथेंच नदीच्या कडेला मुक्काम ठोकला. थोडासा फराळ करून, पहाटे लवकर उठून चिंचणी-बोरी नांवाच्या जरा दूरच्या गांवीं जावयाचें असल्यामुळें, विशेष जागत न बसतां आम्हीं पथाऱ्या पसरल्या आणि झोपीं गेलों.

* * *

चिंचणीचा शिवार आणि सभोंतालचा तिन्ही गांवांच्या सीमाप्रांतावरला शिवार म्हणजे जणूं काय शोकीन शिकाऱ्याला मनसोक्त खेळण्याकरितांच निसर्गानें निर्माण केला होता. त्या लहान लहान शेंकडोंशें टेकड्या, आणि त्यांच्या आडसरा आडसरांतून स्वैर विहरत असलेलीं तीं असंख्य हरणें बघूनच शिकाऱ्याचें मन गार होऊन जातें. गाडीचें येथें कामच पडत नाहीं. गोट्यांचें रान असल्यामुळें गाडींतून शिकार होणें सर्वथा अशक्य. दूरवरच्या इतक्या अंतर्भागांत पुण्याच्या बाजूचे शिकारी बहुधा फिरकत नसल्यामुळें, आणि सडया शिकाऱ्यास अतोनात कष्ट घेतल्यावांचून शिकार मिळण्यासारखी नसल्यानें, फार करून शिकारी इकडे झुकत नाहीं. या डोंगराळ भागांत हरणांचा विशेष भरणा असण्याचें दुसरें कारण म्हणजे हरणांस मानवेल असा आखूड आखूड गोडवा चारा आणि नितांत ओसाडी. मनमुराद चरावें, नदीवर जाऊन तहान शमवावी आणि जोगावल्यावर, पठारावरच्या बाभुळबनांतल्या शीतळ छायेंत रवंथ करीत सुखानें कालक्रमणा करावी; अशा अनुकूल स्थितींत हा भाग म्हणजे हरणांचें माहेरघरच बनून गेला होता यांत नवल कसचें!

* * *

कोवळें ऊन्ह साऱ्या पठाराची रोषनाई करीत करीत पुढें सरत होतें.

कोवळ्या चिकाऱ्यांचा खुराक खाऊन खाऊन तुंद पडलेले 'काळे' एक-मेकांशीं लढत खेळून राहिले होते, आणि टपोऱ्या डोळ्यांच्या गोंडस हरिणी आपल्या गोजिरवाण्या पाडसांस स्तनपान देत ठिकठिकाणीं थबकल्या होत्या. क्षणभर तोहि आनंद अनिमिष नेत्रांनीं मीं अनुभविला आणि नंतर मीं आपली दृष्टि त्या संमोह पाडणाऱ्या देखाव्यावरून काढून घेतली.

माझीं माणसें निरनिराळ्या मेट्यांवरून आडोसा धरून बसलेलीं मीं पाहिलीं आणि 'हरिः ॐ' म्हणून मीं पहिला नमनाचा आवाज टाकला. आडसरा-आडसरांनीं त्या आवाजाचे प्रतिध्वनि उठले आणि सारा डोंगरपठार जणूं काय स्पंदन पावल्यासारखा झाला. आतां थंडपणा धरून भागण्यासारखें नव्हतें. त्वरित हलणाऱ्या शिकाऱ्यास शिकारीचें अजीर्ण होईल असें मोक्याचें क्षेत्र, आणि त्यांतच ही पर्वणी आलेली होती !

फडाफड आवाज काढीत सैराटासारखा मी पळत होतों. सारें लक्ष सावजां-कडे लागून राहिल्यामुळें, दोन-तीन वेळां मीं त्या गोट्यागाट्यांच्या खडबडीत खबदाडांतून आपटी खाल्ली असेल; पण त्याचा विधिनिषेध होता कुणा लेकाला ! शिकारीचा मजा असा भरमसाट मीं क्वचितच लुटला असेल.

शिकार जाग्यावर नेऊन रिचवितां रिचवितां माझीं माणसें दमांतून निघालीं. गाडीपाशीं काळ्यांचा खच पडला आहे असें गडी म्हणूं लागले. माझ्या हातांची शिरशिरी मोडली, आणि यापुढें अधिक रक्तपात करणें म्हणजे त्याला अघोरीपणाचें स्वरूप आल्यासारखें होणार होतें म्हणून, मीं बंदूक खालीं ठेविली, आणि खूप वेळ सिगरेट पिण्यास न मिळाल्यामुळें एकामागें एक दोन-तीन सिगरेटा फुंकून पायथ्याशीं सोडलेल्या गाडीकडे निघालों. गाडीजवळ चिंचणी-बोरीची बरीच मंडळी जमून बसली होती. माझ्या गांवीं नेण्याकरितां तीन मध्यमसर काळे निवडून काढले, आणि माझी सर्व कमाई– चमडीं माझ्या गांवीं पावतीं करण्यास बजावून–त्या दोन्ही गांवच्या गांवकऱ्यांस वाटून दिली.

मुक्कामाच्या ठिकाणीं गाडी पोंहोचल्याबरोबर मीं पहिल्यानें पथारी पसरली. चहा अथवा दुसरें कांहीं खाण्याचें अगत्य माझ्या श्रांत देहास आज राहिलें नव्हतें.

* * *

कोंबड्यानें पहिली साद टाकली. आम्ही मुखमार्जन करून चहाच्या उद्योगास लागलों. राघूनें सामानसुमानाची बांधाबांव करून जूं बैलांच्या खांदांवर ठेविलें, आणि चहा ढोसून आम्ही ताबडतोब घराची वाट चालूं लागलों. घराघरांनीं जातीं घरघरूं लागलीं होतीं, आणि कुणब्यामाळ्यांच्या बायका जात्यावर बसून काढीत असलेले हेल या वेळीं कानांस तितकेसे वाईट लागत नव्हते. वेस ओलांडून आम्ही गांवकुसाबाहेर पडलों. वाऱ्याची गार झुळूक झुळझुळत होती. घराच्या ओढीनें गाडीचीं जित्राबेंहि पाय उचलून चाललीं होतीं आणि त्या काळ्याभोर शिवारांत फिरून फिरून कंटाळल्यामुळें, आमच्या गाडीचीं दोन्ही चाकें वरचेवर वंगण पाजलें असतांहि एकसारखीं कुरकुरत होतीं.

वाङ्मयशोभा,
ऑक्टोबर, १९४३

## पाडस



जरा ऊन्ह उतरलें तोंच आम्ही हललों. रेल रस्ता ओलांडून पांचचार नंबरच आम्ही आलों, तों हरणांचा एक लहानसा खांडवा ओढ्याचे वरचे अंगास चरत असलेला मला दिसला. गाडी तेथेंच उभी केली आणि मी पायउतार होऊन निघालों. कोरफडीच्या दाट बेटांतून वाट काढीत काढीत एका वारुळाजवळ गेलों आणि वारुळाआडून एका काळ्यावर आवाज टाकला. रबरी चेंडूसारखी उशी खाऊन काळा उडाला, आणि पलीकडची बोडकी मात्र नाहक प्राणास मुकली. मला पराकाष्ठेचा विषाद वाटला; पण झाल्या गोष्टीस माझा इलाज नव्हता. मीं गाडी बोलावून घेतली. शिडींत ती बोडकी टाकली आणि वर दोन पेंढ्या अंथरून आम्ही पुढें निघालों. थोडें पुढें जातों तों, दोघे-तिघे हरिजन शेताचे बांधानीं तरवड ढाळीत असलेले दिसले. त्यांस बोलावून ती बोडकी त्यांना देऊन टाकिली, आणि आम्ही पुढें चाललों.

सरासरी मैल दीड मैल आम्ही आलों असूं; तों मानसशास्त्राचा (!) एक अद्‌भुत चमत्कार माझे नजरेस पडला. एक धनगर आपलें मेंढरांचें खांड एका पडकांत चारीत बसला होता. त्याचे खांडव्यांतील एक मेंढरूं ओघळीचे बाजूस जरा लांबलें होतें, पण त्या धनगराचे लक्षांत तें आलें नव्हतें. आम्ही ओघळ ओलांडून किंचित् पुढें निघतों तोंच एक लांडगा त्या लांबलेल्या मेंढराचे रोखानें काटवणाचे कडेकडेनें मुरत चाललेला मीं पाहिला. गड्यास मीं गाडी उभी करण्यास सांगितलें. निमिषार्धांत तो लांडगा जाऊन त्या मेंढरास भिडला आणि त्यानें त्याचा कान पकडला. तो लांडगा नेईल तिकडे तें मेंढरूं, हरणाचें पाडस आपल्या आईमागें धावतें त्याप्रमाणें, त्याचेबरोबर पळत जात होतें. तें स्वतःचें अस्तित्व पार विसरून जाऊन त्या लांडग्याशीं तद्रूप होऊन गेलें होतें. मी हा प्रकार पाहतांच, लांडग्यास माझी चाहूल न लागेल अशा बेतानें, त्या ओघळीचे कडेस आलों; तों तोहि वरच्या बाजूनें त्या काटवणांत आपलें सावज घेऊन आला. त्यानें त्या मेंढराचा कान सोडला

आणि आतां त्याचें नरडें फोडणार, तों मी अतिशय जलदीनें त्यावर आवाज टाकला. तो लांडगा मरून-पुढें आडवा पडला. आपल्या कानाजवळ बंदुकीचा आवाज झाला तरी त्या मेंढरानें नुसता कानसुद्धां झटकला नाहीं. मी त्याच्या-जवळ गेलों आणि हलक्या हातानें त्यास थापटलें. पण त्याला या गोष्टीची खबरहि नव्हती. रोवल्याप्रमाणें तें तेथें उभें होतें!

मीं गड्यास बोलाविलें आणि तें भेदरलेलें मेंढरूं त्या धनगरास नेऊन देण्यास सांगितलें. "लांडग्याच्या तोंडचें काढून जरी तुम्हीं तें मला दिलें आहे, तरी तें आतां एकाद-दुसऱ्या दिवसावर वांचू शकणार नाहीं." असें तो धनगर माझे गड्यास म्हणाला.

मनाशीं आश्चर्य करीत मी गाडीपाशीं आलों. तिन्हीसांजांचा सुमार झाला होता. 'हातवळणा'चे शिवारांत, नदीचे कडेलाच एक लहानसा मळा होता, तेथें आम्हीं मुक्कामास जाण्याचा विचार केला. आज फारसें रान तुडवावें न लागल्यामुळें बैल पाउंडावर चालले होते. पश्चिमेकडचा वारा वारेमाप वाहत होता. विरुद्ध दिशेस तोंडें फिरवून आम्ही बसलों होतों, तरीहि चाकांनीं उडालेली माती दोहों बाजूंनीं आमचे डोळ्यांत भरत होती. समोरून आलेल्या एका भाडोत्री गाडींत हातांत रायफली आणि गळ्यांत दुर्बिणी अडकविलेले दोघे गोरे एखाद्या दिग्विजयी वीराप्रमाणें, पिंगट बुटांत अडकाविलेले आपले पांढरे पाय, मागें खुटल्यास टांगलेल्या निर्जीव हरिणीचे सफेत पोटावर ठेवून मोठ्या अकडींत बसले होते; आणि माझ्या बरोबरचे गडी त्यांच्याकडे बघत, एकमेकांस कांहीं संकेत करीत, डोक्याचीं पागोटीं तोंडावर धरीत होते!

* * *

तांबडें फुटावयाच्या सुमारास गाईच्या ताज्या दुधाचा लोटा घेऊन मळ्याचा मालक गाडीपाशीं येऊन मला हाका मारूं लागला तेव्हां मी जागा झालों. कशानें काय कीं, मला आज कमालीचें आळसल्यासारखें झालें होतें. विहिरी-वर जाऊन मुखमार्जन करून पहिल्यानें चहा ढोसला तेव्हां जराशी हुशारी वाटली. चांगला कासराभर दिवस आल्यावर आम्हीं प्रस्थान ठेविलें आणि सादलगांवचे रस्त्यास लागलों. सादलगांवचे शिवारांत आलों, तों कांहीं

फांसेपारध्यांनीं नंबरागणिक फांसे लावून ठेविलेले दृष्टीस पडले. ते हरणें वळवून आणून त्यावर घालणार हें उघडच होतें. त्या बिचाऱ्यांच्या खेळाचा 'खंडोबा' होऊं नये म्हणून आम्हीं तेथून दूर जाण्याचें ठरविलें. दिवस माथ्यावर आला तरी आज आमची 'भवानी'हि झाली नव्हती. इनामगांवचे डोंगरबारीस आल्यावर मात्र आम्हांस एक चिन्कारा मिळाला. वाटेनें खेळत खेळत मुक्कामास आज घरीं जावयाचें असें ठरवून सादलगांवावरूनच परत फिरलों. तेथल्या लहानशा कुरणांत वडगांवचे पस्तीस-चाळीस लोक खेळत होते. कुरणाची उत्तर बाजू मोकळी असून दक्षिणेस नदीचें पात्र होतें. बाकी सर्व बाजू बंदिस्त होत्या. पूर्व बाजूनें दोन बाऱ्यांवर त्यांनीं दोन वाघरा लाविल्या होत्या. त्यांतील एका वाघरींत एक पाडस गुंतून वाघर पडली आणि तीवरून बोल बोलतां सर्व खांडवाच्या खांडवा पार झाला. त्या खांडव्यांतील एखादा दुसरा काळा मला सहजासहजीं पाडतां आला असता; पण तसें करणें शिष्टाचाराविरुद्ध असल्यामुळें मीं तो मोह आवरून धरला. दिवस पुष्कळ असल्यामुळें आम्ही गाडी उभी करून मौजेनें त्यांचा खेळ पाहत बसलों होतों.

त्यांचा खेळ खलास झाला, आणि ते सगळे लोक कुरणाचे बाहेर पडले. त्यांचेबरोबर खेळासंबंधीं गप्पा करतां करतां सहज, "या पाडसाची चटणी तरी तुमच्या प्रत्येकाच्या वाटयास येईल काय ?" म्हणून मीं त्यांस विचारलें. "तें पाडस तुम्हीं मला पाळावयास द्या, आणि त्या ऐवजीं मीं तुम्हांस, एक सोडून दोन मोठे काळे देईन," असें त्यांस म्हणालों. त्यांस माझा विश्वास येईना. मीं पांच रुपये त्यांचेपाशीं हडप ठेविले, आणि "चार-पांच दिवसांत तुम्हांस तुमचे गांवीं दोन काळे आणून देईन, मग तुम्हीं आमचे पांच रुपये आम्हांस वापस द्यावेत," असा त्यांच्याशीं ठराव केला.

पाडस घेऊन आम्हीं निघालों. काळोख पडण्याचे आंत नदी ओलांडावी अशा इराद्यानें बैलांस पराणी दिली. मुकीं जनावरें तीं; पण फूं होऊन गेलीं. ईर्षेनें त्यांचे पाय जमिनीवर ठरत नाहींतसे झाले. आकाशांत धुळीचे लोट उठून राहिले आणि उजेडांतच आम्ही नदीपार झालों.

* * *

पाळावयाच्या इराद्यानें मीं तें पाडस आणलें खरें, पण आपल्या आईस अंतरलेलें तें पाडस चारा खाईना कीं पाणीहि पिईना. घाबरल्यामुळें तें दुपारच्या

ऐन उन्हांतहि हुडहुडी भरल्याप्रमाणें कांपत होतें. दोन-तीन दिवस त्यास मी बोळ्यानें दूध पाजीत होतों. पण तें घोटण्याइतकाहि त्याचा जीव थारीं नव्हता. अखेर चौथ्या दिवशीं त्यानें आपली जीवनयात्रा संपविली.

पांच रुपये म्हणजे बाब काय! पण ते वडगांवकरांपासून वसूल केलेच पाहिजेत असें माझ्या मनानें आतां घेतलें. पांच रुपयांकरितां त्यांचे गांवीं जाऊन त्यांस दोन काळे द्यावयाचे, हा वास्तविक पाहतां अव्यापारेषु व्यापार किंवा आंतबट्टयाचा व्यवहार होता. पण या बाबतींत व्यवहाराची आणि माझी फारकत झाली होती.

आज माध्यान्हीचे आंत, वडगांवकरांना देऊं केलेला मोबदला नेऊन द्यावयाचा असें ठरवून, मोठ्या पहाटेसच आम्हीं गार रस्त्यानें कूच केलें. कानगांव आणि गार यांचे दरम्यान, नदीचे कडेला नानाबुवांच्या मठाजवळच्या घनदाट कुरणाचे ओशाडीस कांहीं एकांडे काळे फुटून फुटून वावरत असलेले, आज बरेच दिवस मीं हेरून ठेविले होते तिकडे मोर्चा वळविला.

मठाजवळ आल्यावर गाडी सोडली आणि दोघांतिघांस बरोबर घेऊन कुरणाचे कडेकडेनें मी सावजाचा तपास घेऊं लागलों. सर्व कुरणास आम्ही वेढा देऊन आलों, पण माझी इष्ट वस्तु नजरेंत येईना. इतक्यांत गाडीजवळ ठेविलेला माझा गडी मोठ्या त्वरेनें मजकडेच येत आहे असें मीं पाहिलें, आणि मीहि त्यास लवकर गाठण्याकरितां सपाटयानें निघालों. मठाच्या उगवत बाजूकडे असलेल्या मळईत, एक काळा बाभळीच्या वाळून पडलेल्या शेंगा खात अगदीं गहाळ उभा आहे अशी वर्दी त्यानें मला दिल्यावरून, अंगांतले कपडे काढून, झुडपांतून लपत छपत जाऊन मी एक बक्शॉट त्यावर टाकला माझीं माणसें माझ्या हालचालीवर लक्ष ठेवूनच होतीं; तीं धावतच आलीं आणि त्यांनीं तो लांब लांब शिंगांचा जुनाट काळा गाडींत नेऊन टाकला. बैलांपुढली वैरणहि गोळा न करितां राघूनें जोखड बैलांचे मानेवर दिलें, आणि आम्ही पुन्हा वाट चालूं लागलों. गारचा पाणवठा ओलांडून बाभळेश्वरच्या शिवारांत आम्ही आलों होतों. रस्त्यानेंच धडक आम्ही निघालों. वडगांवपर्यंत आम्हांस बरेंच अंतर तोडावयाचें होतें, आणि तेवढ्या अवधींत आणखी एक काळा पैदा करणें म्हणजे माझ्या हातचा मळ होता.

मांडवगणचा अर्धा अधिक शिवार तुडवून आम्ही एका टेपाडापाशीं आलों. टेपाडाचे उतरणीवर शेरताटीचे आड एक लहानसा हरणाचा खांडवा विसांवलेला दिसला. मीं गाडींतली माझ्या गडयाची घोंगडी डोक्यावर पायघोळ घेतली, आणि आंत बंदूक छपवून गाडींतून उडी घेतली. आवाज होतांक्षणींच गाडी घेऊन पुढें या, अशी सूचना देऊन मी जरा लांबूनच वळसा घेऊन शेरताटीचे जवळ आलों. खांडांत एकच काळा होता. धडाक्यास त्याला पाडून मीं घोंगडीनें माझे माणसांस पालविलें. अशा प्रकारें येथपर्यंत तर सर्व ठीक झालें.

आतां वडगांव केव्हां गाठतों असें मला झालें होतें. गाडीवानाचे हातांतील आसुडाचा खुळखुळा खळाळल्याबरोबर गाडीचे बैल झोत निघाले.

* * *

गांवचे पोलीस पाटील—'भगवंतराव'— जेवून गुळणा करीत करीत दारांत येतात, तोंच आम्हीं काळे सोडून त्यांचे दारांत टाकले; आणि मीं माझ्या पांच रुपयांची मागणी त्यांचेपाशीं केली. "आमच्या गांवच्या कारभारी मंडळींचा विचार घेतों," म्हणून ते जे नाहींसे झाले ते सुमारें अर्ध्या-पाऊण घंटयानें उगवले. त्यांचेबरोबर आणखी दहा-बारा माणसांचा घोळका आला होता. जमतां जमतां आणीकहि मंडळी तेथें जमूं लागली. "मला लांब जावयाचें असल्यामुळें विनाकारण लांचण लावूं नका," असें मीं त्यांस म्हटलें. "ज्याचेजवळ पैसे ठेविले आहेत तो माणूस परगांवीं गेला आहे, आम्ही तुमचे पैसे तुमच्या गांवीं पावते करूं" असें बोलून माझे तोंडास पानें पुसण्याचा त्यांचा बेत दिसला. तेवढयांत ते दोन्ही काळेहि त्यांनीं हातोहात लांबविले!

माझ्या डोक्यांत आतां लख्ख प्रकाश पडला. "ठरावाप्रमाणें तुम्हांस मीं दोन भले मोठे काळे दिले आहेत. सतरा-अठरा मैलांवरून मला अशा रीतीनें हेलपाटा देणें तुम्हांस शोभत नाहीं," म्हणून मीं त्यांस पुष्कळ प्रकारें सांगितलें; पण ते कांहीं केल्या बधेनात. त्यांनीं टवाळीची भाषा वापरून, "अशा पुष्कळ नळ्या आम्हीं आजवर पाहिल्या आहेत," असें म्हणून माझ्या हातांतील हत्याराची केलेली विटंबना मला सहन झाली नाहीं. "तुम्हीं आजवर पुष्कळ नळ्या पाहिल्या असतील; पण माझे हातांतील नळीसारखी

नळी खचित तुम्हीं कधीं पाहिलेली दिसत नाहीं. ती पाहिलेली असती तर मजबरोबर अशा तऱ्हेनें वागण्याचा तुमचा धडा झाला नसता." इतकेंच बोलून मी गाडींत जाऊन बसलों. आम्ही निघतां निघतांहि त्यांनीं कांहीं इरसाल सत्यशोधकी विशेषणें मला ऐकविलीं. तीं कानीं पडतांच, माझे डोक्यांतील सर्व रक्त एकदम डोळ्यांत उतरल्यासारखें मला वाटलें; माझ्याच दांतांखालीं माझे ओठ चावले गेले, आणि ओठांतून निघालेल्या कढत रक्ताचे थेंब—इतक्या माणसांतहि—मीं माझ्या जिभेनें चाखले!

*　　*　　*

सत्य, सरळपणा आणि नम्रता हे सद्गुण खरे; पण त्यांचाहि अतिरेक कधीं कधीं तापदायक होतो.

वैकुंठवासी सत्पुरुष विष्णुबुवा जोग यांचेकडे एक गाय असे. ती कमालीची गरीब, अश्राप असे. महाराजांचे वाडयांत बिऱ्हाडें पुष्कळ असत. वाड्यांतील लहान मुलें—कोणी तिचे आचळ ओढीत, कोणी तिचें शेपूट डोळ्यांस लावीत, कोणी तिचे पाठीवर थापा मारीत आणि कोणी ती चारा खात असतां तिचे नाकांत काड्याहि घालीत! सारा दिवस मुलांचा हा असा उद्योग चालत असलेला पाहून महाराज विनोदानें म्हणत, "बये, मुलें जवळ आलीं तर तूं त्यांस मारूं नको; पण थोडीं शिंगें तरी हालवीत जा, म्हणजे तुझ्यामागचा हा सासुरवास चुकेल." एकादे प्रसंगीं महाराज कीर्तनांत देखील या गाईचा हा दृष्टान्त देत असत.

*　　*　　*

वडगांवाहून पाटसास आल्यावर दोन दिवस, जणूं विशेष कांहींच घडलें नसल्यासारखे, शून्य मनानें मीं घालविले. अपमानाच्या सर्दीनें माझें डोकें अगदीं जड होऊन गेलें होतें.

तिसरे दिवशीं गांवांत माणूस पाठवून, माझ्या नेहमींच्या रानांतील सहकारी मंडळीस—रामोशी मंडळीस—मीं बोलावून घेतलें. त्यांचे कानांवर वडगांवीं घडलेला प्रकार उडत उडत गेला होताच. पुन्हा मीं त्यांस तो समग्र सांगितला; आणि "पुढें काय?" म्हणून त्यांच्यांतील दोघां तिघां पुढाऱ्यांस सवाल टाकला.

"तें तुमचें तुम्हीच ठरवा. आमचेकडे जी कामगिरी सोपवाल त्यांत आमचेकडून तिळमात्र कसूर होणार नाहीं," असें त्यांनीं हातांतील पातळ फरशा डोक्यापर्यंत उचलून मला सांगितलें. माझें काम झालें. "पुढील कार्य-क्रमाबद्दलचा माझा विचार मी तुम्हांला लवकरच कळवितों," असें सांगून मीं त्यांस निरोप दिला.

चतुर्दशी किंवा पौर्णिमेचें चांदणें घेऊन निघावयाचें मीं मुक्रर केलें. पुण्यांस जाऊन मला हवी असलेली रक्कम आणि काडतुसें आणिलीं.

चाळीस पंचेचाळीस जवान रामोशी गडी, माझीं स्वतःचीं दहा-बारा गडी-माणसें आणि गांवांतील पांच-चार बलुते व मुलकी पाटलांचे बंधु शंकरराव पाटील इतकी मंडळी माझेबरोबर येणार होती. ऐनवेळीं गंमत बघण्याकरितां म्हणून माझ्या आसपासचीं आणखी कांहीं मराठे मंडळी येण्यास सिद्ध झाली. गांवांतील कांहीं हौशी उदमी माझेबरोबर येणार होते; परंतु कांहीं मंडळींनीं त्यांना भिवविल्यामुळें ते राहते झाले.

इतक्या सर्व मंडळींची खाण्यापिण्यासुद्धां हरएक प्रकारची तरतूद मीं केली होती. असल्या लग्नघाईंत घोडा बरोबर घेणें गैरसोईचें होतें; पण कांहीं विशिष्ट हेतूनें मीं ती गैरसोय सोसण्याचें पत्करलें. स्वतःकरितां मीं माझी राहुटीहि बरोबर घेतली. सामानसुमानाच्या दोन व बसण्याकरितां तीन अशा पांच गाड्या व माणसें मीं पुढें रवाना करून दिलीं; आणि वडगांवजवळ कोठें तरी मी तुम्हांला येऊन मिळतों असें त्यांस सांगितलें. एवढ्या मंडळीकरितां कांहीं नाहीं तरी 'काळ्यांची एक जोडी' तरी अवश्य असल्यामुळें दोन-तीन निवडक माणसें आणि गाडी बरोबर घेऊन रिकिबींत मीं पाय ठेविला.

आखा दिवस जिवाची आटापीट करून मीं तीन फक्कड काळे पैदा केले, आणि दिवस कलतां कलतां आम्ही पाटलाचे मळ्याजवळ आमच्या माणसांस येऊन मिळालों. गाड्या उभ्या करून पाणी पिण्याकरितां माझ्याबरोबरच्या माणसांतील कांहींजण विहिरीवर गेले. विहिरीवर भगवंतराव पाटलाचे धाकटे बंधु आंघोळ करीत होते. ते माझे माणसांचे अंगावर खेकसून, 'पोहऱ्यास शिवूं नका' म्हणून म्हणाले. "आम्ही महार नसून रामोशी आहोंत; आणि फार तान्हेले आहोंत," असें म्हणून दोघांनीं खवाट्यांत हात घालून त्यांस उचललें आणि

धावेचे शेंडयास असलेल्या चिंचेच्या झाडाखालीं नेऊन ठेविलें. हा प्रकार पाहतांच जवळचीं आणि माळ्यावर राखण करीत असलेलीं बायकामुलें राखण टाकून पार पडळींत जाऊन बसलीं. पाटील बिचारे ओलेतेच झाडाखालीं काकडत बसलेले पाहून, मीं माझे माणसांस लवकर आवरण्याबद्दल सांगितलें. पाणी प्याल्यावर त्यांनीं मळ्यांतील चांगलीं कवळाभर शाळूचीं ताटें पाटलाला सांगून मोडलीं; आणि 'हुरडा खावयाचा काय?' असें परस्परांस पुसूं लागले. "आतां बस करा" म्हणून मीं म्हटलें; तरी जवळच फुललेल्या कोथिंबिरीच्या वाफ्यांतील दोनतीन पेंढ्या स्वयंपाकाकरितां त्यांनीं घेतल्या. पाटील फार भले गृहस्थ दिसले! ते चकारशब्दहि आतां माझ्या माणसांस बोलले नाहींत.

* * *

गांवाच्या मध्यवस्तींत असलेल्या मारुतीच्या देवळाच्या प्रशस्त पटांगणांत आमचा लवाजमा येऊन ठेपला. गाडयांचे बैल सोडून, बैलांस आणि घोडयास माझे माणसांनीं वैरण सोडिली; आणि देवालयाचे चौथऱ्यावर सर्वांनीं बैठक मारली.

बऱ्याचशा गाडया आणि पन्नास-पाऊणशें माणूस मारुतीच्या देवळाच्या आवारांत उतरल्याचा बोभाटा गांवभर झाला. जो तो "ही काय भानगड आहे" अशा अर्थानें तेथें येरझारा घालूं लागला. संध्याकाळच्या सुमारास झाडून गांवकरी आणि गांवची पुढारी मंडळी, पाटील असे सर्व जमा झाले. पाटसच्या मंडळींचा तो जमाव पाहून आपल्या मनांत ते तरकून गेले होतेच. चौथऱ्यावरचा एक एक गडी उठून त्यांनीं वडगांवकरांस चहूं बाजूंनीं गराडा दिला. शीखांचें जसें 'कृपाण' त्याप्रमाणेंच रामोशी गडी सहसा कुऱ्हाड अथवा 'फरशी' घेतल्यावांचून बाहेर पडावयाचा नाहीं, हें सर्वश्रुतच आहे!

भगवंतराव पाटलांपाशीं मीं माझ्या पाच रुपयांची आज दुसऱ्यांदा मागणी केली. नेहमींच्या सवयीप्रमाणें पाटील तोंडपाटीलकी करूं लागतांच, कोंडया रामोशानें पाटलांच्या एक अशी कानशिलांत दिली, कीं पाटलांचे तोंडांतला पानतंबाकूचा तोबरा त्यांचे कुडत्यावर 'पायशॉ'च्या फवाऱ्याप्रमाणें फवारला आणि ते मट्कन् खालीं बसले. "घरांतून पैसे आणावयाला तरी मला बाहेर जाऊं द्या." असें मोठ्या काकुळतीनें ते म्हणाले. त्यांची घरधनीण,

किलकिल्या दारांतून हा सर्व प्रकार पाहत होती. ती रुपये घेऊन धावतच तेथें आली आणि माझे माणसांचे अंगावर तिनें ते पैसे फेकले.

गड्यांनीं गाड्या जुंपल्या, आणि आम्हीं सर्वांनीं नदीचे पाणवठ्याच्या वाळवंटाकडे मोर्चा फिरविला. आपलें काम झालें असल्यामुळें आतां येथें मुक्काम करण्याचें कारण उरलें नाहीं; तेव्हां रातोरात गांवाकडे निघावें असें माझ्या बरोबरच्या दोघातिघा मराठे मंडळींचें म्हणणें पडलें. गांव "डांचिसांचा" असल्यामुळें, एका अंगास भरल्या नदीचें पात्र आणि दुसऱ्या अंगास गांव, अशा चिमटयांत सापडून गोफणींतील दगडांनीं रात्रीं-बेरात्रीं टाळकीं सडकून निघण्याची पाळी येईल अशी भीति त्यांना वाटली!

गाडींतला वेताचा बुरुडी पेटारा मीं खालीं उतरविला आणि त्यांतल्या काडतुसांच्या पेट्या काढून ओळीनें मीं त्या त्यांच्यापुढें मांडल्या, तेव्हां त्यांची भीति दूर होऊन त्यांच्या शंकेचें समाधान झाल्यासारखें दिसलें.

स्वस्थ चित्तानें ते सगळेजण आतां स्वयंपाकाचे उद्योगास लागले. शुभ्रधवल चांदणें पडलें होतें. दगड आणून त्यांनीं तेथें वाळवंटावरच चुली बनविल्या. कांहींनीं ते तिन्ही काळे सोलले. कांहींनीं ते तोडून धोतरावर त्या मांसाचा भला मोठा ढीग घातला. कांहींनीं तें मांस स्वच्छ धुऊन आणिलें. कांहींजणांनीं पाणवठयाचे कडेलाच असलेल्या, भगवंतराव पाटलांच्या मळईतील कोवळीं लुसलुशीत वांगीं आणिलीं, आणि बाकीच्यांनीं त्याच मळईभोंवतालचें सर्व कुंपण काढून, त्याच्या काटया झाडून, सर्पणाचे ढीगच्या ढीग वाळवंटावर आणून रिचविले. इतक्या मंडळींच्या साग्रसंगीत जेवणाकरितां पुष्कळशा सर्पणाची जरूरत होतीच.

सारें वाळवंट माणसांनीं फुलून गेलें होतें. हसत-खिदळत आणि थट्टामस्करी करीत लोक गप्पागोष्टी करीत होते. भगवंतराव पाटलांस आणि गांवच्या कारभारी मंडळींस– मी नको म्हणत असतांहि– जेवणाचें आंवतण देण्यास स्वतः शंकरराव पाटील गांवांत गेले होते. सर्वत्रांचीं अंतःकरणें उत्साहानें भरून राहिलीं होतीं आणि वाऱ्याबरोबर, शिजत असलेल्या ताज्या मांसाचा स्वाद जिकडेतिकडे दरवळून राहिला होता.

* * *

कालच्या रात्रीचा दिवस झाल्यामुळें, वडगांवांतून निघावयास आम्हांस आज अकरा वाजून गेले होते. निघतांना प्रत्येक रामोशाचे, आणि त्याबरोबरच माझेहि गडयांचे हातावर–बक्षिसादाखल मीं पांच रुपयांची नोट ठेविली. ऊन्ह असल्यामुळें संथपणें आम्ही वाट चालत होतों.

होळकरवाडीच्या रेल्वेच्या फाटकापाशीं आलों, तों फाटक बंद होतें. 'एटीन् अप्'ला सिग्नल दिलेली होती.

उंच अंतराळांत कवायती पलटणीपेक्षांहि जास्त शिस्तींत करकोचे आपला मार्ग आक्रमीत होते. क्षणाक्षणाला वेगवेगळ्या पोझिशन्स घेऊन ते आपल्या कंपनीची पालटीत असलेली रचना मोठी चित्ताकर्षक वाटे. पूर्वेच्या बाजूला नानवीजच्या वायरलेस स्टेशनचे विद्युद्दीप झळाळत होते, आणि समोर उत्तरेस बिरोबाच्या देवळापासून तों बिगरदऱ्यापर्यंतच्या विस्तीर्ण डोंगरप्रदेशावर पसरलेला वणवा स्वतःच्या जबडयांत सापडलेल्या जीवांचा स्वाहा करीत इतरेजनांच्या डोळ्यांस सुखवीत होता !

सत्यकथा,
एप्रिल–मे, १९४३

---

# घोड्यावरची डुकरांची शिकार : : १०

बाउले आणि ब्रूस हे त्या वेळीं नाणावलेले जॉकी होते. जोन्स पूर्वाश्रमीं जॉकीच होता, परंतु एका शर्यतींत पडून तो थोडासा अधु झाल्यामुळें त्यानें अलीकडे ट्रेनरचा धंदा सुरू केला होता. माझ्या एका स्नेह्यामार्फत यांची माझी ओळख झाली होती, आणि शिकारीचे ते मोठे शोकी असल्यामुळें त्यांचे आणि माझें पुढें दाट स्नेहांत रूपांतर झालें होतें. हरणांचे शिकारीकरितां ते माझेकडे मधून मधून येत. डुकरांच्या शिकारीचाहि त्यांना चांगला सराव होता. त्यांचा बी. ए. वेअर्स नांवाचा एक दोस्त आणि ते आज घोड्यावरच्या शिकारीकरितां मुद्दाम पुण्याहून पाटसला आले होते. गणपतीच्या देवळामागील पटांगणांत त्यांचा लवाजमा उतरला होता. कुक व फालतुक माणसें त्यांचीं त्यांच्याबरोबर आलेलीं होतींच. सामानसुमानाची तरतूद करणें, आणि शिकारीची तयारी करणें एवढीच कामगिरी माझ्याकडे होती.

मोठ्या पहाटेसच उठून आम्हीं, हाके लोक, बाहुटेवाले आणि सर्व सरंजाम पुढें रवाना करून दिला. चहा ढोसून, घोडे तयार होत होते तोंवर आम्ही सिगारेट्स फुंकीत फाटकाच्या बाजूच्या कट्ट्यावर बसलों. मोतद्दारांनीं सायडलें चढवून आणि डबलबीटचे लगाम तोंडांत देऊन जनावरें रंगणावर धरिलीं. आम्हीं स्टिका हातांत घेऊन आणि तंगांतून बोटें फिरवून रिकिबींत पाय ठेविला आणि थोड्याच वेळांत आम्ही 'भट्टीच्या आळयाच्या' मैदानांत (शिकारीचें स्थळ) येऊन दाखल झालों.

* * *

'भट्टीचें आळें' म्हणजे अनेक आळयांचा एक प्रचंड समूह होता, आणि तो सगळा मिळून चार साडेचार मैलांचा घेरा होता. एकवार आम्ही त्या आळयाभोंवतीं चक्कर टाकून आलों. माझे गोरे मित्र त्या काळयाकुळकुळीत जमिनींत पडलेल्या भळी पाहून जरासे चपापल्यासारखे झाले.

"येथें दगा होण्याचा संभव आहे." बाउले म्हणाला.

"या बाबतींत दैवावर हवाला ठेवण्याशिवाय दुसरा उपाय नाहीं. तुम्हां गोऱ्यांना आगींत उड्या घ्यावयास हव्यात, पण मरणाची मात्र तयारी नाहीं." मी.

"अरे, आम्हीं मेलों तर त्या शर्यतीच्या मैदानाचा 'खोकड माळ' होऊन जाईल कीं!" बाउले.

"तर मग तो होऊं दे कीं!" मी.

मैदानासभोंवारच्या झाडांच्या फांद्या ढाळून निशाणें घेतलेलें बावटेवाले ठिकठिकाणीं झाडांवरून चढून बसले. आळ्याच्या दक्षिण बाजूस मोठमोठाल्या घळी असून जनावरें त्यांत उड्या घेऊन नदीचे कडेला असलेल्या 'भोंवरा' नांवाच्या दाट काटवण असलेल्या कुरणांत निघून जात; म्हणून त्या बाजूस, जनावरें मोडून नियोजित बाऱ्यांवर घालविण्याकरितां माणसें ठेविलीं होतीं, आणि एकदोघांजवळ वायूबाराचीं काडतुसें आणि बंदुकाहि देऊन ठेवल्या होत्या. अशा रीतीनें खेळाची सज्जड तयारी झाली आणि हाके हाका टाकूं लागले. आम्हींहि बारीपासून जरा दूर एका आडोशास तयार होऊन राहिलों.

अर्धा घंटा होऊन गेला. त्या रखरखीत उन्हांत आमच्या मांडीखालचीं जनावरें, एकाच जागीं दम काढीनात. इशाऱ्याकरितां अधीर होऊन तीं सारखा थयमान घालूं लागलीं. त्यांना खेंचतां खेंचतां आमचे हातसुद्धां हुळहुळे होऊन गेले.

आणखी थोडा वेळ गेला. इतक्यांत आळ्यांत दोनतीन आवाज घुमले, आणि उत्तर बाजूच्या बारीवाटे दोन पुष्ट दांतवालीं जनावरें आणि त्यांचे पाठोपाठ एक मध्यमसर बांडगें बाहेर भडाडलें.

त्या दोन्ही जनावरांमागें आम्ही जोडीजोडीनें धावलों, आणि जोन्सनें तें बांडगें बोल बोल म्हणतां गाठून त्यास एकामागें एक चारपांच केन् दिल्या. जोन्सनें तुडवूनच त्याला हैराण केल्यामुळें तें कोलमडून पडलें, आणि त्याच्या काळजांत मोठ्या सफाईनें त्यानें आणखी एक केन् देऊन त्यास जागचे जागीं ठार केलें.

जमिनीस मोठाल्या भळी असल्यामुळें, जनावरांचा पाठलाग करतांना फार काळजी घ्यावी लागे. तीं दांतवालीं दोन्ही जनावरें, त्या मैदानांत मध्यभागींच

असलेल्या एका खडप्यास वळसा घालून पश्चिमेकडे निघाली. थोड्याच वेळांत आम्हीं त्यांस गाठलें. जोन्सहि तेवढ्यांत आमचे मदतीस आला. आम्हीं तिघांनीं मागलें जनावर भोसकलें व पुढें असलेलें जनावर वेअर्स आणि बाउलेनें टोचलें. जनावरें फार भारी होतीं. बेभान होऊन आम्हांवर तीं तुटून पडत. ब्रूसच्या घोड्याला एका जनावराचा दांत ओझरता लागल्यामुळें तो थोडासा कुचंबल्यासारखा झाला. पण तेवढ्यांत जोन्सनें त्याच्या बरगडींत अधोहस्तानें ( अंडरहँड् ) दोनतीन जोरकस प्रहार केले, आणि मींहि एका बाजूनें त्याचें मानगूट विंधून टाकलें. आतां तें चांगलेंच जेर झालें होतें, आणि त्यास पळण्याची ताकद राहिली नव्हती. इतक्यांत ब्रूस तावातावानें त्याजवर चाल करून गेला आणि दोन सणसणीत स्टिका लावून त्यानें त्यास तत्काळ लांब केलें.

वेअर्स आणि बाउले आम्हांपासून जवळ जवळ दीड दोन फर्लांग लांबले होते. ते दोघेहि आपणांकडून शिकस्त करीत होते, पण तें विलक्षण सकत असलेलें जनावर त्यांस मेचेना. वरचेवर तें रोखून उभें राही, आणि त्वेषानें परत फिरून त्यांजवर चालून जाई. तशांतच वेअर्सचा भाला फिरून निकामी झाला. मदतीकरतां त्यानें आम्हांस पालविलें आणि आम्हींहि आतां मोकळेच असल्यामुळें तत्काळ घोडे त्यांचे रोखानें फेकले. क्षणभरच आम्ही त्यांची उडालेली तिरपीट बघत राहिलों, आणि नंतर त्यांचेजवळ जाऊन, वर्षाव झाल्याप्रमाणें चहूं बाजूंनीं तें भयंकर मस्त जनावर बोचून त्याची निखालस चाळण करून टाकिली. त्याचे लांब अणीदार सुळे पावणेनऊ इंच भरले !

अशा रीतीनें आमची पहिली फसल सोळा आणे यशस्वी झाली. पंढरीचे 'मुद्राराक्षस' ( वारकरी ) ज्याप्रमाणें एकमेकांच्या पायांवर लोटांगणें घेत सुटतात, त्याप्रमाणें आम्हीं परस्परांचें अभिनंदन केलें, आणि रेल्वेच्या पुलाखालीं आमच्या माणसांचा तळ पडला होता तिकडे निघालों. आमचे घोडे घामानें निथळून गेले होते. त्यांचा घाम नितळून टाकून त्यांस दोन दोन लोफ् दिले, आणि तहानेनें आमचेहि घसे कोरडे होऊन गेल्यामुळें आणि थकवा आल्यामुळें आम्हीं बर्फांत घालून ठेवलेला थंडगार सोडा घेतला; एक एक संत्रें चघळून आणि हाका सुरू झाल्यामुळें नव्या स्टिका घेऊन आम्हीं आपापल्या ठिकाणीं निघून गेलों.

* * *

जवळ जवळ आळयाच्या मध्यापर्यंत रान उठवून झालें होतें. आतां पश्चिम बाजूचे बारीवर न निघतां उत्तर व पूर्व बाजूचे बारीवर जनावरें निघतील असा कयास करून आम्ही त्या बेतानें दोन गट करून उभे राहिलों. थोड्याच वेळांत एक डाडर व तिचीं लहान लहान पिलें उत्तर बाजूचे बारीवर निघालीं. आम्ही पांचहीजण तिच्यामागें धांवलों आणि तत्काल तिला ठार केलें.

सूर्य आतां बराच कलला होता, तरी ऊन्ह मी म्हणत होतें, आणि नितळ पाण्याच्या प्रवाहाप्रमाणें मनोरम दिसणारें मृगजळ, आमचीं आणि आमच्या मांडीखालच्या जनावरांचीं शरीरें अधिकच तप्त करीत वेगानें वाहत होतें.

आळयाच्या कडेपर्यंत चेपीत आणिलेलीं जनावरें फऱ्यांतून उलटून निघून गेल्यामुळें हाके पुन्हा माघारे फिरले आणि धडाधड निवडुंग पाडीत आणि आवाज काढीत ते पुढें पुढें सरूं लागले. जनावरें सावध असल्यामुळें तीं झटकन् हललीं आणि कांहीं उत्तरेच्या बाजूनें व दोन मध्यमसर जनावरें पूर्व बाजूच्या बारीवाटे बाहेर पडलीं. बाउले आणि ब्रूस एका थोराड दांतवाल्या जनावरामागें गेले आणि जोन्स् व वेअर्स यांनीं पृथक् पृथक्पणें, पूर्वेच्या रोखानें निघालेलीं दोन्हीं जनावरें आटोपिलीं. एक लहानसें जनावर गाठून त्यास मीं दोन-तीन जागीं भोसकलें. पण त्यानें जवळच्या निरुंद व खोल नाल्यांत उडी घेतली आणि तें भोवऱ्याकडे निघून गेलें. निरुपाय झाल्यामुळें मी परत फिरलों आणि बाउले व ब्रूस त्या थोराड जनावराशीं झटपटत होते त्यांच्यांत जाऊन मिसळलों. आम्हीं तिघांनीं त्यास पुरें केलें आणि जोन्स् व वेअर्स यांची हालहवाल बघण्याकरितां आम्हीं तिकडे मोर्चा फिरविला. जोन्सनें जनावर ठार करून तो वेअर्सचे मदतीस निघाला होता, इतक्यांत आम्हींहि त्यास गाठलें आणि आम्ही चौघेहि ओघळीचे डाव्या बाजूला वेअर्स खेळत होता तेथें जाऊन दाखल झालों. वेअर्सची स्टिक् त्या जनावराचे कुशींत रुतून बसली होती आणि फक्त मूठच त्याचे हातीं शिल्लक राहिली होती. मोठ्या कौशल्यानें, हातांत हत्यार नसतां– तो आडवा होऊन त्या जनावरास रोखी आणि स्टिक् उपसून घ्यावयास बघे. त्याचा तो प्रेक्षणीय खेळ बघत आम्ही क्षणभर तटस्थ उभे राहिलों. जोन्स त्याला

आपल्या हातांतील स्टिक् देण्याकरितां पुढें झाला, तोंच कमालीच्या चपळा-ईनें त्यानें स्टिक् उपसून घेतली आणि त्या बिनमुठीच्या हत्यारानेंच त्याचा प्राण घेतला !

आमची दुसरी फसलहि अपेक्षेबाहेर यशस्वी झाली आणि आम्ही विश्रांति घेण्याकरितां तळावर गेलों. आमचे पाय अगदीं आखडून गेले होते. मोत-द्दारांचे हवालीं घोडे करून आम्ही तेथेंच वाळूवर पसरलों. आमच्या माणसां-नीं त्यांचीं सायडलें उतरून ठेवलीं आणि त्या फेसाळलेल्या जनावरांचा घाम नितळून ओल्या टुवालांनीं त्यांना पुसून स्वच्छ केलें. दोन दोन मुठी घास त्यांना दिला आणि पुन्हा सायडलें चढवून ते तयार होऊन राहिले. आम्हींहि थोडें लेमन् घेतलें आणि एक एक सिगरेट पिऊन आपापल्या वाहनावर आरूढ झालों. आमच्या दोन्ही फसली बहारदार झाल्यामुळें आतां ही तिसरी आणि शेवटची फसल कशी पार पडते याबद्दलचेच विचार करीत आम्ही आळयापाशीं आलों.

* * *

शिखळ पडूं लागली होती आणि उन्हाची तीव्रता आतां थोडी कमी भासत होती. हाके लोकांनीं, रानाचा पसारा अद्याप फार असल्यामुळें, रान उरकावें म्हणून आपल्या माणसांच्या दोन टोळ्या बनविल्या आणि एक पश्चिमेकडून पूर्वेकडे आणि त्याचे उलट दुसरी, अशी योजना आतां केली होती. दक्षिणेचे बाजूनें माणसें होतींच. अस्तमान होण्याच्या आंत, दोन्ही बाजूनीं जनावरें चिमट्यांत धरून ठराविक बारीवर काढावींत असा त्यांचा इरादा होता. उगवत बाजूनें हाका सुरू झाल्या त्यासरशीं मावळतीकडूनहि धाड्धाड् आवाज काढीत हाके बेदरकारपणें पुढें पुढें घुसूं लागले. आज उजाडल्यापासूनच सर्व रान हलून गेलेलें असल्यामुळें आंत शिल्लक असलेलीं जनावरेंहि हलबलून गेलीं होतीं; तीं तत्काळ बाहेर भडाडतील असा मला भरंवसा वाटत होता.

या शिखळ पडण्याच्या सुमारास ही डुकरांची जात जास्त साहसयुक्त आणि जिवावर उदार झाल्यासारखी होत असते. एवढ्याकरितां या वेळीं एक-एकट्यानें जनावरावर चालून जाऊं नये असा इशारा मीं सर्वांना देऊन

ठेविला. पण, 'जन्मभर शिकार करूनहि तुझें पौर्वात्य 'हिंदु' मन आम्हां पाश्चिमात्यांची बरोबरी करूं शकणार नाहीं', असें जोन्स मला मोठ्या दर्पानें म्हणाला. वादविवाद करण्याचा हा समय नसल्यानें त्याचें बोलणें मीं मनावर घेतलें नाहीं.

हाके लोक आमच्या नजीकची बारी ओलांडून थोडेसे पूर्वेकडे सरले होते; म्हणून आम्हींहि आमची जागा चाळवून थोडेसे पुढें सरलों. इतक्यांत मोठ-मोठे सुळे असलेलीं दोन जुनाट व मस्त जनावरें आणि त्यांचे पाठोपाठ एक डाडर आणि नऊदहा जवान बांडगीं एका रुंद बारीवाटे बाहेर पडलीं.

त्या दोन जनावरांपैकीं एक उत्तरेकडे आणि दुसरें पूर्वेच्या बाजूला मोठ्या वेगानें निघालें व तें ओढा उतरून पार झालें. उत्तरेच्या बाजूला दोन अडीच फर्लांगांवर रेल्वेचें कुंपण आडवें येत असल्यामुळें त्या जनावरास पश्चिमेकडच्या प्रशस्त मैदानांत निघण्यावांचून गत्यंतर नव्हतें. तेथेंच त्यास गाठून ठार करावें अशा इराद्यानें आम्ही त्याचे मागें निघालों. एका क्षणांत आम्ही त्यास जाऊन भिडलों, आणि त्याचे बरगडींत अधोहस्तानें (अन्डरहॅन्ड) दोन जोरकस केन दिल्या. तें त्वेषानें फिरलें आणि मोठ्यानें रुकून (ओरडून) त्यानें आम्हांवर चाल केली. आमची पांगापांग झाली आणि आम्हीं तोंडें फिरविलीं तेव्हां आम्हांस जोन्स आमच्यांत नसल्याचें कळून आलें!

आमची पांगापांग झालेली पाहून तें मस्तवाल जनावर पुन्हा पळूं लागलें. आम्हीं पुन्हा त्यास गाठलें आणि चोहींकडून टोचून त्यास हैराण केलें. त्याचे अंगांतून रक्ताच्या धारा वाहूं लागल्या तरी तें किंचित्‌हि डगलें नाहीं. तें बाउलेच्या घोड्यावर बेजरबपणें धावलें. पण बाउलेनें एक फर्मास जंप् घेऊन त्या जनावराचा राग त्यानें व्यर्थ करून टाकला. थोडासा अवसर मिळतांच तें पुन्हा पळूं लागलें. मध्येंच थोडेंसें थबकलें, आणि आपल्या चिवट नाकाडानें जमिनीवर दोन-तीन खळया लावून त्यानें वर्षाव झाल्या-प्रमाणें चौफेर माती उधळून दिली.

कसला तरी गलका आमचे कानांवर आला म्हणून आम्ही वळून पाहतों तों, बावटेवाले मोठमोठ्यानें आरोळया देत, हातांतलीं तांबडीं निशाणें जोर-जोरानें फडफडावीत होते. त्या जनावरास जाम करण्याची कामगिरी वेअर्स

आणि बाउलेवर सोपवून ब्रूस व मी तत्काल तिकडे धावलों. कांहीं तरी विपरीत प्रकार किंवा दगा होता याबद्दल वादच नव्हता, पण तो काय प्रकाराचा होता इतकाच प्रश्न होता.

ओढा ओलांडून एक फर्लांगभर आम्ही आलों. तेथें आमच्या दृष्टीस जें दृश्य पडलें तें पाहून आम्ही अगदीं दिङ्मूढ होऊन गेलों!

जोन्सच्या घोड्याचा पुढला उजवा पाय गुडघ्यापर्यंत तुटून भळींत घुसला होता, आणि तें उमदें जनावर दहापांच हातांवर पलटी खाऊन आपल्या पायांनीं जमीन खरडीत तडफडत पडलें होतें. जोन्सनें अविचारानें अर्धवट जखमी केलेलें तें मस्त जनावर आपल्या तीक्ष्ण सुळ्यांनीं त्यास अद्याप धडकां-वर धडका देत होतें, आणि तो प्रकार पाहून बंदूक भरून जाफर [ वॉचमन् ] धावतच इकडे येत होता. जोन्सहि एका बाजूस पडला होता आणि आपल्या हाताचा आधार घेऊन तो उठावयास बघत होता. जाफरचे हातून बंदूक घेऊन, ब्रूसनें त्या पिसाळलेल्या जनावराच्या डोक्यांत गोळी घालून त्याचा कपाळमोक्ष केला आणि घोडे जाफरचे स्वाधीन करून आम्ही जोन्सकडे वळलों. वेअर्स व बाउलेहि तेवढ्यांत आले, आणि 'अरेरे!' म्हणत त्यांनीं घोड्यांवरून उड्या घेतल्या.

आम्ही सगळेजण जोन्सजवळ गेलों. त्यास जमिनीवर उपडा निजवून कांहीं विशेष स्वरूपाची जखम अथवा हातापायांस कांहीं इजा पोंहोचली आहे कीं काय तें नीटपणें पाहिलें. त्याला गंभीर स्वरूपाची जखम झालेली नव्हती. तरी तो कण्हत होता त्यावरून त्याला चांगलाच मुका मार लागला होता हें आम्हीं ताडलें. त्याचें सर्वांग ठेचाळून निघालें होतें, आणि तो थोडासा घाबरल्यासारखा दिसत होता. आम्हीं त्यास पुष्कळ प्रकारें धीर दिला आणि आमचीं माणसें आमचे भोंवतीं गोळा झालींच होतीं त्यांतल्या एकास सोडा आणि ब्रॅन्डी घेऊन यावयास सांगितलें. आम्हीं त्यास चांगला रगडून काढला आणि नंतर दोन-तीन पेग् ब्रॅन्डी पाजली. आतां त्याला जराशी हुशारी वाटली व तो आपल्या घोडयाकडे मला घेऊन चला म्हणून म्हणूं लागला. वेअर्सच्या खांद्यावर हात टाकून तो मोठ्या कष्टानें पावलें टाकीत होता. घोडयाजवळ येतांच वेअर्सच्या खांद्यावरला हात त्यानें काढून घेतला. आणि खालीं वाकून

त्यानें प्रेमभरानें आपल्या घोड्याचें चुंबन घेतलें. त्या मुक्या जनावरास होत असलेले क्लेश त्याच्याच्यानें बघवेनात. डोळयांस रुमाल लावून तो एखाद्या पोरासारखा रडूं लागला. एकाएकीं अवसान आल्यासारखा तो उठून उभा राहिला. आणि ब्रूसच्या हातांतली बंदूक घेऊन त्यानें तिचा ट्रिगर उघडला. एकवार त्यानें त्या जनावराच्या अंगावरून हात फिरविला, आणि दुसऱ्याच क्षणीं त्याचे कानशिलावर बंदूक झाडून त्यास सर्व क्लेशांपासून त्यानें मुक्त केलें!

आजच्या तिसऱ्या फसलीचा शेवट जोन्सच्या साहसी, एककल्ली आणि घमेंडखोर स्वभावामुळें अशा प्रकारें झाला.

* * *

नुकताच चंद्रोदय झाला होता, आणि मंदपणानें प्रकाशकिरणें भूप्रदेशावर फेकीत आकाशांत चंद्र वर वर चढत होता. "तूं गाडींतून चल, आम्ही तुज-बरोबर हळूहळू येतों," असें मी जोन्सला म्हणालों. "माणूस पाठवून तुझी घोडी बोलावून घे, आणि मी घोडयावरून आलों तसाच घोडयावरून घरीं जाणार; साऱ्या जन्मांत मी खटाऱ्यांत बसलों नाहीं आणि आजहि बसणार नाहीं," असें जोन्स आढ्यतेनें म्हणाला.

"तूं तर निखालस सत्याग्रह्याची भाषा बोलावयास लागलास! जित्याची खोड मेल्याशिवाय जावयाची नाहीं. आम्हांस यायला क्षणभरच उशीर झाला असतां तर आज तुझा कोथळाच बाहेर पडला असता, आणि इथंच तुझं दफन करण्याची पाळी आम्हांवर आली असती," असें मी म्हणालों.

यावर तो कांहीं एक बोलला नाहीं. त्यानें उद्वेगानें हातांतली बंदूक लांब फेकून दिली आणि बोटांनीं तो जमिनीवर रेघोट्या ओढीत बसला.

जोन्सच्या घोडयावरचें उतरून ठेवलेलें सायडल अजूनपर्यंत तेथेंच धुळींत पडलें होतें. लगाम जाफरनें जातांना काढून नेला होता. माझे मोतद्दारास मीं बोलावून घेतलें, आणि "तें सायडल व लगाम घेऊन घरीं जा, आणि ताबडतोब घोडी तयार करून आण," म्हणून सांगितलें.

तळावरून आम्हीं कांहीं खाण्याचे जिन्नस आणविले, आणि ते खातां खातां झाल्या प्रकाराचा तपशील जोन्सच्या तोंडून युक्तीयुक्तीनें काढून घेतला.

आमच्या पाठीस मिळालेल्या पोटांत थोडीशी भर पडल्यामुळें आम्हां

सर्वांनाच आतां उत्साह वाटूं लागला. जोन्सहि उठून उभा राहिला आणि घोड्यावरून घरीं जावयाचें असल्यामुळें, सर्व टिप्‌टॉप् आहे कीं नाहीं हें पाहण्याकरितां तो हळूहळू अंगावरून हात फिरवीत शतपावली घालीत राहिला.

थोड्या वेळानें मोतद्दारानें माझी घोडी आणून मजपुढें उभी केली, आणि माझ्या मित्रांचींहि वाहनें व माझा घोडा सायडलें चढवून आमचे माणसांनीं पाठोपाठ आणून तेथें खडीं केलीं. जोन्सनें त्या मरून पडलेल्या सुळेवाल्या जनावरापाशीं माझा घोडा नेला, आणि त्यावर चढून उभा राहून त्यानें रिकिबींत पाय घातला. आम्ही सावकाशपणें वाट चालत होतों. वारा अगदीं पडला होता. झाडाचें पानहि हलत नव्हतें आणि जमिनींतून अद्याप गरम वाफा निघत होत्या.

फाटकांतून आंत येतांच माझ्या पाहुण्यांनीं घोड्यावरून उड्या घेतल्या, आणि ते तडक किचन्‌रूममध्यें घुसले.

जोन्सच्या जिवावरचें हें प्राणांतिक संकट घोड्यावरच गेलें, म्हणून माझ्या 'हिंदु' मनास खरोखरच 'हायसें' वाटलें!

यशवन्त,
ऑगस्ट १९४१

# अति तृष्णा न कर्तव्यम् ! : : ११

आज तीन दिवस मला अहोरात्र जाग्रणें घडत होतीं.

बोरीच्या वावरांतला बागायती भुइमूग अगदीं तयार होण्याच्या बेतांत आला होता, पण त्यांतला निम्माशिम्मा तरी हातीं लागेल कीं नाहीं याची वानवाच होती. रानडुकरांनीं जणूं मालकाच्या पदरांत शेंगांचीं टरफलें-सुद्धां पडूं नयेत म्हणून विडाच उचलला होता. नित्य नेमानें तीं पहाटे-आवशीं येऊन पिकाचा फडशा पाडीत होतीं. तीं नतद्रष्ट जनावरें सुखानें नुसतीं खाऊन जातीं तरी पुरवतीं. पण, खात होतीं त्याच्या दसपटीनें तीं नाश करून टाकीत ! तशांतच मीं मोठ्या हौसेनें फार किंमत देऊन आणिलेला जातवान् अस्सल कारवानी कुत्रा, त्यांनीं त्याच भुइमुगाच्या वावरांत नुकताच जिवें मारला होता. रानडुकरांवर समोरून चालून जाणें, म्हणजे आपणहून मृत्यूच्या जबड्यांत शिरण्याप्रमाणें असतें. माझ्या त्या नवट जवान् कुत्र्यास डुकरांच्या शिकारीचा बिलकुल सराव नव्हता. एक दिवस रानजनावरांची चाहूल लागल्यामुळें तो मोठ्या त्वेषानें मळ्याकडे धावत गेला, अन् पिकांत जनावर दृष्टीस पडतांच पुढूनच त्यानें एका रानडुकरावर चाल केली. सुळेवाल्या त्या मस्त डुकरानें मुसंडीसरसा एका सपाट्यांतच त्याचा चेंदामेंदा करून टाकला. त्या दिवसापासून माझ्या अंगाची नुसती काहील होऊन राहिली होती, अन् त्या रानजनावरास केव्हां एकदां ठार करीन असें मला झालें होतें. चांदण्याची वाट पाहत थोडे दिवस मी स्वस्थ बसलों, अन् चांदणं चांगलं पडूं लागल्यावर वर सांगितल्याप्रमाणें मी मळ्यांत त्यांच्या पाळतीवर बसून राहिलों.

* * *

माझ्या त्रिरात्र जाग्रणामागचा इतिहास हा असा होता.

बारावर एक वाजून गेला, दोन वाजले, पण छे ! कुठें कांहीं नाहीं !

चंद्र पार कलला अन् मलाहि आतां जरा कलंडावेंसें वाटूं लागलें. गाडीच्या साटीच्या दोन्ही पात्यांवर आडोशाकरितां टाकलेल्या दोन्ही घोंगड्या ओढून घेण्याच्या विचारांत मी होतों. इतक्यांत एक सबंध सारच्या सार ( नर,

डाडर अन् तिचीं पिलें अशा डुकराच्या सबंध कुटुंबास 'सार' म्हणतात.) उगवत बाजूच्या बांधानें भुइमुगांत शिरली; पण, वावराच्या कडेवरच कानोसा घेत उभी राहिली. मळ्यांतील कुलींबित्रीं चटसारीं आज बांधून टाकिलीं होतीं. आपण माणसें, तुच्छतेनें त्यांना 'डुकरें' म्हणतों; पण किती हुशार अन् दमदार ही डुकरांची जात! जागून जागून डोळे ताठून गेल्यावर अन् कंटाळल्यावर, मनुष्य पहाटेच्या सुमारास साहजिकच पेंगू लागतो. अशा निवान्त वेळीं पिकांत यथेच्छ जोगावून दिवस उजाडावयाच्या आंत पुन्हा आपापल्या खोपांतून जाऊन सुखेनैव पडून राहतात!

आणीबाणीचा क्षण म्हणतात तो आतां अगदीं समीप येऊन ठेपला होता. बर्फाप्रमाणें गार पडलेली माझ्या बंदुकीची नळी घोंगडीच्या पदरानें पांचसहा वेळां मीं जोरानें चोळली, आणि बंदुकीचे दोन्ही ट्रिगर हलक्या हातानें मी जपून उघडले. पात्यावर बंदुकीची नळी ठेवून सावज हलण्याचीच मी वाट पाहत होतों. वारा अगदीं पडला होता. पाटापाटांनीं असलेले बेडूक तेवढे कर्कश शब्द करीत होते, आणि बाकी सर्वत्र सामसूम होतें. पूर्ण संशयनिवृत्ति झाल्यावर, वावराच्या कडेवर उभ्या असलेल्या त्या खांडव्यांतील डाडर प्रथम पुढें निघाली आणि तिच्यामागून तिचीं तीं लहान लहान बांडगींहि जमिनीकडे तोंडें करून हरमळीनें चालूं लागलीं. डाडर आतां चांगली माझ्या नेटांत आली, आणि तत्काल तिजवर मीं एक आवाज टाकला. डाडर जमिनीवर पडलेली मीं नजरेनें पाहिली गाडींतून आतां खालीं उडी घेणार इतक्यांत, त्या आवाजासरसा तिच्याच मागें असलेला नर एकदम वेगानें सरळ पुढें उसळला. तत्क्षणीं मीं दुसरा आवाज त्यावर टाकला, आणि तोहि जमिनीवर कोसळलेला पाहून अस्मादिकांची स्वारी मोठ्या खुषींत गाडींतून उतरून ती डाडर पडली होती तिकडे निघाली. जंगलांत जावें न लागतां मळ्यांतल्या मळ्यांत जाग्यावर बसून, अशी फर्मास शिकार आज विनाआयास साधली, मग चित्तास आनंद कां होऊं नये? हर्षोत्फुल्ल मनानें, बंदूक पुन्हा भरण्याचें कारण अर्थातच न राहिल्यामुळें ती न भरतां—ती डाडर पडली होती तेथवर आपल्या नादांतच आलों, अन् बघतों तों काय! पोकळमार्शी लागलेली ती डाडर केव्हांच उठून ओढापार झाली होती! तसाच लगबगीनें मी परत फिरलों, आणि आवाज खाऊन पडलेल्या त्या नराकडे मीं माझा

मोर्चा फिरविला. आणि काय आश्चर्य सांगावें! झांझ उतरल्यावर तोहि उठून पसार झाला होता !! एकाच सावजावर दोन्ही आवाज टाकून त्यास पुरें करावयाचें तें न करतां, दोन्ही सावजांचा हव्यास धरल्यामुळें माझी अशी फसगत झाली आणि त्या दोघांनींहि माझ्या हातावर अक्षरशः तुरी दिल्या. प्रत्यक्ष कुणीं थोबाडींत (श्रीमुखांत म्हणा हवें तर) मारली असती तरी वाईट वाटलें नसतें, इतकें त्या वेळीं मला वाईट वाटलें! 'लेफ्ट-राइट' करीत कसा-बसा मी गाडीपाशीं गेलों. हातांतली बंदूक साटींत भिरकावून दिली, अन् त्या बदमाष डुक्कर-दांपत्याच्या नांवानें हात चोळीत अन् बोटें मोडीत, उजा-डतें केव्हां याची वाट पाहत (खावयास चुरमुरे जवळ नव्हते म्हणून) स्वस्थ बसलों.

"या जातीचें सावज पुरें ठार झालेंसें वाटलें तरी, दुसरी गोळी घाला-वयाचीच," असा धडा त्या दिवसापासून मीं घेतला.

वाङ्मयशोभा,
मार्च १९४४

---

## रक्तरंगील रंगपंचमी : : १२

फार खराब लागली होती वेळ आज मला बाहेर पडायला! फाटकाबाहेर मीं पाऊल टाकलं मात्र. तालीजवळच्या उंच लिंबाच्या शेंड्यावर बसलेल्या त्या बटबटीत डोळ्याच्या भेसूर घुबडानं घूत्कार केला, घूऽऊऽऽ घूऽऊऽक्!

मला अशी भिरड आली अन् वाटलं, पाडावं याला झाडाच्या शेंड्यावरून! पण पुन्हा मनाला वाटलं, आज सणासुदीच्या दिवशीं अन् असल्या रामप्रहरांत नको बंदुकीला घुबडाच्या रक्ताचा विटाळ व्हायला. असल्या फडतूस गोष्टींचा विधिनिषेध बाळगणारा मी नव्हतों. तरी पण हा शुभशकुन खचितच नव्हे, इतकं मनांत आल्यावांचून मात्र राहिलं नाहीं!

विचारमग्न अंतःकरणानेंच मळा अन् मळ्यालगतचा तो रुंद ओढा ओलांडून मी पलीकडच्या काळ्याभोर ढाशीवर येऊन पोंचलों. आकाशांत चंद्राचा प्रकाश मंद मंद होत चालला होता, आणि शुक्राचा तारा उदय पावून लांबवर मजल मारून आल्यामुळें विश्रांतीकरितां तो वाटेंतच किंचित् थबकला होता. फटफटावयाच्या आंत रामोशांच्या इनामांत जाऊन दाखल व्हावयाचें मनाशीं मीं ठरविलें अन् जरा पाऊल उचलूनच चालूं लागलों. एखाद्या गड्यास बरोबर घेतल्यावांचून मी सहसा रानांत निघत नसे. रंगपंचमी होती आज. मला वाटलं, सारीं गडीमाणसं आपलीं जुजबी कामं उरकून सुटीप्रमाणें आजचा सणाचा दिवस मौजेंत घालविणार, आणखी त्यांतल्या एखाद्यालाच कशाला सारा दिवस आपल्याबरोबर ताबडावयाचा! 'शिकार मिळूं द्या, मग पाहतां येईल!'

झपाझप मी रस्ता काटीत होतों. डोक्यांत कसले तरी विचार गर्दीगर्दीनें शिरत होते, आणि तेथेंहि फारसे न ठरतां कुठं तरी निघून जात होते. इनामाच्या पठाराची चढण चढत असतां उजाडलं केव्हां हेंहि मला कळलं नाहीं.

* * *

रामोशांच्या इनामाच्या उगवत बाजूस असलेल्या विस्तीर्ण डोंगरपठारास आणि त्या पठाराच्या बगलांनीं असलेल्या अडसरांस आणि भयाण भासणाऱ्या खोपाडांस 'गिरीमचा वाघळा' असें नामाभिधान आहे. तो सगळा भाग दाट निवडुंगानं व्यापलेला असून तिथं काटवणहि खूपच दाट आहे. नितान्त ओसाडी असल्यामुळं तिथल्या निवडुंगाच्या प्रचंड पीलांतून विपुल रानडुकरं असून अडसराअडसरांनीं हरणंहि स्वैरपणं विहरत असतात.

अडचण धरून, मी हळुहळू हरणं असलेल्या 'वाघदऱ्या'च्या एका अडसराला—झुडुपांनीं झाकळलेल्या एका खडप्यावर जाऊन टेकलों. बराच वेळ मी, हरणं चरणावर नादावतील आणि चरत चरत पुढें सरतील या आशेनं तिथं बसून राहिलों, पण तीं हराम हरणं मी असलेल्या बाजूस बिलकुल फिरकेनात. अर्धेमुर्धे गिळलेले गवताचे घास तोंडांत तसेच धरून तीं मध्येंच थबकत, अन् कान टवकारून मी छपून असलेल्या अडसराकडे रोखून दृष्टि लावीत! शंकित झाल्यासारखीं चंचल चित्तानं तीं वावरत होतीं. मला त्यांनीं निश्चितपणं हेरलं नसलं तरी, बंदुकीचा आणि शिकाऱ्याचा वास त्यांच्या तीक्ष्ण घ्राणेंद्रियांस लागल्याप्रमाणं वरचेवर भयशंकित होऊन तीं चमकून जात, अन् त्या खांडव्यांतले दोन्ही-तिन्ही काळे रंजुक खाल्ल्याप्रमाणें जागच्या जागींच उंच किरणें घेऊन, संशयनिवृत्त होत्साते पुनः निश्चिंत मनानं खालीं माना घालून 'आलबेल' चरूं लागत! शिकाऱ्यानं नव्हे, पण एखाद्या रसिकानं अथवा मानसशास्त्रज्ञानं अभ्यासण्याजोगं दृश्य होतं तें!

एका जागीं बसून बसून कंटाळा आल्यामुळं, मी लांबून वळसा घेऊन त्या खांडव्याच्या पिछाडीस जाण्याच्या इराद्यानं छपत छपत निघालों. सरासरी एक फर्लांगभर मी गेलों असेन, इतक्यांत– सहजासहजीं– आपल्या मनानंहि असेल! तो हरणांचा खांडवा तो अडसर ओलांडून डाव्या बाजूकडच्या बिरोबाच्या सुळक्याकडे निघाला. मीं आपली जागा सोडली अन् लगोलग तीं हरणंहि तो अडसर सोडून निघालीं. या दोन्ही एकसमयावच्छेदेंकरून घडलेल्या घटनांचा कार्यकारणसंबंध हमखास होताच असं कांहीं म्हणतां येणार नाहीं; पण चोराच्या मनांत चांदणं! 'आपल्याला त्या हरणांनीं हेरलं तर नसेल' अशी शंका मला आली, अन् त्यांना कुठं तरी जाऊन स्थिरावण्यास अवसर देण्याच्या हेतूनं मी आणखी थोडा वेळ त्या खांडव्यावर

नजर राहील अशा बेतानं तिथंच एका झाडाखालीं बसून राहिलों. खिशांतून दोन विड्या काढून त्या पार त्यांच्या हिरव्या करगोट्यापर्यंत खेचीत नेल्या, अन् हाताच्या कोपराचं उसं घेऊन अन् पाय चांगले तणावून, फारा दिवसांत मोतद्दाराची गाठ न पडलेल्या काठेवाडी तुरंगमासारखा मी या कुशीवरून त्या कुशीवर यथेच्छ लोळलों !

जरासा वेळ अशा रीतीनं अंग मोकळं केल्यावर, मी तो खांडवा झुकला होता त्याच्या पाठीवर आस्ते आस्ते निघालों. ऊन्ह चांगलंच चटकूं लागलं होतं. घशास कोरड पडल्यासारखी झाल्यामुळं, खिशांतलं कागदी लिंबू काढून एका पातळ दगडाच्या कपारीनं तें चिरलं, अन् त्याचं एक अर्धुक चोखीत चोखीत मी अडसराची उतरण उतरूं लागलों. तो हरणांचा खांडवा दूरवर लांबल्यामुळं, बंदुकीचं एवढ्यांतच कारण पडणार नाहीं असा माझा समज झाला होता; म्हणून डाव्या हातांत बंदूक घेऊन, उजव्या हातांतल्या लिंबाच्या फोडी चुंफीत चुंफीत आळसटपणानं मी पावलं टाकीत होतों. निम्मीशिम्मी उतरण उतरून मी एका लहानशा टेपाडाशीं आलों. माझ्या ध्यानींमनींहि नसलेला अन् मीं अपेक्षिलाहि नसलेला क्षण अगदीं माझ्या नजीक येऊन ठेपला होता. एका खिल्लाराचीं कुत्रीं मागं लागल्यामुळं, दूरवर निघून गेलेला तो हरणांचा खांडवा सपाट्यानं परत फिरला, अन् अकस्मात् वाफडत वाफडत माझ्या अगदीं समीप आला. माझी खबर अर्थातच त्यांना नव्हती, अन् कदाचित् ती असती, तरी मला टाळून जाण्यास आतां त्यांना तसा अवसराहि नव्हता. विद्युत्वेगानं हातांतल्या लिंबाच्या फोडी मीं फेकून दिल्या, अन् बंदुकीचे दोन्ही ट्रिग्गर एकदमच उघडून, दोन्ही बक्शॉट्स् एकामागं एक मीं त्या खांडांतल्या धावत्या काळविटांवर टाकले. पुढले दोन्ही काळे शाबूत निसटून गेले, अन् तिसरा तृणदिशीं उशी खाऊन, झंझावातानं गिरिशिखराचा कडा तुटून पडावा त्याप्रमाणं, वेगानं खालीं जमिनीवर कोसळला.

"मी मनुष्य बरोबर आणला असता तर बरं झालं असतं" असं आतां मला वाटलं ! 'पश्चात् बुद्धि बामनिया' ही म्हण काय उगाच प्रचारांत आली? आमचं दोषाविष्करण करणारी ती म्हण तोंडांतल्या तोंडांत मी गुणगुणलों, अन् 'गतं न शोच्यम्' असं मनाशींच उद्गारून मी पुढील तजविजीस लागलों.

शिकार कुणाच्या तरी हवालीं केल्याशिवाय घराकडे परतणं मला शक्य

नव्हतं. घरीं गेल्यावर झालेली शिकार आणण्याकरितां गडी पाठवावेत असं मीं मनांत योजून ठेवलं, पण रानांत कुणी तरी ओळखीचं माणूस आढळेपर्यंत वाट पाहणं मला भाग होतं. शिकार उन्हांत तापत पडली होती.

मुंग्या लागूं नयेत, अन् कावळे-घारवटं पडूं नयेत, म्हणून मीं त्या निर्जीव काळ्याच्या खालीं अन् वर दाट लिंबाचा पाला अंथरून दिला, अन् पुन्हा बंदूक भरून आणि बंदुकीचा ट्रिग्गरहि उघडून एखाद्या लष्करी चौकीदारा-सारखा इकडून तिकडे येरझारा घालीत सभोंवार फिरत राहिलों.

* * *

बिरोबाच्या देवालयाच्या आग्नेयीच्या कोपऱ्याकडचं गिरीमच्या बाजूचं खोपाड काळ्याकुळकुळीत शिलाशलाकांनीं आणि दाट डोंगरी गवतानं व्यापलेलं असतं. त्या खोपाडाच्या बगाटानं, देवळाच्या बाजूकडे नजर राखून मी फिरत फिरत कसा तरी वेळ काढीत होतों. थोडयाच वेळापूर्वीं मीं त्या काळ्यावर टाकलेला आवाज आसमंतांतल्या सचेतन जीवांच्या कर्णरंध्रांवरून घुमून गेला होता. त्या धोक्याच्या इशाऱ्यानं तेथले वन्य प्राणी सावध झालेले होते, अन् त्या श्वापदांची तीक्ष्ण अन् शोधक दृष्टि आगामी संकटाची चाहूल घेत सभों-वार भिरभिरत फिरत होती. माझी कांहीं तरी चाहूल लागल्यामुळं जवळच्याच तृणाच्छादित खिळयांत पडून असलेली एक भयंकर मेसूर, पण दिवस पूर्ण भरल्यामुळं अगदीं लोंबकळलेली (व्यावयास झालेली) लास (लांडग्याची मादी) त्या खिळयांतून बाहेर येऊन, कुत्र्याप्रमाणं आपलं अंग शिरशिरून झाडून, अन् शेपूट पिंजारून संथपणें त्या खोपाडाची उतरण उतरूं लागली.

माझी नजर तिच्याकडे जातांच बंदूक खोलून बंदुकींतली एल्. जी. काड-तुसं काढून गोळीचीं काडतुसं भरण्याच्या उद्देशानं, बंदुकीचं तोंड खालीं जमिनीकडं करून मी घाईघाईनं बंदुकीचा उघडलेला ट्रिग्गर, वर अंगठा देऊन बोटानं खेचला. घाईघाईंत चापावरचा अंगठ्याचा दाब ढिला पडल्या-मुळं ट्रिग्गर एकदम निसटून आंतल्या काडतुसाचा स्फोट झाला, अन् खालीं कच्चा कातळ असल्यामुळं, त्याचे शतशः उडालेले कण माझ्या पोटऱ्या-मांडयांत अन् थोडेसे माझ्या तोंडावर अन् गळ्यांतहि घुसले! विशेष गंभीर स्वरूपाची जखम मला झाली नाहीं, अन् डोळ्यांत कण शिरून 'धृतराष्ट्राचं ऐश्वर्य' मला लाभलं नाहीं, ही दैवाची मजवर मोठी खैरच झाली म्हणायची!

माझ्या पायांची अन् नेसत्या धोतराची अक्षरशः चाळण होऊन गेली होती. तोंडावरून मीं हलकेच हात फिरविला. रक्तानं माखलेला तो लाल हात तसाच उपडा धरून मी मटकन् खालीं बसलों. पोटऱ्यांतून अन् मांडयांतून रक्ताचे थेंब ठिबकत होते. ते टिपून टिपून माझ्या धोतराचा सोगाहि लालीलाल होऊन गेला. माझा घसा कोरडा ठाक पडला अन् प्रखर उन्हामुळं, मला आतां चक्कर येऊं लागली. अंगांत शिरलेले ते कातळाचे बारीक बारीक कण मनस्वी सलूं लागले. त्यांतले कांही निमुळते कण शरीरांत खोलवर रुतून बसले होते, अन त्यामुळं होणाऱ्या वेदना मला सहन होईनाशा झाल्या. कुठं तरी सावलीला जाऊन बसावं असं मला वाटूं लागलं. देवळासमोरचं वडाचं झाड कांहीं विशेषसं लांब नव्हतं, पण तें कित्येक योजनं लांब असल्याप्रमाणं मला झालं होतं! मोठ्या कष्टानं बसत उठत मी त्या झाडाखालीं जाऊन पडलों. माझ्या दैवाशिवाय मला साहाय्य करणारं इथं कुणीहि नव्हतं. तें केव्हां साहाय्य होतं याची मार्गप्रतीक्षा करीत, एकाकी असा मी त्या झाडाखालीं कण्हत पडलों होतों.

क्षणभरानं एका खिल्लाराचं मेंढरांचं खांड चरत फिरत तिथं आलं, अन् मला तिथं पडलेला पाहून त्या कळपाचे दोघेहि धनी धनगर ( खिल्लार ) मज-पाशीं येऊन, अन् वासवेल तितका तोंडाचा आ वासून मजकडे नुसतेंच बघत उभे राहिले. मला पाजण्यास त्यांच्यापाशीं मधुर पाणी नव्हतं, पण मंजुळ-वाणीचाहि त्यांच्या ठिकाणीं अभाव होता! माझी अवस्था पाहून अन् माझी हकिकत ऐकून, "बिरोबाच्या पठारावर हरणांची 'हत्या-पारपत' करणारावर देवाचा असाच कोप होतो," असं म्हणून खांद्यावरल्या घोंगडया हवेंत उड-वीत अन् आपलं मेंढरांचं खांड वळीत वळीत लगबगीनं ते उजव्या बाजूची लहानशी खिंड उतरून पार झाले.

एक प्रदीर्घ निःश्वास टाकून मी पुनः तिथंच जमिनीवर लवंडलों. अद्याप मधून मधून मला भोंवळ येत होती. 'ऊन्ह कमी झाल्यावर जरा बरं वाटेल, सायंकाळचा गार वारा अंगास लागल्यावर थोडी हुशारी येईल, अन् मग मळ्याकड निघूं' असा मनाशीं विचार केला, अन् पोटऱ्या-मांडयांवरल्या कांहीं मोठया छिद्रांतून रक्ताचे बिंदू आलेले होते ते टिपून काढून थोडासा फुफाटों घोळून त्या जखमांवर बसविला. माझं सारं अंग कमालीचं जड आलं होतं, अन्

घरापर्यंत कसं जातां येईल' या विवंचनेनं मनहि ग्रासून गेलं होतं. चाचणी 'पाहण्याकरितां मोठया मुष्किलीनं मी उठून उभा राहिलों. वाडीकडून येणाऱ्या वाटेकडे सहजगत्या माझी नजर गेली, अन् त्याच क्षणीं माझी सारी चिंता निखालस नाहींशी झाली ! वाडींचा भिवा गावडा डोकीवर पाण्याची खापरी घागर घेऊन खिंड चढून माथ्यावर येऊन पोंचला होता. त्यानं फक्त लंगोटी पेहेरलेली होती, अन् त्याच्या त्या चौपदरी आंबट-ओल्या लंगोटीवर रुप्याचा दुहेरी जाडजूड गोफ रुळत होता. मला दुरूनच ओळखून त्यानं रामराम घातला. त्याचा रामराम घेऊन मीं त्याला जवळ बोलावलं. तो माझ्याजवळ आला मात्र! किलकिले डोळे करून त्यानं एकवार माझ्याकडे नीट न्याहाळून बघितलं. त्याचीं धनुष्याकार कुरळीं झुलपं वाऱ्यानं भुरभुरत होतीं. त्याच्या डाव्या कानांत गुळासारख्या सोन्याचा बाळा लोंबत होता, अन् तो त्याच्या धनगरी रुबाबाला मोठा खुलूनहि दिसत होता. त्याची ती भेदक नजर, अन् त्याच्या त्या एकंदर आविर्भावावरून मजबद्दल त्याची कांहीं तरीच विपरीत कल्पना होऊन गेल्याचं माझ्या दृष्टोत्पत्तीस आलं. त्याच्या मुद्रेवरचा भाव या वेळीं पाहण्यासारखा होता. झट्दिशीं ती अवधूतांची स्वारी खालीं चवडयावर बैठक मारून बसली, अन् बोटांनीं जमिनीवर थोडासा खळगा करून त्या खळग्यांत त्यानं ती खापरी घागर सावकाशपणें ठेवून दिली. नंतर आपले दोन्ही हात दोन्ही कानशिलांवर टेकून तो गंभीरपणानं मला म्हणाला– 'तात्या, ह्ये तुमचं लक्षण कांहीं भलं नाहीं. कशापायीं असलं वंगाळ काम केलंत ! अशी काय तुमच्या जिवावर गोणी आली होती म्हून...
' बरं तर बरं...'

त्याच्या त्या बोलण्याचं, हसण्यासारख्या मनःस्थितींत नसतांहि मला हसूं आलं. घडलेली इत्थंभूत हकिकत मीं त्याला सांगितली. यावर चकार शब्द न काढतां, तो एकदम उठून ओणवा झाला, अन् दोन्ही हातांनीं ती खापरी घागर उचलून घेऊन मला म्हणाला– 'पहिल्यानं तुम्ही गुळणा करा, अन् वाईच पानी घोटा म्हणजे तुमच्या अंगांत तकवा येईल.'

अलीकडे मरूं घातलेली माणुसकी त्या गांवढळ दिसणाऱ्या भिवाच्या देहांत अजूनहि जिवंत होती. त्याच्या घागरींतलं तें शीतळ पाणी प्रत्यक्ष पिऊनहि झाली नसती इतकी तृप्ति, त्याच्या मुखावाटे बाहेर पडलेल्या त्या

हार्दिक अन् मधुर भाषणानं, माझी झाली. माझा जीवात्मा, त्याच्या त्या सहानुभूतिपूर्ण अन् आस्थेवाईक वृत्तीनं खरोखरच थंडगार होऊन गेला. मी त्याला म्हणालों– 'भिवबा, देवाला घालण्याकरितां आणलेलं पाणी पहिल्यानं तुम्ही देवावर घालून या. मला पिण्यापुरतं थोडंसं वगळा, म्हणजे झालं. तुम्हीं देवाला पाणी घालून येईपर्यंत कांहीं मोठंसं बिघडत नाहीं!'

'छे, छे!' तो म्हणाला. 'वेळवखत घेवाला कळत नाहीं असं का तुम्हांस्नी वाटतं? माझा बिरोबा रुसणार नाहीं. तुम्हांस्नी पाणी पाजून राह्यलेलं पाणी मी घेवास घालीन.'

स्वच्छ हात धुवून मी खुळखुळून चुळा भरून टाकल्या, अन् त्या प्रेमळ धनगरानं वाढलेलं तें अमृताप्रमाणं मधुर पाणी ओंजळीनं मी यथेच्छ प्यालों. निःसंशय त्याच्या त्या धनगरी देहांत सुसंस्कृत मन अन् सहृदय अंतःकरण होतं. कृतार्थ झाल्याचा आनंद त्या वेळीं त्याच्या मुद्रेवर सुस्पष्ट दिसत होता. मोठ्या लगबगीनं तो उठला. राहिलेलं पाणी घाईघाईनं जाऊन त्यानं देवावर घातलं, अन् घागर तिथंच कोपऱ्यांत उभी करून, तो माझ्या वसतीवर माणसं अन् गाडी आणण्याकरितां त्वरेनं निघाला. 'वाटेनं कुणी आढळल्यास तुम्हांकडं लावून देतों,' तो जातां जातां मला म्हणाला!

अभावितपणें माझ्या डोळ्यांतून दोन कढत अश्रु माझ्या धोतरावर ठिबकले. माझा अहंकार या घटकेला साफ नाहींसा झाला होता, अन् मनुष्याचा पराधीनपणा आज जसा मला उत्कटत्वानं जाणवला, तसा तो पूर्वीं कधींहि जाणवला नव्हता!

* * *

अगदीं हळूहळू पावलं टाकीत मी त्या अरुंद पठाराच्या कडेला जाऊन बसलों. फार वेळ मला तिष्ठत बसावं लागलं नाहीं. माझ्या मळ्याच्या बाजूला माझी दृष्टि खिळून राहिली होती. धुराळ्याचे लोटच्या लोट हवेंत उठत पुढं पुढं सरत होते, अन् त्याच्या आंत माझी गाडी मला गाठण्याकरितां वेगानं पळत होती.

बोल बोल म्हणतां गाडी येऊन पायथ्याशीं खडी झाली, अन् थोड्याच वेळांत भिवा माझ्या गड्यांसह त्या खिंडीची चढण चढून येऊन माझ्या-समोर उभा राहिला.

माझी बंदूक मीं माझ्या एका गडयाजवळ दिली, अन् तो पाल्याखालीं झाकून ठेवलेला काळा आणावयास दुसऱ्या दोघांस रवाना केले. तेवढ्यांत भिवाहि देवळांत ठेवलेली आपली घागर घेऊन आला, अन् येतांना चिमटींत आणलेला अंगारा त्यानं माझ्या ललाटप्रदेशावर भरपूर माखला !

त्या दोघांच्याहि खांद्यांवर हात टाकून मी डोंगराची उतरण उतरूं लागलों. माझे पाय अन् अंगहि मनस्वी ठणकत होतं. कसाबसा मी गाडीपर्यंत आलों. शिकार पुढल्या शिडींत लादली, अन् आम्ही सारेजण घराच्या मार्गास लागलों. दौंड रस्त्यावर आमची गाडी येतांच भिवा गाडींतून उतरून पडला, अन् तावडतोब दवापाणी करण्याबद्दल मला निक्षून बजावून तो तडक वाडीकडे चालता झाला.

* * *

माझी गाडी घराशीं येऊन पोंचली तों दिवस पार बुडाला होता. अजूनहि मुलं रंग खेळण्यांत दंग होतीं. मला गाडींतून उतरलेला पाहतांच तीं मज-भोंवतीं गोळा झालीं. जाणतीं मुलं अगदीं चीपचाप होतीं. पण माझी सर्वांत धाकटी छोकरी बाबादी हलकेच मजजवळ येऊन म्हणते—

'तात्या, तुमच्या अंगावर कुणी रंग उडवला !'

तिच्या त्या मधुर निर्व्याज प्रश्नाचं मला हसूं आलं, अन् माझा सारा शीणभाग सुतराम् नाहींसा झाला !

सह्याद्रि,
एप्रिल १९४४

---

## ....पूर संस्थानांतील वाघाची शिकार :: १३

दोन-तीन मोठाल्या स्टेशनांवर एखादें मराठी दैनिक मिळतें कीं काय याचा तपास केला. पण तें न मिळाल्यामुळें मीं 'हिंदुस्थान टाइम्स' घेतला व तो उलथापालथा करीत बसलों होतों. त्यांत त्या पत्राच्या ...पूरच्या बातमीदारानें, "खुद्द ...पूर शहराला अलीकडे वाघांपासून फार उपद्रव पोंहोचत असल्याकारणानें, दरबारच्या हुकुमावरून पुढील आठवड्यांत शिकारपार्टी पाठवून वाघ मारून टाकण्याचें ठरविण्यांत आलें आहे," अशी बातमी दिली होती. ...पूरपासून बारातेरा मैलांवरच मोठें जंगल होतें व त्या जंगलाच्या आसपासच्या खेड्यांना ही पीडा आज बरेच दिवस सोसावी लागत होती. कांहीं खेडुतांना व वाटसरूंनाहि कित्येक वेळां दगा झाला होता. पण दरबारनें आजवर तिकडे विशेष लक्ष पुरविलें नव्हतें. आतां खुद्द राजधानीकडेच त्यांची संक्रांत वळली, तेव्हां या तक्रारीची दाद घेणें प्राप्तच झालें होतें.

बातमी वाचतांच, पेशावर एक्स्प्रेस दिल्लीला पोंहोचते केव्हां असें मला झालें. दिल्ली स्टेशनवर उतरून मी आपल्या ठिकाणीं गेलों, तों मध्यरात्र उलटून गेली होती. झोपण्याकरितां मीं पथारी पसरली व आडवा झालों. पण डोक्यांत शिकारीबद्दलचेच विचार सारखे घोळत असल्यामुळें झोप येईना. सकाळीं उठल्यावर डॉ. अयोध्यानाथ माथुर म्हणून नव्या दिल्लींत माझे एक स्नेही होते त्यांच्याकडे गेलों. धंद्याच्या निमित्तानें ते ...पूरला नेहमीं जातयेत असत. त्यांना घेऊन दिल्ली येथें दरबारचे वकील असत, त्यांची गाठ घेतली, आणि त्यांजकडून ...पूरच्या शिकारखाना अंमलदारांना देण्याकरितां एक ओळखपत्र घेऊन दुसऱ्या दिवशींच म्हणजे ता. १७ डिसेंबर रोजीं मीं ...पूरचा रस्ता सुधारला. तेथें गेल्यावर दुसऱ्या दिवशीं सकाळीं आठ-साडेआठ वाजतां मी शिकारखाना अंमलदारांची मुलाखत घेण्याकरितां गेलों. संस्थानी बडे नोकर ते. मजसारख्या सामान्य मनुष्याची दाद तेथें लवकर कशी

लागणार ? मी तेथें कमेरेत ( कचेरींत ) तास-दीड तास बसून राहिलों होतों. शेवटीं हिय्या करून एका हवालदाराशीं संधान बांधलें व त्याला 'राजी' केलें तेव्हां कोठें माझी दाद लागली ! थोड्याच वेळानें मला बोलाविण्यांत आलें व कर्नेलसाहेबांपुढें जाऊन मी उभा राहिलों. तेथील रीतीप्रमाणें त्यांस मुजरा केला आणि ओळखपत्र त्यांच्या हातीं दिलें. तुम्हीं कोण, कोठले राहणार, तुमची जात काय, पूर्वीं कधीं वाघाची शिकार केली आहे कीं काय, वगैरे पूसतपास त्यांनीं ( ओळखपत्रांत ही सर्व माहिती दिली असतांहि ! ) केली. माझ्याकडे ते जरा विस्मयचकित नजरेनेंच बघूं लागले. कोणीकडे त्यांचे ते साफे आणि शमले, कोणीकडे त्यांच्या त्या तंग सुरवारी, आणि कोणीकडे तो ग्रोसभर गुंड्या शिवलेला पायघोळ कोट ! माझा पोषाक म्हणजे अंगांत सदरा, वर कोट आणि डोकीवर सव्वा रुपयावाली टोपी. त्यांनीं हसूं नये तर काय करावें ? केवळ पोषाखांतच सारें शौर्य किंवा माणसाचा पराक्रम झाकलेला असतो, अशी त्यांची प्रामाणिक समजूत असावीसें दिसलें. सत्तर पिढया हत्याराचें तोंड न बघतां, केवळ लष्करी पोषाख अंगावर चढवून क्षत्रियत्वाचा डौल त्या संस्थानांतील कित्येक लोक मिरवीत. पण मला महाराष्ट्रीयाला तें जमण्यासारखें नव्हतें. त्यांचें तें उपहासगर्भ हसणें मी नादानपणाचें द्योतक समजलों, आणि आपल्या कार्यावर नजर देऊन शांतपणानें पुढें काय होतें याची वाट पाहत राहिलों.

कर्नेलसाहेबांनीं एका शिपायास मला ठाणवईवरची रायफल काढून देण्यास सांगितलें. त्यानें ती देतांच मीं एकवार ती नीटपणें तपासून पाहिली, आणि त्यांच्यापाशीं काडतुसें मागितलीं. रायफल् खोलली, आणि काडतुसें भरलीं. समोरच्या लिंबाच्या झाडावर दोन आवाज टाकण्याचा कर्नेल-साहेबांनीं मला हुकूम केला. मीं बंदूक खवाट्यास लाविली, आणि एकामागें एक दोन आवाज टाकले. दोनहि गोळ्या लिंबाच्या खोडांत जाऊन घुसल्या. आतां थट्टाबिट्टा सर्व संपली, आणि मंडळी जरा 'सीरिअस्' दिसूं लागली. पहिल्या गोळ्या घुसल्या होत्या त्यांच्यावर, चॉकनें 'बुल्स् आय्'ची निशाणी करून, पुन्हा आवाज टाकण्याचा मला हुकूम झाला. मीं पुन्हा सावकाशपणें दोन आवाज टाकले आणि पहिल्याप्रमाणें तेहि अचूक बसले. ( वास्तविक ही परीक्षा वाघाच्या शिकारीला फारच अपुरी होती. )

थोडा वेळ इकडल्या तिकडल्या गप्पा झाल्यावर मला दुसऱ्या दिवशीं सकाळीं येण्यास सांगितलें. जातां जातां, त्यांना माझ्या जातीची पुन्हा आठवण झाली, आणि कोणत्या विशिष्ट जातीचा ब्राह्मण म्हणून त्यांनीं मला विचारलें. 'महाराष्ट्रीय चित्पावन ब्राह्मण' म्हणून मीं त्यांना सांगितलें, तरी त्यांना कांहींच उमज पडेना. अखेर तेच म्हणाले, 'आप् पेशवावाला बम्मन हो!' 'जी हां' म्हटल्याबरोबर त्यांनीं थोडीशी मान लवविली. पेशव्यांच्या नांवाचा महिमा अगाध आहे, एवढें खरें!

आतां त्यांचें आश्चर्य साफ नाहींसें झालें, आणि त्या एकंदर मंडळींत थोडीशी वाटाघाट होऊन, मला शिकार पार्टींत घेण्याचें मुक्रर ठरविण्यांत आलें. मीं त्या मंडळींना अभिवादन करून निघालों.

* * *

पार्टी बावीस तारखेला निघावयाची होती व तीन दिवसांचा (पहिला हप्ता) प्रोग्राम ठरला होता. वीस तारखेलाच हाके व रानकाढे वगैरे आणि तंबू वगैरे सामान रवाना झालें होतें. मी तेथें अगदीं योग्य वेळीं पोंहोचलों होतों. तीन योग्य बाऱ्यांवर माचवे बांधावयाची तरतूद झाली होती. खाशी मंडळी मुक्कामास जंगलांतील कॅम्पांत न राहतां मोटारीनें ...पुरास जावयाची होती.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं शिकारखान्यांत जाऊन मीं पुन्हा सर्वांच्या गाठी-भेटी घेतल्या आणि एकंदर कार्यक्रमासंबंधीं अवश्य ती माहिती करून घेतली.

बावीस तारखेस पहाटेच सर्वजण मोटारीनें निघालों. शिकारीची सर्व तयारी पूर्ण होऊन थोडीशी न्याहारी करून, चहा पिऊन (चहा मागितला तरच मिळतो.) जो तो आपापल्या ठिकाणीं निघाला. तीन माचव्यांवर से. लेफ्टनंट भूपालसिंह, (ले. कर्नलसाहेब शिकार पार्टींत नव्हते.) रिसालदार मेजर हरा-सिंग, आणि तिसऱ्या नंबरच्या माचव्यावर जरदानसिंग नांवाचा एक डफेदार असे मदतगारांसह झोल्यांतून वर चढले. मला, जिकडे सावज फार करून जाण्याचा संभव कमी, अशा एका बारीवर त्यांनीं नेमिलें. सदर जागा चांगली दोनअडीच पुरुष उंचीची अशी निमुळती दरड होती व चांगली सुरक्षितहि होती. एका भल्यामोठ्या दगडाच्या आड (दडून बसण्यास आडोसा अथवा

दगड, झुडूप नसल्यास 'ॲम्बुश' तयार करतात.) मी आणि माझा गाइड असे सावधगिरीनें बसलों. हाक्यांच्या आरोळ्या सुरू होऊन दोन-अडीच तास झाले, परंतु जनावर कांहीं केल्या उठल्याची चाहूल लागेना. कंटाळा येऊन गेला. शेवटीं दीडदोनच्या सुमारास गलबला फारच वाढला आणि जनावर उठल्याचा बोभाटा झाला. परंतु पुन्हा कांहींहि नाहीं. जनावर आडवळणानें निघून गेलें म्हणून समजलें. जरा दिवस असतांच 'फ्लूक डे' गेल्याबद्दल हिरमुसलेले असे आम्ही सर्वजण कॅम्पावर परतलों.

*　　　*　　　*

दुसऱ्या दिवशीं यथापूर्व सुरुवात झाली. मी आणि माझा गाइड आपापल्या जागीं जाऊन बसलों. मला माचव्यापेक्षां माझी जागाच सोइस्कर वाटली. माचवा रात्रीच्या शिकारीला—सावज आपल्या लक्ष्यावर आलें असतां—चांगला. परंतु दिवसाच्या खुल्या शिकारीला, जनावराच्या हालचालींच्या अनुरोधानें आपणास फेरबदल करण्यास अथवा ठाण चाळवून घेण्यास खुली जागाच बरी, असें माझें मत होतें. आतां बसून बसून माझ्या पायांना मुंग्या आल्या होत्या, म्हणून मी जरा पाय आपटीत बसलों. इतक्यांत नंबर एकच्या माचव्यावरून खाडकन् आवाज झाला, त्याबरोबर मी अत्यंत सावधगिरीनें दगडावरून डोकें वर काढून तयार होऊन बसलों. वाघ दक्षिण बाजूच्या नेहमींच्या बारीवर न जातां मी बसलेल्या बारीच्या बाजूच्या ओघळींनें मुरत मुरत, सरळ आणि संथपणानें पण त्वेषानें गुरगुरत येत होता. त्याचे हिरवेचार डोळे म्हणजे जणूं काय रागाची ज्योतच जळत आहेसें मला भासलें. त्याच्या जबड्याची भीति वाटली नाहीं, इतकी त्याच्या त्या लांब शेपटीची भयंकर वळवळ पाहून मला वाटली. जनावर (वाघ) जरा तिरकस रेषेंत येत होतें. थोडीशी जागा चाळवून त्याला मीं साफ आडवा घेतला, आणि देवाचें नांव घेऊन एकामागें एक-दोन आवाज टाकले. भीषण गर्जना करून आणि उंच किरण घेऊन तो जमिनीवर आदळलेला मीं पाहिला. याच जनावरावर लेफ्टेनंटसाहेबांनीं प्रथम टाकलेला आवाज खाली गेला, आणि झुडपांच्या अडचणीमुळें त्यांना दुसरा आवाज टाकण्यास अवसर न सापडल्यामुळेंच तो चान्स मला मिळाला. मी खालीं जाण्यास निघालों. परंतु वॉचमन्कडून इशारा मिळाल्याशिवाय जागेवरचें

हालवयाचें नाहीं असें मला माझ्याबरोबरच्या माणसानें सांगितलें. अवचित् दुसरें एखादें जनावर हाललें असल्यास त्याची आपणांस दखलहि नसते आणि त्यामुळें कित्येक वेळां दगे घडलेले आहेत, असें त्याच्या बोलण्यांत आलें आणि तें त्याचें अनुभवाचें म्हणणें मलाहि पटलें. थोड्याच वेळांत वॉचमन्नें एकंदर निरीक्षण करून आणि जनावर ठार झाल्याबद्दल खात्री करून घेऊन, मोठ्यानें शिटी फुंकून इशारा केला. त्यासरशीं एक एक मंडळी जमावयास लागली. लेफ्टनंट आदिकरून मंडळीहि खालीं आली. त्यांनीं येतांच अगोदर जनावर पाहून लगेच टेप् काढून जनावर मोजलें, तें बरोबर नऊ फूट दोन इंच भरलें. माझ्या हर्षाची पराकाष्ठा झाली होती; परंतु लेफ्टनंटसाहेबांनीं, एकदम दोन गोळ्या झाडून, चमडें खराब केल्याबद्दल थोडीशी नाराजीच दर्शविली !

अभिनंदनपर अवाक्षरहि न काढतां, चमडें खराब झाल्याबद्दलची त्यांची हळहळ पाहून माझ्या मनाची काय स्थिति झाली असेल याची कल्पनाच करा ! दोन पावलें मागें सरून मी खिन्नपणानें उभा राहिलों होतों. थोडा वेळ त्या मंडळींत बोलणें झाल्यावर लेफ्टनंट 'मूड'मध्यें आले व त्यांनीं मला जवळ बोलावून शेकहॅन्ड केला.

आणखी अर्ध्या तासानें सर्वजण कॅम्पावर गेलों व खाशी मंडळी तें वाघाचें धूड एका लॉरींत घालून ...पुराला निघून गेली. (पार्टीबरोबर कॅमेरा— रात्रीं फ्लॅशलाइटनें फोटो घेण्याचा— असतांहि कॅम्पावर फोटो घेण्यांत आला नाहीं, यांतील रहस्य वाचक जाणतीलच.)

थकून गेल्यामुळें वास्तविक रात्रीं मला झोप यावयास पाहिजे होती; पण मला एक मिनिटभरहि ती आली नाहीं. वाघाचें चमडें मागावें कीं काय या विचारानें चित्त अस्वस्थ होऊन गेलें होतें. चमड्याला एक छिद्र जास्त पडल्यानें जे इतके हळहळले, ते चमडें मला देतील कीं नाहीं याची वानवाच होती. पण मागून तर पाहावें असें मीं मनाशीं ठरवून टाकलें.

तो डिसेंबरचा महिना होता. थंडी मी म्हणत होती. उजाडेपर्यंत मी लांकडें जाळीत शेकत बसलों होतों, आणि एकामागें एक सिगरेट फुंकीत होतों.

उजाडल्यावर मीं चहा करविला आणि तीन-चार कप् चहा घेतला.

इतक्यांत ...पूरवाली मंडळीहि आली. थोड्या वेळानें आम्हीं जंगलाची वाट चालूं लागलों. वाट चालतांना मीं चमड्याबद्दल गोष्ट काढली. तेव्हां भूपालसिंहजींनीं, "तें सरकारांत दाखल करावयाचें असल्यानें तुम्हांस देतां येणार नाहीं" म्हणून सांगितलें! माझ्या आशेचा दिवा मिणमिण जळत होता तोहि विझून गेला.

माझें पाऊल पुढें पडत होतें, पण मन मात्र आतां मागें रेंगाळूं लागलें. मला त्यांच्याकडून कसलीच अपेक्षा नव्हती; पण जंगलांतील त्या उघड्या डगरीवर, दैवानें जें फळ माझ्या पदरांत टाकलें, तें अशा रीतीनें त्यांनीं छिनवून घेऊं नये असें मी इच्छीत होतों.

जड अंतःकरणानें मी आपल्या जागीं जाऊन बसलों. आज रान गेल्या दोन दिवसांपेक्षां अधिक धरिलें होतें. तरीहि फार वेळ न लागतां जनावर झटक्यास हाललें. लेफ्टेनंटसाहेब असलेल्या माचव्यावरून एकामागें एक खाड्-खाड् तीन आवाज निघाले आणि नंतर थोडा वेळ जिकडे तिकडे सामसूम झालें. शिरस्त्याप्रमाणें इशारा होतांक्षणींच सर्व मंडळी धावतच तेथें जमा झाली, आणि एक वाघिणीचें धूडचें धूड (कालच्या वाघापेक्षांही वाघीण मापांत एक इंच अधिक भरली.) आणि सरासरी मध्यमसर कुत्र्याएवढाले तिचे दोन बच्चे ले. साहेबांच्या रायफलीला बळी पडलेले सर्वांना दिसले. निमिषार्धांत तीन वाघ मारून, लेफ्टेनंटसाहेबांनीं शिकारीचा पहिला हप्ता पूर्ण यशस्वी केला.

पुढल्या हप्त्याकरितां राहण्याची शिकारखाना अंमलदारांकडून मला विचारणा झाली नाहीं; इतकेंच नव्हे, तर कालच्या शिकारीचा प्रसंग ते जणूं काय आठवणींनं विसरून गेले होते.

विविधवृत्त,
३ ऑक्टोबर १९४३

# एक प्रेक्षणीय सामना :: १४

'भीमाशंकरा'च्या पलीकडच्या जांभूळखोऱ्याच्या नैर्ऋत्येला, दोन-अडीच कोसांवर दोन उंच डोंगरांच्या खोपडांतल्या 'लमाण' दऱ्यांत किर्रर्र जंगल असून, तेथें वाघ, रानडुकरें वगैरे जंगली श्वापदांचा फार रहिवास आहे; आणि त्या जंगलाच्या पश्चिम बाजूला सपाट व प्रशस्त अशी पसरण असून, वाघाच्या खुल्या शिकारीला सर्वस्वी मनपसंत आणि शिकाऱ्याचा आनंद दशगुणित करणारें असें तें ठिकाण आहे. जंगलांत जिकडे तिकडे तमालवृक्ष विपुल असून, तमालपत्रांच्या आणि इतर वन्य लतापुष्पांच्या सुगंधानें तें जंगल दरवळून गेलेलें असल्यामुळें तेथें जातांच मन प्रसन्न होऊन जातें, आणि वृक्षांवरून विहरत असलेले मोरांचे थवेच्या थवे पाहून तें भयाण जंगलहि एखाद्या रम्य उपवनासारखें नेत्रांस आल्हाद देतें.

त्या खोऱ्याच्या आसमंतात् जागजागीं भिल्ल, कोळी, कातकरी आणि ठाकर वगैरे लोकांची वस्ती असून, रानटी श्वापदांच्या सहवासांत त्यांच्या पिढ्यान्‌पिढ्या गेलेल्या असल्यामुळें, ते लोक शिकारीसारख्या खेळांत मोठे तरबेज असतात. प्रत्येकाजवळ फरशी किंवा कोयती आणि तिरकमठा हा असावयाचाच. पोरेंसोरेंसुद्धां टोळक्याटोळक्यानें जंगलांत स्वैर भटकत असतात.

अशा तऱ्हेनें त्यांच्या भावी जंगली जीवनक्रमास अवश्य असलेलें बाळकडूच त्यांना त्याच्या बालवयांत पाजलें जातें.

अशा या सुरम्य स्थळीं आम्ही आज शिकारीच्या इराद्यानें आलों होतों.

खेळाची पूर्वतयारी पूर्ण होतांच मी व माझे वडगांवचे स्नेही गुलाबराव कदम बांडे, असे दोघे दोन बाऱ्यांवर जाऊन उभे राहिलों. गुलाबरावांची बंदूक पुराण्या तऱ्हेची 'मझल लोडर' ( दारू ठासून भरण्याची ) असल्यामुळें त्यांना एका सुरक्षित अशा डगरीवर ठेविलें, आणि मी माझ्या एका सवंगड्याबरोबर एका दाट कारवणाच्या झुपक्याच्या आडोशाला जाऊन उभा राहिलों.

हाके लोकांनीं त्यांचीं 'तल्लास' लावणारीं कुत्रीं प्रथम सोडिलीं. थोड्याच

वेळांत त्यांच्या भुका ऐकूं येऊं लागल्या. ( सावजाचा वास लागल्याशिवाय हीं कुत्रीं कधींहि भूक टाकीत नाहींत. ) आणि हाके तिन्ही बाजूंनीं फरा धरून रान उठवीत चालले.

तास दीड तास होत आला. सारें जंगल हाक्यांच्या आरोळ्यांनीं हलून गेलें होतें. माझें मनहि कांहीं तरी दृष्टीस पडेल या आशेनें अधीर होऊन गेलें होतें; व मी जागचे जागींच चुळबूळ करीत आणि बंदुकीच्या नळीवरून वरचेवर हात फिरवीत अस्वस्थ चित्तानें कसा तरी वेळ काढीत होतो.

आणखी थोडा वेळ गेला. जनावर हलल्याचा बोभाटा झाला. मी अगदीं श्वास रोधून आणि नजर बारीवर रोखून तयार होऊन राहिलों.

पण कोठेंच कांहीं नाहीं !

माझ्या संवगड्यानें मला, 'तें बघा जनावर ( चिबट्या वाघ ) मुरत मुरत आपल्या समोरून वरलाकडे आडवें निघालें आहे' म्हणून म्हटलें. याच वेळीं माझें लक्ष माझ्या डाव्या बाजूकडून दुडकत येणाऱ्या एका मस्त रानडुकराकडे लागलें होतें.

माझें चित्त बावरून गेलें !

उजव्या बाजूनें वाघ व डाव्या बाजूनें रानडुकर ! वाऱ्यावरल्या वावडी-सारखी माझ्या मनाची अवस्था झाली. या वेळीं काय करावें तेंच मला कळेना. जनावरेंहि जरा लांबच— बंदुकीच्या टप्प्याबाहेर— होतीं. क्षणमात्र मी तसाच तटस्थ बसून राहिलों.

तीं दोन्ही जनावरें आतां अगदीं मध्यावर आलीं. परस्परांची नजरानजर झाली मात्र ! वाघानें त्या मस्त डुकरावर एकदम झेप घेतली आणि त्या मस्तवाल व भयंकर पुष्ट असलेल्या प्राण्यानेंहि सहज लीलेनें, एकच ठोसा लावून त्या वाघाला चार हातांवर होलपडून पाडिलें.

अद्‌भुत रम्य ! फारच अद्‌भुत रम्य !!

माझ्या डोळ्यांची पापणीहि लवेना. साऱ्या जन्मांत— कल्पनेसहि अतर्क्य, पण या घटकेस मी प्रत्यक्ष पाहत असलेलें—असलें दृश्य मीं कधीं पाहिलें नव्हतें. त्यांचा तो प्रेक्षणीय सामना पाहण्याच्या अनिवार इच्छेनें मीं ट्रिगरवरचें बोट काढून घेतलें.

त्या वाघाचे डोळे म्हणजे जणूं काय, रागाच्या दोन ज्योतीच दोहींकडे जळताहेतसें मला भासलें. त्यानें जराशी उसंत खाऊन पुन्हा त्या डुकरावर चाल केली. आणि त्या बेहोष बनलेल्या वराहानेंहि, जमिनीवर एकवार आपला उजवा सुळा घासल्यासारखा करून त्या वाघाचे उरोभागीं एक भयंकर जबरदस्त धडक दिली !

धडकीसरसा तो वाघ केंकाटला– डरकाळी न म्हणतां केंकटला म्हणणेंच वस्तुस्थितीस धरून होईल– आणि पांचचार हात मागें सरला. रागामुळें त्याच्या लांब शेपटीची चालू असलेली वळवळ पाहण्यासारखी होती. पुन्हा त्वेषानें तो उंच किरण घेऊन उठला, आणि एक सफाईदार टिपण घेऊन त्यानें आपल्या प्रतिस्पर्ध्यावर पुन्हा झडप घातली. त्या रगेल रानडुकरानेंहि प्रथम जमिनीवर दोनतीन खळ्या लावून, तितक्याच सफाईनें आणि चपळाईनें, उलट त्या वाघाच्या पोटांत आपल्या चिवट आणि निबर नाकाडानें जोरकस प्रहार केला. ते दोघेहि वीर आतां एकेक पवित्रा मागें सरले. त्या वाघाच्या पंजाच्या फटकाऱ्यानें त्या मस्त डुकराच्या शरीरावरला एक बालहि वाकडा झाला नाहीं ! उलट तो वाघच जरा मेचल्यासारखा झाला. तो रानडुकर आपल्या तोकड्या सोंडेनें सारखा माती उधळीत जणूं काय त्या वाघाला पुन्हा लढण्यासाठीं आव्हानच देत होता, आणि त्या आव्हानाचा स्वीकार करावा का न करावा याचा जणूं विचार करीत वाघोबांची स्वारी गुरगुर करीत शेपूट आसडीत जागचे जागीं उभी होती.

निर्वाणीचा क्षण तो होता.

आतां एक सेकंद घालविणें म्हणजे चालून आलेली सुवर्णसंधि व्यर्थ दवडल्याप्रमाणें होणार होतें.

मी काटवणाआडून छपत छपत थोडा पुढें सरलों आणि ती दुक्कल माझ्या बंदुकीच्या माऱ्यांत येतांच, प्रथम एक गोळी वाघावर आणि दुसरी लगोलग त्या डुकरावर झाडली. वाघ एका गोळींतच लांब झाला, पण डुकरास ती गोळी पोटांत पोकळमारीं लागल्यामुळें तें नुसतेंच जखमी झालें. तत्काल मीं पुन्हा बंदूक भरली. तें पिसाट जखमी डुक्कर आतां अगदीं बेभान होऊन गेलें होतें. झांजींतच तें समोर मरून पडलेल्या त्या वाघाच्या धडालाच धडका देऊं

लागलें. मी संथपणें त्याच्या बरगडीवर शिस्त धरून बंदूक झाडली; त्यासरसा तें पंधरावीस कदमांवर जाऊन मागल्या दोन पायांवर उभें झालें, आणि वेगानें चक्कर खाऊन धाडकन जमिनीवर कोसळलें!

हाके लोकांनीं, त्यांच्या मेहनतान्याशिवाय मोहव्याकरितां (दारूकरितां) बक्षिसादाखल मागितलेले पांच रुपये मीं मोठ्या आनंदानें त्यांच्या हातावर ठेविले आणि आम्ही आमच्या कॅम्पावर परतलों.

वाङ्मयशोभा,
जुलई १९४२

## विंध्याचलाच्या पायथ्याशीं : : १५

अस्तमानाचा सुमार झाला होता म्हणून गाडीवानास लवकर चलण्याबद्दल मीं इशारा दिला. माझें मुक्कामाचें ठिकाण अद्याप चार-पांच मैल दूर होतें. गाडीवानानें दोन्ही बैलांस पराणी दिली. लांबवर मजल मारून आलेल्या त्या मुक्या कष्टाळू प्राण्यांस आपल्या धन्याचें हें निष्ठुर कृत्य सहन न झाल्यामुळेंच कीं काय, तीं दोन्ही जनावरें जिवाची तमा न बाळगतां धुरळयाचे लोटच्या लोट हवेंत उधळीत चौखूर निघालीं.

मैल-दीड मैल तीं जनावरें सारखीं उधळत चाललीं होतीं. पण पुढें रस्त्याला एकार लागल्यामुळें साहजिकच त्यांचा वेग कमी पडला, आणि आमच्यापुढेंच चाललेल्या दोन 'शिकारी' गाड्या पाहून मींहि गाडीवानास गाडी अगदीं आस्ते घेण्याबद्दल सूचना दिली.

कुणी कुणाची एका शब्दानेंहि चौकशी न करतां, बराच वेळ आम्हीं रस्ता काटीत होतों. इतक्यांत त्या पुढल्या शिकारीसाहेबांच्या बरोबरच्या एका माणसानें मला, 'कोणीकडे जायचें' म्हणून प्रश्न केला. 'येथें जवळच' म्हणून मीं म्हटलें. ;'शिकारीकरितां आपण इकडे आलां काय?' म्हणून त्यानें मला पुन्हा विचारणा केली. मीं 'होय' म्हटलें, आणि पुन्हा आम्ही पहिल्याप्रमाणें उपराळेपणानेंच वाट चालूं लागलों.

आतां मी माझ्या मुक्कामाच्या जागेच्या जवळ जवळ आलों होतों. इतक्यांत 'साहेब तुम्हांस जरा आपल्या गाडींत बोलविताहेत,' म्हणून त्या माणसानें माझ्या गाडीजवळ येऊन सांगितलें. तत्काळ मी गाडीखालीं उतरलों आणि त्यांच्या गाडींत चढून गेलों. त्यांनीं सस्मित माझें स्वागत केलें आणि कोठून व कशाकरितां इकडे आलां म्हणून चौकशी केली. माझी हकीकत ऐकून यांना फार आनंद झाल्याचें दिसलें.

तेहि शिकारीकरितांच आलेले होते हें न सांगतांच समजण्यासारखें होतें. डॉक्टर या नात्यानें, कामटी येथें 'फील्ड आर्टिलरी'मध्यें त्यांची तात्पुरती

बदली झाली होती. ते जातीनें बंगाली कायस्थ असून त्यांचें नांव प्रफुल्लचंद्र सेन असें होतें, आणि त्यांना शिकारीचा बराच शौक आणि अनुभवहि असावा असें त्यांच्याशीं झालेल्या संभाषणांत मला दिसून आलें.

'पृथक् पृथक्पणें न खेळतां सहकारितेनें आपण खेळूं' अशी त्यांनीं इच्छा प्रदर्शित केली, आणि ती गोष्ट आम्हां उभयतांसहि इष्टच असल्यामुळें मीं त्यांची सूचना ताबडतोब मान्य केली.

त्यांचा कॅम्प पडणार होता तेथून माझ्या मुक्कामाची जागा जरा दूर होती एवढीच गैरसोय यांत होती. दुसरें दिवशीं सकाळींच मी आपला मुक्काम हलवून त्यांच्या कॅम्पाशेजारीं तळ दिला. यामुळें तीहि गैरसोय दूर झाली, आणि मोठ्या हुरूपानें आम्ही पुढील तजवीजीस लागलों.

वाघ आणि अस्वलें, दोन्हीहि श्वापदें जंगलांत विपुल होतीं. अस्वलांच्या शिकारीची माझी हौस पूर्वीं भागलेली असल्यामुळें, आणि त्या शिकारींत मला बिलकुल स्वारस्य वाटत नसल्यामुळें, मी कॅप्टनसाहेबांस वाघाच्या शिकारीचा कार्यक्रम प्रथम अंमलांत आणावा असें सुचविलें आणि त्यांनींहि माझें म्हणणें मान्य केलें.

आज मोठ्या पहाटेस आम्ही उठलों. थोडीशी न्याहारी आणि चहा घेऊन आम्हीं हाके लोकांसह जंगलाची वाट धरली. सह्याद्रीवरच्या जंगलाची मजा मला येथें वाटली नाहीं. पर्णहीन वृक्षराजीमुळें जंगल कळाहीन भासत होतें. डोंगरहि बोडके-रुक्ष, आणि मैदानेंहि खरखीत आणि वैराण अशीं दिसत होतीं. बारा महिने आणि अठरा काळ रम्य वनश्रीनें नटलेला, आणि मस्तकावर हिरवाचार मंदिल बांधून महाराष्ट्रीयांच्या स्वागतार्थ सदा सिद्ध असलेला तो नगराज--सह्याद्रि कोणीकडे, आणि बरसातीचे साडेतीन महिने सरतांच, शिराळ शेटजींच्या औट घटकेच्या राज्यकारभाराप्रमाणें किंवा कॉंग्रेस-च्या साडेतीन दिवसांच्या स्वराज्याप्रमाणें—हिरव्याचा पिवळा होऊन जाणारा विंध्याद्रि कोणीकडे !

कहां राजा भोज आणि कहां गंगा तेली !!

* * *

वेडींवाकडीं वळणें घेत घेत आणि लहानमोठया दऱ्याकपाऱ्या तुडवीत आम्ही मार्ग आक्रमीत होतों. दोन्ही बाजूंनीं उंच उंच डोंगर असलेल्या एका भयाण भासणाऱ्या खोपाडांत आम्हांला एक पडकी गढी दृष्टीस पडली. तें जुन्या अमदानींतल्या एका पेंढारी पुढाऱ्याचें राहण्याचें ठिकाण होतें असें कळलें. वाटेनें आमच्या वर्दळीनें एक लांडगा अकस्मात् उठला. प्रफुल्लचंद्रांनीं वाट चालतां चालतांच त्या धावत्या लांडग्यावर आवाज टाकला. त्या क्षुद्र प्राण्याच्या अक्षरशः चिंध्या झाल्या!

त्यांचें अचूक निशाणबाजीचें तें कौशल्य पाहून, मला त्यांच्या व्यासंगाचा अनायासेंच प्रत्यय आला आणि जनावर उठल्यास, शिकार हमखास होणार असा मला आत्मविश्वास वाटूं लागला.

आणखी मैल दीड मैल चालून आल्यावर आम्हांस एक प्रशस्त पठार लागला. हीच आमच्या खेळाची नियोजित जागा होती. त्या पठाराच्या भोंवतीं तीनहि बाजूंनीं किर्र जंगल होतें आणि मधूनच एक खोल ओहोळ गेलेला होता. त्या ओहोळाच्या दोन्ही अंगांस मोठमोठ्या डगरी होत्या, आणि बोरूचीं बेटें आणि झुडपें यांची अडचण धरून, उठविलेलीं जनावरें बहुशा याच बारीनें बाहेर पडत. याच ओघळीच्या कडेला निरनिराळ्या दोन बाऱ्यांवर आम्ही दोघे एकेक मदतनीस घेऊन बसलों, आणि रानकाढे आपल्या कामगिरीवर निघून गेले.

अर्धा घंटाहि पुरा लोटला नसेल, तोंच माझ्या कानांवर खाड खाड दोन आवाज आले, म्हणून मीं जिज्ञासेनें प्रफुल्लचंद्रांच्या बारीकडे नजर लाविली. एवढ्यांत हाके लोकांचा भयंकर हलकल्लोळ माझ्या कानांवर आला, आणि काय भानगड आहे ती कळावी म्हणून मी तिकडे जाण्याकरितां पाऊल उचललें. तोंच, 'अरे बापरे'! म्हणून माझा मदतनीस ओरडला आणि मी पाहतों तों, एक प्रचंड वाघाचा अक्राळविक्राळ जबडा, थेट आम्हीं असलेल्या दरडीचे वरचे बाजूनें झुडपांतून बाहेर डोकावलेला मला दिसला. भीतीनें माझी गठडीच वळायची वेळ आली. परंतु कसा तरी नेम धरून मीं एक आवाज त्यावर टाकला. जनावर सरळ उभ्या रेषेंत, आणि भीत भीत, कांपऱ्या हातानें मीं टाकलेला आवाज! मीं टाकलेला आवाज खाली गेला, पण

त्यामुळें, त्या भयंकर श्वापदानें बाहेर पडून मोहरा फिरविला आणि तो मला आयताच्च आडवा आला. तत्क्षणीं मी जमिनीवर पालथा पसरलों आणि त्याच्या बरगडीवर पुन्हा शिस्त धरून आवाज टाकला. कानठाळ्या बसविणाऱ्या त्याच्या भीषण गर्जनेनें सारें जंगल घुमून गेलें, आणि एकादा वृक्ष उन्मळून उलथून पडावा त्याप्रमाणें— तो उलथून पडला !

कॅ. प्रफुल्लचंद्र दबकत दबकत, सावकाश माझ्या बारीकडे येत होते. त्यांनीं काढिलेल्या दोन आवाजांनीं दोन अस्वलांचे बळी घेतले होते, आणि इकडे काय प्रकार झाला तो पाहण्याकरितां ते माझ्या बारीकडे निघाले होते. हाके लोकांचा कल्ला त्यांनींहि ऐकला होता, पण जनावर उठल्यावर नेहमींच होणारा तो प्रकार आहे, अशी त्यांनीं मनाशीं समजूत करून घेतली होती.

कॅप्टनसाहेब माझ्या बंदुकीचा बळी पाहून बेहद्द खूष होऊन गेले.

खिशांतून मेझर टेप काढून जनावर मापावयास मी किंचित् खालीं वाकलों तोंच, त्यांच्या तोंडून एक आश्चर्योद्गार बाहेर पडला ! "या श्वापदाचे पंजे आणि तोंड ताज्या रक्तानें माखलेलें कसें ?"

* * *

आपल्या पीळदार दंडावर तांब्याच्या पेट्या करकचून बांधलेले दोघे भिल्ल गडी आमचा तपास करीत आमच्यापाशीं येऊन उभे राहिले. ते घामाघूम झालेले दिसत होते. समोर मरून पडलेल्या त्या धूडाकडे पाहून त्यांनीं एक चमत्कारिक शिवी हासडली, आणि 'आमचा एक गडी यानेंच घायाळ केला' म्हणून आम्हांस सांगितलें.

थोड्याच वेळापूर्वीं झालेल्या ओरडयाचा अर्थ प्रफुल्लबाबूंना आणि मला बरोबरच कळला.

धावतच आम्ही त्यांच्याबरोबर गेलों. अखेरचे आचके देत असलेल्या त्या दुर्दैवी प्राण्यास गराडा घालून ते लोक बसले होते. कांहीं करण्यासारखें त्याच्या बाबतींत आतां राहिलें नव्हतें. हाके लोकांस या श्वापदाचा माग लागल्यामुळें, त्यांनीं जाळींतून त्याला हुसकावण्याकरितां दगडाधोंडयांचा नुसता वर्षाव केला. जनावर खवळून बाहेर पडलें आणि त्याच्या सपाट्यांत आलेल्या या गरीब जीवाची त्यानें चांदी आटविली.

आम्हीं चार समाधानाच्या गोष्टी सांगून त्यांचें समाधान केलें, आणि त्याच्याकरितां आम्हांस जेवढें करतां येईल तेवढें करूं, असें आश्वासन देऊन आम्हीं कॅम्पावर परतलों.

एका मानवी जीवाच्या मृत्यूस आपण अप्रत्यक्षपणें कारण झालों, या विचारानें माझें मन उदास होऊन गेलें होतें.

* * * *

उकाडा मनस्वी होत होता म्हणून आम्हीं बाहेर खुर्च्या टाकून बसलों होतो. गप्पांत आज कुणाचेंच मन रमेना.

जवळच्याच एका झाडावर सारसपक्षी शब्द करीत होते, आणि त्यांचे ते कर्णकटु बोल आमच्या मनाची उद्विग्नता वाढवीतच होते. एकाएकींच आकाशांत काळेकुट्ट मेघ गर्दी करूं लागले, आणि थोड्याच वेळांत मुसळधार पाऊस ओतूं लागला.

जिकडे तिकडे पाणीच पाणी होऊन गेलें.

आमचा पुढचा कार्यक्रम रद्द झाला.

त्या मयत इसमाच्या कुटुंबीयांना आम्हीं आमच्या शक्तीप्रमाणें मदत पोंहोचविली, आणि जड अंतःकरणानें आम्ही आपापल्या ठिकाणीं जाण्यास परतलों.

'चित्रा' दिपवाळी अंक,
नोव्हेंबर १९४२

---

# लोहगडच्या जंगलांतील

# वाघाची शिकार : : १६

लहानपणीं मीं कार्ल्यांचीं लेणीं आणि लोहगड व विसापूर हे किल्ले पाहिले होते. नुकतीच माझी कांहीं स्नेहीमंडळी लेणीं व सदरचे किल्ले पाहण्यास निघाली त्यांच्याबरोबर मीहि पुन्हा गेलों. मळवली स्टेशनवर उतरून परस्पर कार्ल्यांचीं लेणीं पाहून आम्हीं भाज्यास येऊन मुक्काम केला. दुसरे दिवशीं सकाळींच उठून गड चढूं लागलों. अर्धा अधिक गड चढून आलों, तों वाटेजवळच उजव्या हातास, एक अर्धवट खाल्लेला बैल पडलेला दृष्टीस पडला; परवांचे दिवशीं, दिवसा उजेडींच तो वाघानें मारल्याचें आमच्या बरोबरच्या वाटाड्यानें सांगितलें.

लोहगड किल्ला पाहून आम्ही विसापूर चढून गेलों. लोहगडापेक्षां विसापूर पुष्कळच मोठा आहे; पण बंदोबस्ताच्या आणि सुरक्षिततेच्या दृष्टीनें लोहगडास जें महत्त्व पेशवाईचे काळांत होतें तें विसापूरला नव्हतें. लोहगडा सारखें निबिड जंगल विसापूर किल्ल्याच्या आसपास नाहीं. लोहगड अवघड असून भोंवतीं आणि किल्ल्याचे दक्षिणेस व पश्चिमेस घनदाट जंगल आहे. आणि तेथें वाघांचा सुळसुळाटहि बराच आहे.

किल्ले पाहून सायंकाळचे गाडीनें आम्ही सर्व पुण्यास परतलों.

लोहगडाच्या जंगलांत वाघाच्या शिकारीची बरीचशी खात्री वाटूं लागली आणि जमल्यास तो योग जुळवून आणावा असें माझ्या मनानें घेतलें.

*　　　*　　　*

खडकवासल्यापाशीं आगळंबें म्हणून एक गांव आहे, व तेथील पायगुडे देशमुख मंडळीची माझी बरीच जानपछान आहे. त्यांच्यांपैकीं जयवंतराव नांवाच्या गृहस्थांस बंदुकीचा परवाना आहे, आणि मावळच्या त्या भागांत त्यांची आप्त आणि ऋणानुबंधी मंडळीहि बरीच पसरलेली आहेत. जयवंतराव अधूनमधून डुकराचे शिकारीकरितां त्या बाजूला जात असल्यामुळें त्यांस

निशाणबाजीचा सरावहि चांगला होता आणि एकवार बिबट्या वाघाची शिकारहि त्यांचे हातून झाली होती.

आगळंब्यास जाऊन जयवंतरावांचा विचार घेतला. लोहगडाचे जंगलांत खुली शिकार होण्यासारखी नसून माचवे बांधून सावज लक्ष्यावर आणूनच आपलें उद्दिष्ट साधलें पाहिजे, असें त्यांचें म्हणणें पडलें आणि तेंच बरोबर होतें. डोंगरावर जंगल निबिड असून दऱ्याखोऱ्यांची अडचण असल्यामुळें आणि जनावर हुदडून बारीवर काढण्यास पठार असा कोठेंच नसल्यामुळें, खुल्या शिकारीस तें ठिकाण योग्य नव्हतें. म्हणून आम्हीं पहिलाच विचार कायम केला.

खडकाळ्याजवळच्या ठाकरवाडींत दोघे कातकरी या कामांत मोठे अनुभविक आहेत असें कळल्यावरून तेथल्या कंक मंडळीकडून त्यांस बोलावून घेतलें. त्यांनीं मोठ्या हौसेनें आम्हांस मदत करण्याचें कबूल केलें, आणि त्यांच्या माहितीचे आणखी पांच-चार भिल्ल व ठाकर मंडळी त्यांनीं मदतीस घेतली. त्यांनीं आम्हांस एकवार सर्व रान हिंडवून आणिलें आणि आम्ही पुढील तजविजीस लागलों. चांदण्यांत स्पष्टपणें सावज नजरेंत येईल अशा जागीं, चांगलें उंच आणि गर्द झाड पाहून आम्हीं एकच माचवा बांधण्याचें ठरविलें. लाईट वगैरे आधुनिक साधनें या वेळीं आम्हांस उपलब्ध नव्हतीं, आणि टॉर्च क्लॅम्पहि माझ्या बंदुकीस नव्हता. म्हणून आम्हीं पुराण्या गावठी पद्धतीनेंच आमचा कार्यभाग साधण्याचा उपक्रम केला. नाहीं म्हणावयास आवाज टाकण्यापुरता टॉर्चचा उपयोग करण्याचें ठरविलें. झाडाचे अगदीं सन्निध 'लक्ष्य' खुटविण्यांत अधिक धोका होता, म्हणून शिरस्त्यापेक्षां माचवा थोड्या उंचावर बांधला आणि हेल्यापेक्षां मेंढरूंच 'लक्ष्यावर' बांधणें मला जास्त भरंवशाचें वाटलें. मेंढराच्या बेंबटण्यानें सावजास आपले 'लक्ष्या'चा वास तेव्हांच लागेल अशी माझी कल्पना होती आणि अनुभवानें तीच खरी ठरली.

संध्याकाळ झाली होती आणि पूर्वेकडून अंधकाराची छटा जंगलावर पसरूं लागली होती. जरा पाऊल उचलूनच आम्ही आमच्या नियोजित ठिकाणाकडे जात होतों तों, 'अज्ज्यो!' करून आमच्याबरोबरच्या भिल्लांपैकीं एकजण मोठ्यानें ओरडला. जयवंतरावांनीं मला हाताला धरून उभें केलें, तोंच एक अजस्र अजगर आमचे समोरून संथपणें जंगलांत निघून गेलें.

चंद्रोदय होण्यास थोडासा अवधि होता, तरी माचव्यांत जाऊन बसणें आम्हांस प्राप्त होतें. आम्ही आमच्या जागीं जाऊन बसलों आणि आमचे इतर सहकारीहि ठिकठिकाणीं सावधपणानें झाडांवर चढून बसले. या जंगलांतील जनावरें धष्ट असल्यामुळें, तीं फार रात्र न करतां आवशींची सुद्धां आपले 'लक्ष्या'वर येऊन पडण्याचा संभव होता.

सव्वाबाराला पांचच मिनिटें कमी होतीं. ज्याच्या जीवनाची मध्यरात्र झाली होती, असें तें मेंढरूं बेंऽबें करून त्या कालपुरुषाला जणूं पुकारीत होतें. पश्चिमेच्या बाजूनें धीमेपणानें पावलें टाकीत आणि चाहूल घेत, अंगावर मोठमोठे पट्टे असलेला तो वनराज पुढें पुढें सरकत होता. त्यानें पाठीची कमान केली होती आणि त्याचें लांबसडक शेपूट हवेंत वळवळत होतें. निराधार अशा त्या अजापुत्रापासून जरा दूरच तो किंचित् थबकला, आणि एकदम झेप टाकून तो त्याच्या नित्राण शरिरावर दोन्ही पंजे पुढें ठेवून, मोठया पवित्र्यांत गुरगुरत बसला. त्याचें नरडें फोडण्याकरितां त्यानें आपली गर्दन नमविली तोंच, जयवंतरावांनीं टॉर्च उजळला आणि तत्क्षणीं मींहि आपल्या बंदुकीचा घोडा ओढला. जबड्यांतल्या मेंढरासुद्धां तो पुरुषभर उंच उडाला आणि ते दोघेहि बरोबरच जमिनीवर कोसळले!

* * *

चांगलें फटफटावयास लागलें तेव्हां आम्ही गड उतरावयास लागलों. आमच्याबरोबर असलेलें तें प्रचंड धूड पाहून वन्य पक्षी एकच किलबिल करूं लागले. उतरणीवरच्या हिरव्यागार माळावर चरत असलेलीं गुरें, कान टवकारून आणि शेपट्या वर धरून वाफडावयास लागलीं, आणि गुराखी पोरें गुरें टाकून आमच्या मागोमाग धावत सुटलीं.

गांवांतील मंडळींचा निरोप घेऊन, गाडी करून, पायरस्त्यानेंच आम्ही आगळंब्यास आलों. आगळंब्यास एक दिवस जयवंतरावांचा पाहुणचार खाऊन आणि पुन्हा एकवार शिकारीस येण्याचें अभिवचन देऊन मीं जयवंतरावांचा निरोप घेतला, आणि ढोरानें आणून दिलेलें चमडें गाडींत टाकून पुण्याचा रस्ता धरला.

सह्याद्रि,
मार्च १९४३

# चित्त्याची शिकार 

चहाचे घुटके घेत तेथल्या व्हरांड्यांत मी येरझारा घालीत होतों. आंतल्या अंगाला आमच्या लॉजचे मालक, दूधवाल्या कोंकण्याला गरगरीत दम भरून राहिले होते, आणि दूधवाला हणमंत्या मोठ्या अजीजीनें मालकांची मनधरणी करीत होता. हणमंत्यापासून दुधाचा रतीब घेण्यांत, आपण त्याच्या-वर अलोट उपकार करीत आहोंत अशा अकडीनें, चष्म्याच्या आणि त्यांच्या दीड इंच रुंदीच्या विशाल नासिकेच्या मध्यें असलेल्या सापटींतून मालक त्याच्याकडे तिरकस कटाक्ष फेकीत होते. कालच्या रात्रीं हणमंत्याच्या एका म्हशीचें रेडकूं वाघरानें मारल्यामुळें, म्हशीनें कासेंत हात घालूं दिला नाहीं, त्यामुळें आज दूध कमी निघाल्याचें हणमंत्यानें सांगितलें. पण मालकांना त्याचें काय होय! रेडकूच नव्हे, पण हणमंत्यालाहि वाघरानें खाल्ला असता, तरी त्याचें सुतक मालकांना येणार होतें थोडेंच!

माथेरानला चार दिवस मजेनें घालविण्याकरितां मी गेलों होतों. तेथल्या 'दवे लॉज'मध्यें माझा मुक्काम होता. नेहमींच्या शिरस्त्याप्रमाणें माझी सहचरी (बंदूक) मजबरोबर होतीच.

हणमंत्या कुळवा दुधाच्या मोकळ्या चरवींत दूध मापावयाचीं मापटीं टाकून चरवी घेऊन परत फिरला. मी त्याचीच वाट पाहत तेथल्या आवारां-तल्या एका झाडाखालीं उभा होतों. तो जवळ येतांच मीं त्याला हटकलें व आपल्या खोलींत घेऊन गेलों. सिगारेटकेसमधली एक सिगारेट काढून मीं शिलगवली; आणि हणमंत्याच्या अंगावरहि एक फेकली. चिलमीप्रमाणें दोन्ही हातांच्या पविऱ्यांत त्यानें ती सिगारेट धरली; आणि दोन तीन सणसणीत सटक्यांतच त्यानें तिचा तळ लाविला. राहिलेलें थोटूक खालच्या फरशीवर पांचचार वेळां चोळून कुसकरलें, आणि एक प्रदीर्घ सुस्कारा सोडून तो तेथें ऐसपैस आसनमांडी घालून बसला. एखाद्या सुहृदाजवळ आपण बोलतों त्याप्रमाणें तो खुलास मनानें मला आपली हकीगत सांगूं लागला.

* * *

माथेरानच्या विस्तीर्ण पठाराच्या खालीं, पायथ्याशीं, 'मुकादमवाडी' म्हणून केंबळाचीं पांचसहा घरें असलेल्या एका लहानशा वाडींत हणमंत्या राहत असे. त्या वाडीच्या भोंवतीं त्याची स्वतःची थोडीशी शेतीभाती होती आणि तिच्या भरतीला त्यानें आणखी थोडी भातजमीन मक्त्यानें केली होती. वाडीच्या भोंवतालीं चराऊ रान विपुल असल्यामुळें, दोनतीन दुभत्या म्हशी त्यानें पाळल्या होत्या. आणि त्यांचें निघेल तें दूध तो वर दवे लॉजच्या मालकांस आणून घालीत असे. अलीकडे दोन अडीच महिने एक बिबट्या वाघ ( चित्ता ) त्याच्या वस्तीला नित्य उपद्रव देऊं लागला होता. गेल्याच महिन्यांत हणमंत्याची एक गाभणी कालवड त्यानें मारली होती, आणि कालच्या रात्रीं, नुकत्याच व्यालेल्या एका म्हशीचें तान्हें पारडूं त्यानें मारून खाल्लें होतें.

"जनावर लई धट्ट अन् अक्षी सावध. मानसाचं वारं पड्डूं दीना. बोरजाईच्या खोपाडांत अन् इचीभनं नदीच्या कडेच्या दाट शेरण्यांत न्हाइतर मव्हळाच्या उच उच गवतांत गारव्याला पडून असतं. अन् मानसाची वाइच चाहूल लागली कीं झालंच पशार!" तो म्हणाला.

त्यानं सांगितलेली एकंदर हकीगत मीं ऐकून घेतली. 'तुम्हीं त्या वसतीवरले लोक मला मदत करीत असाल तर तुमच्यामागची ही पीडा मी नाहींशी करतों, असें म्हणून मीं त्याला आपली बंदूक दाखविली. तो आनंदानें नुसता नाचूं लागला. "चार-दोन माहीतगार कातवडी गाठा आणि त्यांस त्या जनावराच्या पाळतीवर राहण्यास सांगा. त्यांना रोजमुरा मी देईन." असं म्हणून त्या लोकांस देण्याकरितां एक पांच रुपयांची नोट काढून मीं त्याचे हातावर ठेविली. ताडकन् उठून तो उभा राहिला. डोळे विस्फारून त्यानें माझ्याकडे एकवार पाहिलें; आणि हर्षभरित होत्साता माझ्या पायांवर डोकें ठेवून तो तडक घराची वाट चालूं लागला.

दुसरे दिवशीं सकाळीं नित्याप्रमाणें दूध घालावयाला हणमंत्या आला. आज त्याच्याबरोबर आणखी दोघे-चौघे गडी होते. मला एकवार वाडीवर घेऊन जाण्याकरितां ते जमून आले होते. त्यांच्याशींहि मीं पुन्हा एकंदर वाटाघाट केली. त्या सर्वांनीं आतां त्याच उद्योगास लागण्याचें कबूल केलें, आणि 'रोजा दोन रोजा तुम्हांस त्यासंबंधीं वर्दी देतों' असें म्हणून ते निघून गेले.

तिसरे दिवशीं ते सगळेजण पुन्हा माझ्या खोलीवर आले, आणि त्यांनीं 'तुम्हीं सांगितल्याप्रमाणें माणसें पाळतीवर ठेविलीं आहेत आणि आम्हीहि हुशारीनें आहों' असें सांगितलें. त्या लोकांबरोबर लागोपाठ दोन दिवस मी त्यांच्या वाडीवर जाऊन आलों. त्या कातवड्यांसहि त्यांनीं तेथें बोलावून घेतलें होतें. त्या सर्वांना बरोबर घेऊन मी तेथल्या परिस्थितीची बारकाईनें माहिती करून घेतली आणि भोंवतालच्या जंगलांत आणि बोरजाईच्या खोपाडांतहि चक्कर टाकून आलों. मजकरितां मी त्या लोकांस थोडीशी जागा साफसूफ करून सारवून ठेवण्यास सांगितली, आणि जनावराची कांहीं खबर लागल्यास, मला ताबडतोब येऊन वर्दी द्या म्हणून सांगून मी पठाराची चढण चढूं लागलों.

" जनावर धट्ट आहे " एवढे तीनच शब्द माझ्या कानाशीं सारखे कुणी तरी गुणगुणतें आहे असें मला वाटलें!

* * *

हणमंत्या नेहमींप्रमाणें येऊन रतीब घालून जात असे. मलाहि तो आढळून जाई. पण जनावराच्या हालचालीची कांहींच खबर या दोन-तीन दिवसांत त्याच्याकडून मला मिळूं शकली नाहीं.

* * *

रविवार हा आमच्या लॉजचा फीस्टीचा दिवस असल्यामुळें जेवणास आज थोडासा उशीरच झाला होता. जेवण करून एकदोन विड्या फुंकून मी जरा आडवा होण्याच्या विचारांत होतों. इतक्यांत दोघे-तिघे गडी घाबऱ्या घाबऱ्या माझ्या खोलीवर आले, आणि " हणमंत्यानें आम्हांस वर्दी देण्यास तुम्हांकडे लाविलें आहे. कासराभर दिवस असतांच आज गुराख्या पोरांना जनावर नदीच्या कडेला शेरण्यांत उठलें " असें त्यांनीं सांगितलें.

क्षणभर वामकुक्षी घेऊन मी निघण्याच्या तयारीस लागलों. लॉजच्या मालकांकडून फराळाचा डबा भरून घेतला. बंदूक, काडतुसांचा पट्टा, बिस्तारा व डबा त्या लोकांपाशीं दिला आणि ताबडतोब आम्ही सर्वजण उतरण उतरावयास लागलों.

वाडींत येऊन आम्ही दाखल झालों तों अस्तमानाचा सुमार झाला होता.

माझ्याकरितां त्यांनीं एक सोपा झाडून सारखून ठेविला होता, तेथें मी बिस्तारा लावून दिला आणि त्या लोकांबरोबर गोष्टी करीत बसलों. त्यांनीं मला 'चाई घेतांव का?' म्हणून प्रश्न केला. मला मोठें संकट येऊन पडलें. तरी मीं होकारार्थीं मान हलविली. थोड्याच वेळांत 'चाई' तयार होऊन आला. धुरकट वास लागलेलें तें गोड गढूळ पाणी मी यथेच्छ प्यालों. त्या मंडळींना-हि अंगावर मूठभर मांस चढल्याप्रमाणें वाटलें.

त्या सर्व मंडळींना पहाटेसच जमून येण्याविषयीं सूचना दिली, आणि त्यांचेकडून एक कोंकरूं गांवखुरी एका उमाळ्याचे जागेवर खुटवून ठेवून मी झोपीं गेलों.

माझी सारी भिस्त एकाच गोष्टीवर होती. खुटवून ठेविलेल्या आमिषावर तें चटावलेलें वाघरूं रात्रीं अवशीं हटकून येऊन पडेल असा माझा कयास होता. आणि माझा कयास खरा ठरल्यास माझ्या बंदुकीचा बळी ठरून गेल्यासारखाच होता!

फटफटावयाच्या सुमारास झाडून वाडकर मंडळी गोळा झाली. त्यांच्या-पैकीं एकदोघांस मीं खुटवून ठेविलेल्या लक्ष्याची काय वार्ता आहे तिचा तपास करून येण्यास पाठविलें, आणि तोंपावेतों मुखमार्जन करून मी तयार होऊन राहिलों.

थोड्याच वेळांत मीं तपासास पाठविलेले गडी माघारे आले, आणि त्यांनीं तेथें डांब्यास शिल्लक राहिलेला वाखाच्या दोरीचा हातभर तुकडा माझ्या पुढ्यांत टाकला.

एका क्षणाचाहि विलंब न करितां आम्हीं बोरजाईच्या खोपाडाकडे मोर्चा फिरविला. त्या खोपाडाच्या दोन्ही बाजू हिरहिरीनें चाळविल्या. पांचचार आवाज काढले, परंतु जनावराचा तल्लास लागेना. क्षणभर आम्हीं सर्वजण विश्रांति घेण्यासाठीं एका उंच खडप्यावर टेकलों. एक विडी संपवून मीं दुसरी पेटविली आणि सुन्न मनानें विचार करीत बसलों. दूरवर नदी किनाऱ्याला कांहीं घारवटें आणि गिधाडें आकाशांत घिरट्या घालीत फिरत असलेलीं माझ्या नजरेस पडलीं, आणि माझ्या माणसांस घेऊन मी तत्काल तिकडे निघालों. आम्ही किनाऱ्या किनाऱ्यानें तपास करीत फिरत होतों. दोन प्रहर दिवस आला होता. तीं घारवटें आतां अगदीं आमच्या माथ्यावर उडत

राहिलीं होतीं. 'येथें जवळपास कोठें तरी, रात्रीं त्या वाघरानें मारलेल्या कोंकराचे अवशेष—निदान हाडकें तरी—आढळलींच पाहिजेत', असें मला वाटलें म्हणून मीं सर्वांस बारकाईनें तपास करण्यास सांगितलें.

वाडकर मंडळी निरुत्साही मनानें, केवळ माझ्या समजुतीकरितां म्हणून—हलत होतीं. पण त्यांच्या अंतर्यामीं निराशा भरून राहिल्यासारखी दिसत होती. घटका अर्धी घटका, याप्रमाणें रेंगाळत ते लोक फिरत होते. इतक्यांत त्यांच्यापैकीं एकजण, रात्रीं गांवखुरी बांधलेल्या कोंकराचें चावललेलें मुंडकें आणि दोन तीन पायांचे खूर घेऊन मजपाशीं धांवत आला आणि त्यानें ते मजसमोर टाकले.

" बरोबर, अगदीं बरोबर ! "

" कोंकराचीं कोवळीं हाडें शिल्लक कुठून राहावयाला ! "

माझ्या बंदुकीचा बळी मूर्तिमंत माझ्या पुढ्यांत असल्याप्रमाणें मला वाटलें, आणि तत्क्षणीं मीं त्या लोकांस हुशार राहण्याबद्दल इशारा दिला.

तें मुंडकें व खूर सापडले होते तेथें मी जाऊन उभा राहिलों, आणि मज-बरोबरच्या माणसांस, आंतल्या अंगानें शेरण्यांची कड धरून टेहळीत येण्यास सांगितलें.

दहापांच कदमहि तो माणूस गेला नसेल. वाडकरांना आजवर हैराण केलेल्या त्या वाघराची काळ आणि वेळ दोघेंहि या वेळीं संगनमतानें आलीं होतीं. पिछाडीला नदीचें पात्र, एका बाजूला ढोरें आणि गुराखी पोरें इतस्ततः विखुरलेलीं, आणि दुसऱ्या बाजूला मी आणि माझीं माणसें चातकाप्रमाणें त्याचीच वाट बघत बसलों होतों. वर्दळीमुळें शेरण्यांत आतां त्या वाघराला दम निघेना. उसळीसरसा शेरण्यांतून तो बाहेर पडला. त्यानें इकडून तिकडे एकदां वर्तुळाकार नजर फिरविली, आणि बोलवून आणावें त्याप्रमाणें तो सरळ माझ्यावर चालून आला. दहा-पंधरा कदमांवर आल्यावर तो जरा रोखल्यासारखा झाला. तोंच माझ्या बंदुकींतून सुटलेल्या गोळीनें त्याच्या डोक्याच्या ठिकऱ्या उडविल्या, आणि त्याचें पिवळेंजर्द धड चारी पाय पाखडीत जमिनीवर पसरलें !

वाङ्मयशोभा,
नोव्हेंबर १९४३

---

## शौकीन शिकाऱ्याचा
## शोकपर्यवसायी शेवट ! : : १८

बॅरिस्टर प्रद्योतकुमार रॉय यांच्या खेदकारक मृत्यूची हकिकत दैनिक वृत्त-पत्रांच्या वाचकांच्या अद्यापहि स्मरणांतून गेली नसेल !

प्रद्योतकुमार बॅरिस्टरीची परीक्षा देऊन आले खरे, परंतु वकिलीच्या व्यवसायाकडे त्यांनीं लक्ष पुरविल्याचें कधीं कोणींच पाहिलें नाहीं. त्या व्यवसाया-वांचून त्यांची चूलहि खोळंबलेली नव्हती. त्यांच्या स्वर्गस्थ वडिलांनीं त्यांना सबंध जन्मभर पुरून उरेल एवढी स्थावर आणि जंगम जिनगी ठेवलेली होती. आणि ते त्या इस्टेटीचे एकमेव धनी होते. अर्थातच वकिलीच्या धंद्याकडे दुर्लक्ष झाल्याबद्दल कोणी त्यांना दोष देण्याचेंहि प्रयोजन नव्हतें.

प्रद्योतकुमार विद्यार्थिदशेंत असतांना त्यांनीं हॉकी, फूटबॉल, टेनिस वगैरे खेळांत प्रावीण्य मिळविलेलें होतें. सर्वसाधारण गर्भश्रीमंत मुलांच्या भिकार, दरिद्री चाळयाचोजल्यांचा त्यांना तिटकारा वाटत असे, आणि इंग्रजी शिकलेल्या कित्येक बंगाली सुशिक्षितांप्रमाणें नाजुक झनानी झोकावर न झुकतां, एखाद्या स्वाभिमानी ताठर मराठयाप्रमाणें मर्दानी बाणा त्यांनीं अवलंबिला होता.

* * *

योगिश्रेष्ठ अरविंद घोष यांचे गुरु वैकुंठवासी व्ही. बी. लेले ऊर्फ पंत यांचें वास्तव्य बंगाल्यांत—कलकत्त्यास असतां त्यांचेभोंवतीं नेहमींच तरुण विद्यार्थ्यांचा घोळका असावयाचा. त्यांच्या मठींत हमेषा येणाऱ्या विद्यार्थ्यांपैकींच प्रद्योतकुमार हे एक होते. आणि पंतांचे ठिकाणीं त्यांची एक प्रकारची भक्तियुक्त आदराची भावना वसत होती.

पंतांकडून भेटून जाण्याबद्दल पत्र आल्यावरून आणि मलाहि एकवार कलकत्ता पाहण्याची इच्छा झाल्यावरून मी त्या वेळीं तिकडे गेलों होतों.

प्रद्योतकुमारांच्या वडिलांनीं रायफल, डबल बॅरल्ड् गन् आणि पिस्तूल या तिन्ही हत्यारांचा परवाना काढलेला होता, आणि शहरांत त्यांचा कांहींच उपयोग नसल्यामुळें, हीं हत्यारें त्यांनीं आपल्या जमीनदारीच्या गांवीं ठेविलेलीं होतीं.

प्रद्योतकुमारांना हीं हत्यारें हाताळण्याची थोडीफार चटक विद्यार्थिदशेंतच लागली होती. सुटी झाली कीं, प्रद्योतकुमार खेड्यावर जावयाचेच. खांद्यावर बंदूक टाकून पांखरें आणि पाणबदकें मारीत फिरण्याची त्यांना विलक्षण हौस होती, आणि तिचेंच पर्यवसान पुढें त्यांस शिकारीचा अतोनात छंद लागण्यांत झालें होतें.

* * *

मलाहि लहानपणापासूनच हत्यारांची आणि त्याबरोबरच शिकारीची आवड होती. त्या वेळचें वातावरण असल्या विचारांना पोषक आणि उत्तेजक होतें. सारें भारतवर्ष दीड-दोन शतकांच्या महानिद्रेंतून जागें झाल्यासारखें झालें होतें. तरुण विद्यार्थ्यांचीं मनें क्रांतिकारक विचारांनीं भारून गेलीं होतीं, आणि स्वदेशी-बहिष्काराची प्रचंड लाट अटकेपासून कन्याकुमारीपर्यंतच्या विस्तीर्ण भूप्रदेशावर आवेगानें उसळून राहिली होती.

बंगाल्यांत वंगभंगाच्या चळवळीनें उग्र स्वरूप धारण केलें होतें. नरेंद्रनाथ गोस्वामी या माणिकतोळा बॉम्ब-कटाच्या खटल्यांतील माफीच्या साक्षी-दाराचा खून तुरुंगांतल्या इस्पितळांत, भरदिवसा– कन्हय्यालाल दत्त नांवाच्या कोवळ्या पोरानें, बीमार असतां रुग्णशय्येवरून केला होता, आणि त्या अपराधाकरितां त्याची मान नुकतीच फासावर लटकली होती.

अंतःकरणांतील विशिष्ट भावनांचा आणि आकांक्षांचा चक्काचूर होऊन गेल्यामुळें अलीकडे पंधरा वर्षें इंग्लंडमध्यें जाऊन राहिलेले, आणि नुकतेच मुंबईस येऊन समाधिस्थ झालेले पुरोहित स्वामी (पूर्वाश्रमींचे श्री. शंकर गजानन पुरोहित, बी. ए., एल्एल्. बी., हिंदी तुळशीरामायणाचे मराठी भाषांतरकर्ते) यांचें वास्तव्य त्या वेळीं पुण्यांत होतें, आणि त्यांच्या नेतृत्वा-खालीं अभ्यासाकडे आणि शाळेकडे पूर्ण दुर्लक्ष करून, आम्ही कित्येक अपरि-पक्व, आणि उच्छृंखल मनाचीं पोरें रात्रीं-बेरात्रीं, सिंहगड आणि रायगड

या किल्ल्यांच्या आसमंतात् तंगड्या तोडीत आणि चणे फाकीत खुळ्यासारखे उगाचच भटकत होतों. कुणाचा धाक वाटावा असें, किंवा माझ्या स्वैर वागण्यास लगाम लावील असें वडीलधारें माणूस कोणीच नसल्यामुळें, मी म्हणेन ती पूर्वदिशा अशी माझी स्थिति होती.

माझ्या घरांत जुन्या जमान्यांतल्या कांहीं तरवारी आणि बंदुका होत्या; पण पुढें, बिगरपरवाना हत्यारें बाळगल्याबद्दल माझ्या घराची झडती घेण्यांत येऊन तीं हत्यारें जप्त झालीं, आणि मजवर पुण्याच्या सिटी मॅजिस्ट्रेट कोर्टांत खटला भरण्यांत आला. मी या वेळीं अज्ञान असल्यामुळें, सिटी मॅजिस्ट्रेट मि: कारव्हालो यांनीं मला १०० रु. दंडावर आणि ताकिदीवर सोडून दिलें होतें.

अशा तऱ्हेचें साधर्म्य प्रद्योतकुमारांच्या आणि माझ्या स्वभावामध्यें असल्यामुळें, थोडीशी जानपछान होतांच त्यांची माझी दोस्ती जमण्यास फारसा वेळ लागला नाहीं.

* * *

रात्र सरल्यावर पहाट होत होती. उगवला दिवस मावळत होता; महिना-अखेर होत होती आणि वर्षें लोटत होतीं !

प्रद्योतकुमार बॅरिस्टर होऊन आले आणि पंतांनींहि बंगाल्यांतलें आपलें वास्तव्य हलवून महाराष्ट्रांत येऊन आपली पठडी सोडली.

प्रद्योतकुमार पक्के नास्तिक मताचे असतांहि पंतांबद्दलचा त्यांचा आदर-भाव अणुभरहि कमी झाला नाहीं. चार-दोन वर्षांनीं पंतांचे दर्शनास प्रद्योत-कुमार बंगाल्यांतून येत त्या वेळीं पंत मलाहि अगत्यपूर्वक बोलावून घेत, त्यामुळें प्रद्योतकुमारांचा आणि माझा ऋणानुबंध पुढेंहि कायम टिकूं शकला. पत्रद्वारें त्यांच्या माझ्या भेटीगाठी नेहमीं होतच असत, आणि त्यांनीं स्वतः केलेल्या शिकारींची त्रोटक हकिकतही ते मला मधूनमधून कळवीत असत.

* * *

मध्य हिंदुस्थानांत टोंक नांवाचें एक छोटेंसें संस्थान आहे. तेथें कालिपद चौधुरी नांवाचे प्रद्योतकुमारांचे एक जवळचे आप्त एका बड्या अधिकाराच्या जागेवर होते. त्यांच्या फार आग्रहावरून, आणि विशेषतः शिकारीकरितांच,

प्रद्योतकुमार आपल्या पत्नी मृणालिनीदेवी यांच्यासह त्यांच्याकडे पाहुणे म्हणून आलेले होते.

संस्थानच्या अगदीं मध्यावर, छप्रा आणि सिरोंज या दोन जिल्ह्यांच्या सीमाप्रांतावर निबिड जंगल असून, वाघ व अस्वलें यांचें जणूं तें जंगल म्हणजे माहेरघर आहे. 'आधींच उल्हास अन् त्यांत फाल्गुनमास' अशी प्रद्योत-कुमारांची स्थिति असल्यामुळें, त्यांनीं कालिपदबाबूंच्या मार्फत, नबाबसाहेबां-कडून त्या राखीव जंगलांत शिकारीची मुभा मिळविली आणि तत्काळ निघून येण्याबद्दल मला पत्र लिहिलें. मला त्या वेळीं फुरसद नसल्यामुळें, 'माझें येण्याचें जमणार नाहीं' म्हणून मीं त्यांस जबाब पाठविला; पण पुन्हा त्यांची निकडीची तार आल्यावरून मला जाणें भाग पडलें.

मी तेथें गेल्यावर पाहतों तों प्रद्योतकुमारांनीं वाघाच्या शिकारीची सर्व पूर्वतयारी सज्जड करून ठेविली होती.

दोन दिवस आम्हीं स्वस्थपणें गप्पागोष्टी करीत आणि कालिपदबाबूंचा पाहुणचार खात आरामांत घालविले, आणि तिसऱ्या दिवशीं जंगलचा रस्ता धरला. जंगलाजवळच्या एका लहानशा खेडयाबाहेर पाण्याची सोय बघून आम्हीं कॅम्प ठोकला, आणि दुसऱ्या दिवशीं सकाळींच आम्हीं जंगलाची माहिती करून घेण्याकरितां तिकडे मोर्चा फिरविला.

रान उठविण्याकरितां आम्हीं तेथले 'मोघिआ' जातीचे वाकबगार लोक ठरविले होते. ते कमालीचे रांगडे आणि रानवट होते. पण त्यांना चुचकारून आपला कार्यभाग साधून घेण्याशिवाय आम्हांला गत्यंतर नव्हतें. प्रद्योत-कुमारांच्या उतावळया आणि दिलदार स्वभावाचा या अडाणी म्हणविणाऱ्या मोघिआंनीं भलताच फायदा घेतला, आणि नेहमींच्या शिरस्त्यापेक्षां जवळजवळ दुप्पट रोजमुरा आणि शिवाय बक्षिसी त्यांचेपासून ठरवून घेतली.

आम्हीं जंगलांत पदार्पण केलें तेव्हां दिवसानें आपले डोळे साफ उघडले होते. एक क्षणहि न दवडितां आम्ही आमच्या उद्योगास लागलों. अस्वलें उठलीं तरी मारावयाचीं नाहींत असें आमचें मुळांतच ठरलें होतें. आमच्या माणसांस आम्हीं तशी समज देऊन आणि त्यांच्या सल्ल्यानें बाऱ्या मुक्रर करून त्यांस त्यांच्या कामगिरीवर रवाना करून दिलें. निसर्गनिर्मित मोक्या-

चीं आणि सुरक्षित बारीं जंगलांत आढळल्यामुळें माचवे बांधण्याची आवश्यकता आम्हांस भासली नाहीं.

माझी योजना एका प्रशस्त जुनाट वृक्षाच्या बैठकदार खोडावर झाली होती, आणि प्रद्योतकुमारांनीं स्वतःकरितां बुरुजाप्रमाणें सुरक्षित अशी एक बोडकी सुळक्याची डगर पसंत केली होती. 'अॅम्बुश' तयार करून त्याच्या आडोशाला प्रद्योतकुमार बरोबरच्या दोन मदतनिसांसह जाऊन बसले, आणि मीहि माझ्या सहकाऱ्यांसह त्या पर्णरहित जाडयाजुडया निंब वृक्षावर चढून गेलों.

*　　　*　　　*

हाक्यांच्या आरोळ्या अंतराळ भेदून जात होत्या. रविबिंब आपल्या बाराहि पाकळ्या उघडून दशदिशा दिपवीत आकाशांत वरवर सरत होतें, आणि अवनीहि आतां उष्ण श्वासोच्छ्वास टाकावयास लागली होती. पायावर चढलेले डोंगळे झाडण्याकरितां सहज मीं माझा पाय झाडला. कांहीं तरी खजबजल्यासारखा मला भास झाला म्हणून मी भोंवतालीं पाहूं लागलों तों, चार-पांच अस्वलें आमची चाहूल लागल्यामुळें बुरकत बुरकत झुडपांत शिरलेलीं माझ्या नजरेस पडलीं.

एक तास सरासरी मध्यें लोटला असेल. दोघेतिघे मोघिआ आस्ते आस्ते, दबकत दबकत आम्ही बसलों होतों त्या वृक्षाखालीं हलकेच येऊन उभे राहिले, आणि त्यांनीं, 'वाघानें मारलेल्या एका ढोराचे अवशेष एका घळींत आढळल्याचें' आम्हांस सांगितलें. जनावर लवकरच जागा सोडील, कदाचित् दोन जनावरें एकदमच बाहेर पडतील, करितां सावधगिरीची सूचना देण्याकरितां ते आले होते. त्यांस मी प्रद्योतकुमारांच्या बारीवर जाऊन त्यांस तशी सूचना देण्याकरितां तिकडे रवाना करून दिलें, आणि बंदुकीचा ट्रिग्गराहि उघडून मी आपल्या ठिकाणीं 'हुश्शार' होऊन राहिलों. ट्रिग्गर उघडतांना झालेला 'क्लिक्' शब्दहि माझ्या कानांस या वेळीं कर्कश वाटला !

हाके लोकांच्या अंदाजाप्रमाणें जनावरानें लवकरच जागा सोडली. पण तें पुन्हा दाट अडचणींत खुपसून गच्च समेटून राहिलें होतें. कांहीं केल्या तें बाहेर पडेना. होतां होतां तीन प्रहर दिवस आला. हाके आपल्याकडून त्या

बळकशी आलेल्या जनावराला बाहेर हुसकण्याची पराकाष्ठा करीत होते उखळीचे आवाज काढीत आणि जाळ्या-झुडपांतून दगडा-डिखळांचा नुसता वर्षाव करीत ते फरा धरून नेटानें रान सोडवीत चालले होते. पलितेवाल्यांनीं पलित्यांवर जणूं कांहीं तेलाची संततधार धरिली होती, आणि निंबाच्या त्या कडसर तेलाचा उग्र दर्प साऱ्या जंगलांत दरवळून राहिला होता.

फऱ्याची डावी बगल एका लहानशा घळीची दरड चढून जरा वर निघाली तोंच, वेलतुराच्या एका दाट कांटेरी जाळींतून एक डहाण्या वाघ डरकाळ्या टाकीत बाहेर पडला. हाके लोकांनीं आरोळ्यांचा नुसता 'अलबिदा' उठवून दिला आणि मी गुडघ्यावर बंदूक टेकून चौफेर टेहेळीत सावजाची वाट पाहत बसलों.

अत्यंत धीमेपणानें, चाहूल घेतघेत तें जनावर दाट झुडुपांची अडचण धरून वाट काढीत होतें. हाक्यांची गलबल त्याच्या हिशेबांतच नव्हती. मी असलेल्या बारीकडे तें मोहोराच फिरवीना. कोणत्या का अज्ञात कारणामुळें होईना, पण त्या बारीचा त्याने दचका घेतला असावा, अथवा त्या बारीवर त्या जनावरानें पूर्वीं केव्हां तरी आवाज खाल्लेला असावा खास! अखेरीस जनावर, फऱ्यांतील माणसांस घासून सालसुरत निघून गेलें!!

अशा रीतीनें वाघोबांची स्वारी आम्हांस ओझरतें दर्शन देऊन जी अदृश्य झाली ती पुनरपि कुणाच्याहि नजरेस पडली नाहीं. क्षणभरानें हाक्यांच्या आरोळ्या मंदावल्या आणि शेवटीं सर्वत्र सामसूम झालें. हांके लोकांचा ताफा थोड्याच वेळांत माझ्या बारीपाशीं जमा झाला आणि आम्ही सर्वजण प्रद्योत-कुमारांच्या बारीकडे निघालों.

प्रद्योतकुमारांच्या चेहऱ्यावर उतावळ्या जिज्ञासेची छटा स्पष्ट दिसत होती. आम्हांस पाहून, अधीरपणें, 'काय भानगड आहे बुवा?' म्हणून त्यांनीं प्रश्न केला. घडलेली हकीकत हाके लोकांनीं त्यांस कथन केली, आणि 'वखत झाल्यामुळें आम्ही सारे गोळा होऊन आलों' असें ते म्हणाले.

* * *

साऱ्या वाटेनें प्रद्योतकुमार त्या मोघिआंवर निष्कारण चडफडत होते! जनावर, बारीवर घालून न घेतां निघून गेलें, यास कारण हाके लोकांचा

हलगर्जीपणा नव्हता खचित. जितकी कसोशी करावयाची तितकी त्यांनीं केली होती. 'साधली तर शिकार' ही म्हण ते आठवणीनं विसरले होते, अथवा वस्तुस्थितीचा विचार करण्याच्या मनःस्थितींत तरी ते या वेळीं नव्हते.

खालीं माना घालून संथपणानें ते सगळे मोधिए वाट चालत होते, आणि त्यांच्या टोळीचा म्होरक्या, 'आम्हांवर विनाकारण घुस्सा न करण्याबद्दल' 'साहेबांच्या' नाकदुऱ्या काढीत होता. तो कमालीच्या हलक्या स्वरांत बोलत होता. पण, त्याच्या वाणींतून मार्दवापेक्षां जरबेचाच सूर वाहत असल्यासारखा मला वाटत होता !

* * *

आज लवकर उठून आम्हीं प्रातर्विधि उरकले, स्नानें केलीं आणि चहा घेऊन निघण्याच्या तयारीस लागलों. सूर्य नुकताच उदयाचलावर येऊन विलसूं लागला होता. मला हसणाऱ्या प्रद्योतकुमारांनीं आज सूर्याकडे बघून हात जोडलेले पाहून मी तर चकितच झालों; आणि 'रोज पूर्वेकडे उगवणारा सूर्य आज पश्चिमेकडे कसा उगवला बुवा !' असें मी विनोदानें म्हणतांच, प्रद्योतबाबू माझ्याकडे डोळे विस्फारून पाहूं लागले. प्रस्फुरित अशी एक बारीक स्मिताची लहर त्यांच्या चेहऱ्यावरून लहरून गेलेली मला दिसली.

प्रद्योतबाबू जामानिमा करून तयार झाले. मींहि कपडे चढविले, आणि बंदुका खांद्यांवर टाकून आम्ही जंगलाची वाट चालूं लागलों.

वाट चालतां चालतां आम्हीं एकीकडे गप्पागोष्टी करीत होतों. 'रात्रीं मला स्वस्थ झोप आली नाहीं, आणि मध्यान्ह रात्र उलटून गेल्यावर मला एक भयंकर स्वप्न पडलें आणि मी दचकून जागा झालों' असें प्रद्योतबाबू मला म्हणाले. 'काल संतापामुळें तुमचें मन कमालीचें अस्वस्थ होतें त्यामुळें तुम्हांला असें स्वप्न पडलें असावें', असें मीं त्यांस म्हटलें. थोड्याच वेळांत आम्ही व आमचे मोधिआ सहकारी जंगलांत येऊन दाखल झालों. 'आज आपण बाऱ्या बदलूं या. काल तुम्हांला वाघोबांचें ओझरतें दर्शन तरी झालें, पण मला तेंहि समाधान नाहीं.' असें प्रद्योतबाबू मला उद्देशून म्हणाले. त्यांच्या या सूचनेस मीं एकदम संमति दिली आणि आम्ही बाऱ्या बदलून बसलों.

हाके आपल्या कामगिरीवर निघून गेले. मी आपल्या ठिकाणीं स्वस्थ

बसून होतों. पण कशानें काय कीं, माझें मनहि आज थोडें अस्वस्थ झाल्या- सारखें झालें होतें. 'प्रद्योतकुमारांनीं त्यांस रात्रीं पडलेल्या स्वप्नाची हकिकत आपणांस एवढी आवर्जून कां बरें सांगितली ?' आणि 'परमेश्वराचें अस्तित्व- हि न मानणाऱ्या प्रद्योतबाबूंनीं आज सूर्योदय होतो न होतो तोंच, त्या आदित्यास एवढा मनोभावें नमस्कार काय म्हणून केला ?' कधीं नव्हे तो प्रकार घडल्याप्रमाणें मला वाटलें. नेहमींप्रमाणें खेळाकडे आज माझें चित्त लागेना. गोष्टी अगदींच साध्या होत्या. पण त्या साध्या दिसणाऱ्या गोष्टींनींच माझ्या मनांत या घटकेला जोराचें वादळ उठवून दिलें होतें !

हाक्यांच्या आरोळ्या कर्णपथावर येऊन आदळूं लागल्या त्यासरसा मीहि आपल्या विचारतंद्रींतून जागा झालों. विशेषसा विचार न करतां मीं एक सिगरेट शिलगावली आणि तिची अखेरी होतांच, तिच्याच चितेवर दुसरीला फुलविली. दरम्यान हाक्यांच्या आरोळ्यांत थोडा खंड पडल्यासारखा झाला. मागावर गडी घातले असावेत, म्हणून किंचित्काल हाका बंद ठेवल्या असतील असें मला वाटलें, म्हणून मी हुशारीनें राहिलों. क्षणभरानें पुन्हा हाका सुरू झाल्या. मध्येंच एकदां जनावर उठल्याप्रमाणें गलबल उडाली. पण पुन्हा हाके लोक रान सोडवीत पुढें पुढें सरत असल्याची, संथपणें टाकीत असलेल्या हाकांवरून, आम्हांस ठेप लागली.

* * *

अर्ध कलाकहि पुरता लोटला नसेल तोंच, थरकाप उडवून देणारी वाघाची प्रचंड गर्जना माझ्या कानांत सळसळ करीतच शिरली, आणि त्याचे मागो- माग हृदयद्रावक आर्त किंकाळ्या कुठून तरी खोलांतून आल्याप्रमाणें आमच्या कानांवर आल्या.

धावतच आम्हीं डगर उतरून आलों. प्रद्योतकुमारांच्या बारीवर चिटपाखरूं- हि नव्हतें. माझ्या काळजाचें पाणी पाणी होऊन गेलें, आणि सैराटासारखे आम्ही इकडून तिकडे प्रद्योतकुमारांचा तपास करीत फिरूं लागलों. प्रद्योत- कुमारांस आणि त्यांच्या सहकाऱ्यांस इशाऱ्याच्या सूचनेदाखल मीं चार-पांच आवाज काढले. इशारा समजून हाके लोकहि तेथें भराभर गोळा झाले. पण प्रद्योतकुमारांचा आणि त्यांच्या सहकाऱ्यांचा ठावठिकाणा मिळेना !

अक्षरशः फरा धरून, आम्ही सगळेजण प्रद्योतकुमारांस धुंडूं लागलों. एका दाट झुडपांच्या झुपक्याआड प्रद्योतकुमार प्राणांतिक वेदनांनीं विव्हळत जमिनीवर पडले होते. त्यांच्या यूनिफॉर्मच्या अक्षरशः लकतऱ्या लोंबल्या होत्या. हातांतली बंदूक जवळच पडलेली असून तिचा ट्रिगर उघडलेलाच्या उघडलेला होता. त्यांच्या सर्वांगांतून रक्ताच्या धारा लागल्या होत्या आणि शरीरांत नाममात्र धुगधुगी राहिली होती! तो प्रकार पाहतांच, माझ्या अंगांतील रक्त गोठून गेलें— नव्हे– तें आधण आल्याप्रमाणें सळसळूं लागलें आणि माझ्या डोळ्यांपुढें अंधारी आली. त्यांचे दोघेहि मदतनीस–जे इतका वेळ कुठें अस्तंगत झाले होते—तेहि आतां त्या ठिकाणीं येऊन दाखल झाले. त्या दोघांचेहि चेहरे पांढरे फटफटीत पडून गेले होते, आणि त्यांचें सर्वांग अजूनहि थरथर कापत होतें. त्या दोघांपैकीं एकाजवळ बंदूक होती; पण पळतां पळतां ती कोठें गळून पडली हें, बोबडी वळून गेल्यामुळें कीं काय, त्याचें त्यालाच सांगतां येत नव्हतें! दोघांच्या डोकींवरले शेमलेहि जाग्यावर राहिले नव्हते; आणि त्या दोघांच्याहि हातातोंडांवर कांट्याकुट्यांचे ओरखडे ओरखडलेले दिसत होते! प्रद्योतकुमारांच्या जखमा बांधून, त्यांतून होणारा रक्तस्राव थांबवितां आल्यास पाहावा म्हणून आम्हीं जंग जंग पछाडलें. त्या मोघिआंनींहि कसलासा झाडपाला वाटून त्यांच्या जखमांवर बांधला. पण कशाचाच कांहीं उपयोग होईना. आमचे सर्व प्रयत्न व्यर्थ होऊं पाहत होते. धाडस मनुष्यास पुढें आणतें, आणि प्रतिकूल काल आला असतां तेंच अंगलट येऊन सर्वनाश करतें. प्रद्योतकुमारांनीं आपली जागा सोडली यांतच सगळें चुकलें होतें. पण विधिलिखित टळावें कसें? होणारासारखी बुद्धि होते म्हणतात तें खोटें नव्हे. आपल्या सहकाऱ्यांची सल्ला त्यांनीं धुडकावून लाविली, आणि ऐन आणीबाणीच्या प्रसंगीं ते असंरक्षितच नव्हे, पण शत्रूच्या बालेकिल्ल्यांत शिरल्यासारखे, जनावर खुपसून असलेल्या अडचणीच्या जागीं जाऊन उभे राहिले. त्यांतूनहि समोरून श्वापदानें हल्ला केला असतां तर प्रद्योतबाबूंच्या बंदुकीस तें बळी पडलें असतें. पण तसें घडलें नाहीं. अवाचित्, गहाळ असतां–पाठीमागून त्यांजवर हल्ला झाला, आणि गोळी घालण्यास प्रद्योतबाबूंस अवसरच मिळाला नाहीं!

मिनिटामिनिटाला प्रद्योतकुमारांची स्थिति कठीण होत चालली होती. तरी पण त्यांची शुद्ध अद्याप गेली नव्हती. खोल आवाजांत ते कांहीं तरी बोलण्याचा प्रयत्न करीत असावेतसे वाटल्यावरून मीं आपला कान त्यांचे तोंडाशीं नेला. 'मृणालिनी' एवढीं चारच अक्षरें त्यांनीं अस्फुट स्वरांत उच्चारिलीं. क्षीणपणानें त्यांनीं आपल्या डाव्या हाताचा पंजा जमिनीपासून थोडा वर उचलला, आणि झटकन् अर्धवर्तुळाकार फिरवून पुन्हा जमिनीवर टाकून दिला.

मृणालिनीदेवींचें सर्वस्व आज नष्ट झालें होतें!

आणि मीहि माझ्या एका जिवलग मित्रास पारखा झालों होतों!!

वसंत,
डिसेंबर १९४३

## 'गोमेनी'*च्या जंगलांतील

## सिंहाची शिकार : : १९

आज साडेतीन वर्षांनीं त्यांनीं पुनः आपल्या मायभूमीवर पाऊल ठेवलें होतें. सध्यांच्या धामधुमींत समुद्रप्रवास किती धोक्याचा आणि त्रासाचा आहे, हें सांगण्याची आवश्यकताच नाहीं. इतका त्रास सोसून आल्यावर तरी आपली पांच महिन्यांची रजा आपणांस आपल्या प्रियजनांच्या सहवासांत सुखानें उपभोगितां येईल असे ते मनांत मांडे खात होते. पण त्यांच्या राशीस लागलेल्या ग्रहांच्या मनांत त्यांना तेवढेंहि सुख लाभूं द्यावयाचें नव्हतें.

टांगानियाकांत माइन्स डिपार्टमेंटमध्ये ते नोकर होते आणि रायफलचा परवाना त्यांनीं काढलेला होता. येथें येऊन तीन वार होतात न होतात तोंच त्यांना परत कामावर रुजू होण्याचा हुकूम तारेनें आला, आणि अर्थातच त्यांची राहिलेली रजा रद्द झाली. आतां ते परत फिरण्याच्या तजविजीस लागले.

ही मंडळी माझ्या अगदीं निकटच्या आप्तांतील होती. प्रपंचांतील अडचणींशीं झगडतां झगडतां मी अलीकडे अगदीं टेकीस आलों होतों आणि माझी प्रकृतीहि असावी तशी नव्हती.

सदरचे माझे आप्त, 'आमच्याबरोबर तुम्ही आफ्रिकेंत येतां काय ! तेथें तुमची प्रकृति सुधारेल आणि तुमची शिकारीची हौसहि पुरेल' असें मला म्हणाले.

माझी प्रकृति सुधारण्यास आणि माझी मनःस्थिति जागेवर येण्यास मला खरोखरच असा थारेपालट पाहिजे होता. विनोदानें ते म्हणत असतील असें मला वाटल्यामुळें, मीं त्यांस प्रथम कांहीं उत्तर दिलें नाहीं. पण 'तुम्ही खरोखरच येत असाल, तर जागेची— आणि पासपोर्ट वगैरेची— तरतूद करावयास

---

* टांगानियाका ब्रिटिश पूर्व आफ्रिका.

हवी; तेव्हां तुमचा काय तो विचार ताबडतोब कळवा,' असें ते पुन्हा मला मोठ्या गंभीरपणानें आणि अगत्यानें म्हणाले.

आफ्रिका म्हणजे कांहीं मुंबई नव्हे. तेव्हां मला मोठाच विचार पडला. अशी संधि वारंवार येत नसते. सर्व बाजूंनीं साधक-बाधक विचार करून मीं प्रवासाचा बेत कायम केला. माझ्याकारितां माझे सदरचे आप्त सर्व खटपट करीत होतेच. प्रवासखर्चाची आणि शिकारीचें जमून आल्यास त्यास लागणाऱ्या खर्चाची तरतूद मीं सुचेल त्या उपायानें केली.

* * *

सोमवारीं दुपारीं एक वाजतां आमची बोट अलेक्झांड्रा डॉकमधून हलली.

येवढ्याच प्रवासास पूर्वीं तेरा दिवस लागत. परंतु 'दार-इ-सलाम' बंदर लागण्यालाच आज आम्हांला सतरावा दिवस मावळला होता.

थोडासा रेल्वेनें आणि बराचसा मोटारीनें आमचा प्रवास झाला, आणि आम्ही 'मोशी' तहशिलांतील 'म्ब्यूलू' या लहानशा शहरीं येऊन दाखल झालों.

तीन वार– जवळ जवळ महिनाभर– मीं येथें पूर्ण विश्रांति घेतली. एवढ्यांत माझ्या या आप्तांची बदली 'गोमेनी' येथें झाली. येथल्या सुंदर हवापाण्यामुळें माझ्या प्रकृतींतहि इष्ट तो फरक पडूं लागला आणि अंगांत नवा उत्साह भरल्यासारखा वाटला. माझे चाळे पूर्ववत् सुरू झाले. मीं एक 'स्वाली' दोस्त गाठला, आणि सकाळ-संध्याकाळ जंगल भटकूं लागलों. येथलें आणि टांगानियाका सरोवराच्या आसमंतांतलें जंगल म्हणजे काय चीज आहे, याचें वर्णन करणें व्यर्थ आहे. इकडलीं जंगलें पाहिलेल्याला हिंदुस्थानांतील जंगलें म्हणजे केवळ उपवनासारखींच भासतील!

असेच आणखी थोडे दिवस गेले. आफ्रिकेंतल्या शिकारीच्या अथांग समुद्राच्या किनाऱ्यावर आपण केवळ कोरडे ठणठणीत राहणार, या कल्पनेनें माझें मन व्यग्र होऊन गेलें. इकडे स्थायिक झालेला, शिकारीचा शौकीन कोणी सहकारी मिळाल्यास पाहावा म्हणून मीं जंगजंग पछाडलें. पण यच्चयावत् हिंदवासीयांनीं आपल्या बापजाद्यांची कसम खाऊन अहिंसाव्रत घेतलें असल्यामुळें, मला कोणीहि सहकारी मिळूं शकला नाहीं.

माझ्या येथल्या या आप्तांजवळ रायफल होती खरी. पण तिचा उपयोग ते दसऱ्याच्या दिवशीं पूजा करण्यापलीकडे करीत नसत. वापरण्यांत नसल्यामुळें ती मेंचटून गेली होती. सतत महिनाभर मी तिची शुश्रूषा करीत होतों, तेव्हा कोठें ती तोंड टाकावयास लागली!

आतां एकाच गोष्टीकडे माझी लय लागली होती आणि तिच्या सिद्धयर्थ, एकाकी असा मी अहोरात्र आदबत होतों. लोक माझी महामूर्खांत गणना करीत होते, आणि त्यांच्याबद्दल हि माझ्या मनांत शब्दशः तीच भावना होती.

गोष्ट जरा कठीणच दिसली, परंतु पुन्हा प्रयत्न करून पाहण्याचें ठरविलें. गोपाळरावांना रायफलचा परवाना होता तोच, डिस्ट्रिक्ट कमिशनरांकडून दोघांच्याहि नांवांवर करून घ्यावयाचा होता. या जंगली भागांत बदली झाल्यामुळें, आणि त्यांतूनहि गोपाळरावांना मिळालेला छोटासा बंगला शहराबाहेर, जंगलाच्या लगत्याला जे थोडे बंगले आहेत त्यांपैकीं एक असल्यामुळें, लायसेन्स दोघांच्या नांवांवर घेण्यास ही वेळ योग्य होती.

माझ्या मार्गांत अनंत अडचणी होत्या, आणि मजसारख्या मध्यम स्थितींतल्या हिंदी माणसास त्या दसपटीनें जाणवत होत्या. जों जों अडचणी येत, तों तों माझ्या मनाचा निश्चय जास्तच दृढ होत होता आणि मी वाढत्या उत्साहानें प्रयत्न करीत होतों. शेवटीं मुंबासाच्या 'ऑस्लो ब्राउन्' कंपनीमार्फत शिकारीचा हंगामी परवाना आणि लायसेन्स माझ्या हातांत पडला, आणि आज महिनाभर करीत असलेल्या यातायातीचें सार्थक झाल्यासारखें मला वाटलें.

माहीतगार माणसांची येथें उणीव नव्हतीच. एखादा 'गाइड्' गाठला कीं तो माणसांची आणि इतर आवश्यक बाबींची तजवीज करी. किरकोळ माहितीहि त्याच्या मगदुराप्रमाणें आणि अकलेप्रमाणें तो पुरवीत असे. मला मिळालेला 'म्युलाटो' गाइड मोठा गमत्या प्राणी होता. त्याची आई झुलू होती आणि बाप कोणी तरी गोरा होता.

* * *

छोट्या एडवर्ड सरोवराच्या दक्षिण आणि पश्चिम बाजूंस अर्धचंद्राकार डोंगर होता आणि राहिलेल्या दोन बाजू खुल्या होत्या. उत्तर बाजूनें वन्य

श्वापदांचें पाण्यावर येण्याचें बारें होतें. बारीपासून अर्ध्या फर्लांगावर जरा उमाळ्याची जागा पाहून, तेथें साडेपांच हात लांब व साडेतीन हात रुंद असा चर खोदला. भोंवतालीं फूटभर उंचीची दगडांची चांगली बळकट वरवंडी घातली आणि तींत चांगले प्रशस्त झरोके राखले. चराच्या आंतल्या अंगानें हाफ्सट ( खोबण ) सोडून वर जाड जाड तक्ते बसवून दिले. खेळाची सज्जड तयारी झाली.

तो शनिवारचा दिवस होता. रात्रीं बरोबर नऊ वाजतां मी माझ्या सहा सहकाऱ्यांसह जंगलांत येऊन दाखल झालों. चरावर अंथरलेले तक्ते नीट 'टिपूटॉप्' बसविले आणि आम्ही सर्वजण आंत उतरलों.

चंद्र पश्चिमेकडे कलला होता. बारीकडे सारखी नजर रोखून रोखून माझे डोळे ताठून गेले होते. एकवार दोनहि हातांनीं मीं ते जोरानें चोळले आणि पुन्हा हुशार झालों.

अर्धा-पाऊण तास मध्यें गेला असेल. कोणत्या तरी श्वापदाचे डोळे दूरवर चमकूं लागले. असल्या चांदण्यांतहि ते हिरवेचार डोळे विलक्षण चमकत होते, आणि तेज जणूं ओसंडीतच जवळ जवळ येत होते. एवढा एकच क्षण, पण तो मला युगासारखा भासला. आतां तो विशाल आणि भरदार आयाळ असलेला जंगलचा स्वतंत्र राजा अंधुक अंधुक दिसूंहि लागला. एक वावभर आल्यावर तो जरा रोखल्यासारखा झाला आणि जमिनीला तोंड लावून तीन वेळां त्यानें गर्जना केली. जमीन जणूं फाटत असल्यासारखें मला त्या वेळीं वाटलें. आणखी त्यानें चार पवित्रे पुढें टाकले आणि शंकित झाल्यासारखा वर मान करून, कानोसा घेत तो पुन्हा उभा राहिला. "हीच संधि," असें मनाशीं मीं म्हटलें, आणि टांगानियाकाचे माजी मालक कायसर विल्यम् आणि सध्यांचे धनी सहावे जॉर्ज, या दोघांचींहि नांवें घेऊन मीं माझ्या रायफलीचा ट्रिगर ( घोडा ) खेचला.

रायफलला टॉर्च-क्लॅम्पची ( क्लॅम्पचा म्हणजे चापाचा एक भाग बॅरलला बसता करावयाचा आणि दुसऱ्यांत टॉर्च बसवावयाचा. प्रथम ट्रिगरजवळचा स्विच् खेचतांच सबंध बॅरल आणि माशी लखख दिसते.) योजना

होती, आणि रॉकेट् कार्ट्रिजिस् (शरिरांत गोळी घुसतेवेळीं प्रकाशणारीं काडतुसें) मीं या वेळीं वापरलीं होतीं.

जनावर लागलेलें, सूर्यप्रकाशांत दिसावें त्याप्रमाणें मला स्पष्ट दिसलें. बराबर गोळी आल्याचे दिशेनें किरण घेऊन, त्यानें झांजींतच नऊ-दहा हातांवर झेप टाकली आणि तो जमिनीवर सपशेल आडवा झाला. झटक्या-सरशीं डोक्यावरचा जड तक्ता सरकावला आणि उडी घेऊनच मी चराचे बाहेर पडलों. सावज पक्कें जाम झालें कीं नाहीं ही खात्री करून घेण्याकरितां, त्याच्या जवळ एक हातावर मीं पुन्हा आवाज टाकला. तशी खात्री होतांच मीं टॉर्च उजळला आणि त्याच्याजवळ गेलों.

क्षणमात्र तो क्षीणपणें मागले दोनहि पाय खुडीत होता. एकदा त्वेषानें त्यानें शेपूट जमिनीवर आसडली, मंदपणें आपला विक्राळ जबडा वासला आणि शेवटीं तो शांत झाला.

* * *

पृथ्वीनें आज सारा चंद्रप्रकाश जसा कांहीं लुटला होता. माझें मन आनंदानें उचंबळून राहिलें होतें. टांगानियाकाचा तो 'पशुपति' चौघा हॉटेंटॉटांच्या खांद्या'वर विराजमान होत्साता आमची साथ करीत होता. खालीं जमिनीवर जिकडेतिकडे सराट्यांचे वेल फैलावले होते, आणि त्यांचे सुकलेले सराटे पायांखालीं चुरत असतां चालण्याचीहि मोठी गंमत वाटत होती. वाटेंत एका हॉटेंटॉटांच्या वसतीजवळ कसला तरी उरूस भरला होता; आणि तन्निमित्त आपल्या कुळकुळीत उघड्या देहांवर चित्रविचित्र रंगांचे पट्टे ओढलेलीं हॉटेंटॉट नरनारी, डोकींवर पिसांचे तुरे बांधून, मोठ्या टेसांत, पण पद्धतशीर आणि शिस्तींत नाचत होतीं.

सह्याद्रि,
ऑगस्ट १९४३

---

# माझी आफ्रिकेंतील दुसरी शिकार : : २०

मला कोणी सहकारी मिळूं न शकल्यामुळें, 'गोमेनी'च्या जंगलांत रात्रीच्या वेळीं मीं एकट्यानेंच सिंहाची शिकार बारीवर बसून केली होती. नंतर जवळ जवळ महिनाभर मी नुसताच माशा मारीत बसलों होतों. तेथल्या निबिड जंगलांत, सावज उठवून खुली शिकार करणें म्हणजे तें अतिशय खर्चाचें– माझ्यासारख्याच्या आवांक्याबाहेरचें– काम होतें. पण माझ्या सुदैवानें याच वेळीं, मार्टिन् हंटिंग्टन् व डब्ल्यू. आर्मस्ट्रॉंग या नांवांचे दोन हौशी इंग्रज शिकारी आफ्रिकेंत केवळ शिकारीकरितांच आलेले होते आणि ते, कोणी तरी तद्देशीय शिकारी सहकारी मिळविण्याच्या तपासांत होते. मुंबासाच्या ऑस्लो ब्राउन कंपनीनें त्यांना इतर तद्विषयक माहिनीबरोबर माझ्याबद्दलचीहि माहिती व ठावठिकाणा दिला. थोड्याच दिवसांनीं त्यांनीं त्या कंपनीमार्फत मला बोलावणें केलें आणि त्यांची माझी मुलाखत तेथल्या 'हॉटेल-डी-मुंबासा'मध्यें झाली. हे दोघेहि इंग्रज गृहस्थ मला मोकळ्या मनाचे आणि सज्जन दिसले. त्यांनीं माझी एकंदर माहिती, आणि मीं हिंदुस्थानांत केलेल्या शिकारींची त्रोटक हकिकत विचारून घेतली. एक आठवड्याच्या आंतच 'आम्ही तुम्हांला काय तें कळवितों' असें म्हणून त्यांनीं माझ्या हातावर चाळीस शिलिंगांचा चेक, भाडेखर्चाकरितां म्हणून ठेविला. निरोप घेतांना मींहि त्यांना, 'एक शिकारी या नात्यानें, मला बरोबरीच्या दर्जानें वावरतां येण्यासारखें असेल तर, माझी खेळांत सहभागी होण्याची तयारी आहे,' असें नम्रपणानें सुचविलें. स्पोर्ट्स्मन्च्या खिलाडूवृत्तीनें त्यांनींहि स्मित करून माझें म्हणणें अगदीं रास्त असल्याचें दर्शविलें.

* * *

सरासरी दहाबारा दिवसांनीं त्यांच्याकडून मला पत्र आलें, आणि मी पुन्हा त्यांस त्यांच्या निवासस्थानीं जाऊन भेटलों. 'साहेब' असल्यामुळें,

त्यांची शिकारीची सर्व तयारी होण्यास फारसा वेळ लागला नाहीं. हत्तींच्या आणि सिंहांच्या शिकारीचा त्यांचा बेत ठरला होता; आणि तेथल्या एका तद्देशीय 'प्रिन्स'कडून त्यांनीं सिंहांच्या शिकारीसाठीं खास तयार केलेले दोन हत्ती, हौद्यासह (हौदा कसला तो! चोहोंकडून बार लाविलेला खोका), व रान उठविणारीं माणसें मिळविलीं होतीं.

शिकारीला निघण्यास अद्याप पांचसहा दिवसांचा अवधि होता म्हणून मी गोमेनीस परत आलों. शिकारीची मला दुसरी कांहींच तयारी करावयाची नव्हती. थोडेसे पैसे, रायफल, सिगारेटांचें एक टिन, सुपारी व कपडे एवढेंच मला बरोबर घ्यावयाचें होतें.

या गोऱ्या शिकाऱ्यांचें आणि माझें कितपत जमेल याबद्दल, प्रथम मी थोडासा साशंकच होतों. पण उगाच शंका काढीत न बसतां प्रत्यक्ष अनुभवच पाहण्याचें मीं ठरविलें आणि पांचवे दिवशीं मीं आपलें चंबूगवाळें घेऊन गोमेनीहून प्रयाण केलें.

थोरल्या 'एडवर्ड' सरोवराच्या आसपास हत्तींचे मोठमोठाले कळप आणि सिंहहि असून, झेब्रा, जिराफ वगैरे प्राणीहि विपुल असल्याचें कळल्यावरून तिकडेच शिकारीस जाण्याचें मुक्रर ठरलें. आम्ही सगळेच हत्ती, सिंह, यांसारख्या बड्या श्वापदांच्या शिकारीच्या कामांत अनभ्यस्त होतों यामुळें कसें होतें, काय होतें, अशी हुरहुर सर्वांसच लागून राहिली होती.

स्वारीचे हत्ती, रान उठविणारीं माणसें, गाइड आणि 'हॉटेल-डी-मुंबासा'-कडून मागून घेतलेला कुक वगैरे सर्व सरंजाम पुढें रवाना करून दिला होता, आणि जंगलाच्या पूर्व बाजूला असलेल्या 'हंटर्स माउंट' (शिकारी लोकांचें नेहमींचें जंगलांतील मुक्कामाचें ठिकाण) नांवाच्या टेपाडावर एक छोटासा तंबू व राहुट्या ठोकून आमच्या मुक्कामाची सर्व तरतूद झाली होती. आम्ही सर्वजण, एका भरींव टायरच्या लॉरींतून, मुक्कामाच्या जागीं जाऊन पोंहोचलों. वाटेनें जात असतां शहामृगांचा एक कळप आमच्या दृष्टीस पडला. आमची चाहूल लागतांच घोडयापेक्षां जास्त वेगानें तीं पसार झालेलीं पाहून आम्हांस फार मौज वाटली. तेथलें एकंदर वातावरण आणि शिकारीचा थाट पाहून माझें मन उत्साहानें भरून गेलें. माझ्याकरितां एक स्वतंत्र छोटीशी राहुटी

ठोकलेली होती, तेथें जाऊन मीं आपला बिस्तारा तेथें असलेल्या कॉटवर लावून दिला. रात्रीं मीं आपलें जेवणहि तेथेंच मागविलें आणि तोच क्रम मीं पुढेंहि ठेविला होता. मला आणि त्यांनाहि संकोच वाटूं नये म्हणून मीं ही खबरदारी घेतली होती. माझ्या टेबलावर 'स्टेट एक्सप्रेसचें' भरलेलें टिन आणि काडयांची पेटी पाहून, त्यांच्या त्या तत्पर दक्षतेचें मला आश्चर्य वाटलें व एकंदर बोलण्याचालण्यावरून मला प्रथम आलेल्या शंकेचें निराकरण झालें. जेवणहि उत्कृष्ट दर्जाचें होतें. जेवणें झाल्यावर बाहेर खुर्च्या टाकून उद्यांच्या कार्यक्रमाचा आराखडा तयार करीत आम्ही बसलों होतों. प्रथम हत्तींच्या शिकारीचा बेत झाल्यामुळें हत्ती पीलखान्यावरच ठेवून आम्हीं उजाडण्याच्या आंतच निघण्याचें ठरविलें. सकाळच्या वेळीं हत्ती अगदीं गहाळ असतात असें त्या लोकांच्या बोलण्यांत आलें. खेळासंबंधीं आणि जंगलाची एकंदर अवश्य ती माहिती गाइडकडून आणि त्या जंगली लोकांकडून करून घेतली आणि झोपीं गेलों.

सकाळीं लवकर उठून चहापान होतांच आम्ही सर्वजण निघालों. अजून पुरत्या क्षितिजावरहि न आलेल्या सूर्यनारायणाला, (कोणी न पाहील अशा बेतानें) मीं एकवार मनःपूर्वक नमस्कार केला, आणि पुरुष पुरुष उंच गवत असलेल्या त्या जंगलांत पुन्हा सिगरेट पिण्यास मिळणार नाहीं म्हणून दोन दोन सिगारेटा फुंकून आम्ही जलदानें मार्गक्रमण करावयास लागलों.

रानकाढे आणि टेहळे आपापल्या कामगिरीवर जिकडे तिकडे निघून गेले. आम्हां प्रत्येकाबरोबर एकेक 'शिकारी' आणि किरकोळ सामानसुमान वागविण्यास एकेक फालतूक माणूस होता. शिवाय दोघे फ्लॅग्ज़्मेन आमच्याबरोबर होते. फ्लॅग उंच उभारून, आम्हीं एका मोटमोठे टोळे असलेल्या माळावर सूचना मिळण्याची वाट पाहत बसलों. एकानें येऊन, दोन मध्यमसर छावे नाल्याचे बाजूनें निघून गेल्याची वर्दी दिली. परंतु एक फुटापेक्षां कमी लांबी असलेल्या सुळेवाल्या छाव्यांस मारण्याची सक्त मनाई असल्यामुळें, आम्ही 'बडया येगांची' कांहीं चाहूल लागण्याची वाट पाहत तेथेंच बसून राहिलों. सुमारें अर्ध्या-पाऊण घंट्यानें एकजण आमच्यापाशीं आला आणि मैल दीड मैलावर असलेल्या एका नाल्याच्या पलीकडे एक 'बडावाला' आढळल्याचें त्यानें

सांगितलें. निशाणवाल्यास तेथें ठेवून आम्ही सर्वजण तिकडे निघालों. माझी छाती सारखी धडधडूं लागली. एखादा मस्त हत्ती अंगावर चालून आल्यास आपली काय गत होईल या विचारानें मन कावरेंबावरें झालें. रायफलीवरून दोन-तीनदां हात फिरविल्यावर 'तशी पाळीच येणार नाहीं', असें वाटून पुन्हा धैर्याचा संचार मनांत झाला. अशा स्थितींत वाट चालत असतां, आमच्या बरोबरच्या वाटाड्यानें आम्हांस एका घायपाताच्या अरुंद पांदींतून थेट नाल्यापाशीं नेलें. तोंच वरच्या बाजूस सरासरी दोन फर्लांगांवर चरत असलेल्या एका गजेंद्राकडे आमची दृष्टि गेली आणि आम्हीं तिघांनींहि आमच्या रायफली त्या जगड्व्याळ प्राण्यावर रोखल्या. आम्हांस अनुभव नसल्यामुळें, कदाचित् जनावर जखमी होऊन निघून जाईल या भीतीनें आम्हीं असें केलें.

श्वास रोधून आम्हीं तिघांनींहि आपापल्या रायफलींचे ट्रिग्गर खेचले. तिन्ही गोळ्या त्याच्या त्या प्रचंड देहांत घुसल्या, त्यासरसा तो तीन-चार वेळां आपल्याभोंवतींच फिरला. त्यानें भयंकर चीत्कार केला. त्यानें अजगराप्रमाणें भासणारी आपली पुष्ट शुंडा उंच आकाशाकडे उभारली. व्याकुळ होऊन त्यानें आपले दोन्ही गुडघे जमिनीवर टेकले. भयंकर त्वेषानें आपले दोन्ही लांब लांब सुळे त्यानें जमिनींत खुपसले आणि धाडकन जमिनीवर अंग टाकून दिलें. एकाद्या प्रचंड वृक्षाच्या खोडाप्रमाणें दिसणारी त्याची गर्दन पार पिळवटून गेली होती, आणि त्याच्या वासलेल्या विशाल जबड्यांतून वाहिलेल्या रक्ताचें तेथें जणूं काय थारोळेंच बनलें होतें. तें भीषण दृश्य मला पाहवेना !

मीं आजपर्यंत, कैक हरणे, ससे, सायाळ यांसारख्या निरुपद्रवी प्राण्यांचीहि हत्या केली होती. पण त्याबद्दल मला चुकूनसुद्धां कधीं विषाद वाटला नाहीं. ऐश्वर्याचें केवळ प्रतीक असें तें अजस्र जनावर पुढें मरून पडलेलें पाहून आज मला पराकाष्ठेचें वाईट वाटलें. उद्वेगामुळें, शिकार साधल्याचा आनंद आणि समाधान मला या वेळीं लाभलें नाहीं. मन उदास होऊन गेलें, आणि पुनश्च हत्तीवर गोळी झाडावयाची नाहीं असा मीं मनाशीं निश्चय केला.

माझी ही मनःस्थिति त्या गोऱ्या दुक्कलीच्या लक्षांत आल्यावांचून राहिली

नाहीं. 'ऐनवेळीं कच खाण्याचा पौर्वात्यांचा स्वभाव-विशेषच आहे', असें म्हणून त्यांनीं मला हिणविण्यासहि कमी केलें नाहीं.

"पंचवीस वाघ मारल्यानेंहि मला बिलकुल घाम आला नसता; पण या वैभवशाली भव्य प्राण्यावर एक गोळी झाडतांच माझ्या हातांतलें अवसान पार निघून गेल्यासारखें झाल्याचें" मीं प्रांजलपणें कबूल केलें.

माझें चित्त थारीं यावें (मीं मूडमध्यें यावा) म्हणून, त्यांनीं माझी हसत हसत आणखी टिंगल केली. पण माझें मन पालटूं शकलें नाहीं.

सिंहाच्या शिकारीचा प्रोग्राम अद्याप पुढेंच होता. त्यांनीं "पौर्वात्य हिंदु" मनाच्या ठेवणीबद्दलचा केलेला कयास, दैवानें हात दिल्यास–चुकीचा होता हे त्यांना मला पटवून देतां येईल, असा विचार करून. मी या वेळीं अगदीं मूग गिळून होतों.

* * *

प्रखर ऊन्ह चटकत होतें. पोटांत भुकेनें आकान्त उडवून दिला होता. आमचीं तोंडें आणि हात कुसमुडें आणि गवताचीं कुसें लागून लागून हुळहुळे होऊन गेले. हंटिंग्टन्नें दुर्बिण डोळ्यांस लाविली. फ्लॅग दूरवर फड-फडत असलेलें त्याच्या नजरेस पडलें तेव्हां आम्ही जरा पाय उचलूनच तिकडे निघालों. थोडीशी विश्रांति घेऊन शिदोऱ्या सोडल्या तोंच, पाण्यावर निघालेल्या हत्तींचा एक कळप टेहळ्यांनीं पाहिल्याची वर्दी आली. घाईघाईनें आम्हीं चार घास पोटाला आहुति दिली; आणि पुन्हा जंगलाकडे मोर्चा फिरविला.

हत्तीवर आवाज न टाकण्याचें मीं ठरविलें खरें, पण मोठा कळप नजरेनें बघण्याची जिज्ञासा मला एके जागीं बसूं देईना. शिवाय तसल्या कृतीनें, अंगचुकारपणाचा आणि आडमुठेपणाचाहि दोष मला चिकटण्याचा संभव होता. मी त्यांच्याबरोबर गेलों, आणि निरुपाय झाल्यामुळें मलाहि त्या धुमाळींत थोडाफार भाग घेणें प्राप्त झालें.

तें उंच उंच गवत वारीत वाट काढतां काढतां आमचे हात रक्तबंबाळ झाले. घंटा सव्वा घंटा आम्ही वाट चालत होतों. इतक्यांत दूरवर, झुलत झुलत प्रशांतपणें जाणारा तो गजेंद्रांचा समुदाय पाहून माझे डोळे तृप्त झाले!

आमचीं माणसें जमा होईतों आम्ही तेथें खडे झालों. सगळ्यांची जमाजम झाल्यावर त्यांच्या विचारानें आम्हीं उजवीकडे वळसा घेऊन, त्या कळपाच्या पिछाडीला असलेल्या एका खोल नाल्याच्या कपारीचा आसरा घेतला, आणि त्या गोऱ्या दुकलीनें त्या कळपांतल्या एका पर्वतप्राय हत्तीवर शिस्त धरून लागोपाठ दोन फैरी झाडल्या.

एकाद्या ज्वालामुखीचा स्फोट होऊन त्यांतून काळ्याकभिन्न शलाका भूप्रदेशावर येऊन आदळल्या, का धरणीकंपानें धरणीवरल्या टेकड्या अंतराळांत उसळल्या, काय झालें तें मला समजेना!

आग्या माश्यांच्या मोहोळावर खडा फेकला असतां त्या जशा चवताळतात, तसे ते प्रचंड प्राणी चवताळून गेले.

त्या मतंगजांच्या शुंडांचीं अग्रें एकमेकांस भिडलीं, आणि आपण कानगोष्टी करितों त्याप्रमाणें, त्या वाचाहीन परंतु चतुरस्त्र प्राण्यांनीं परस्परांस कसला तरी इशारा केला!

झांज आल्यामुळें, आवाज खाल्लेला तो ऐरावत क्लांत होऊन जमिनीवर पसरला. त्याचे इतर भाईबंद क्षणमात्र तेथें घोटाळल्यासारखे झाले, आणि नंतर बेहोष झाल्याप्रमाणें समोर दिसेल त्याचा चक्काचूर करीत इतस्ततः ते भ्रमण करूं लागले. कवळ्यांतहि न मावतील एवढाले वृक्ष ते गदगदां हलवूं लागले, आणि त्यांच्या पसरलेल्या शाखा कडाकड मोडून त्या उंच अंतराळांत, पोरांनीं चेंडू फेंकावा त्याप्रमाणें भिरकावूं लागले. काहींनीं घायपाताचीं बेटेंच्या बेटें, एका हिसक्याबरोबर एक, याप्रमाणें उध्वस्त करून टाकिलीं. कोणी आपल्या सुळ्यांनीं माती उकरूं लागले, तर कोणी मोठमोठाले गोटे सोंडेंत धरून ते आम्ही छपून बसलेल्या दिशेनें वेगानें झोकून देऊं लागले. त्यांचें तें भीषण तांडव पाहून, प्रळयकाळ आजच आल्यासारखें आम्हांस वाटलें, आणि आमचीं अगदीं पांचांवर धारण बसली.

दिवस मावळला तरी त्यांचा धिंगाणा सारखा सुरूच होता. आतां काय करावें तेंच आम्हांस कळेना. कॅम्पावर जावयाचें तरी कसें? आमच्याजवळ दोन टॉर्च होते. पण ते उजळावयाची सोय नव्हती. प्रकाश पाहून, अगोदरच आमच्या अस्तित्वाच्या जाणिवेनें संशयग्रस्त झालेल्या त्या प्राण्यांनीं आमचा

चेंदामेंदा करून टाकला असता. आम्हीं तिघांनींहि हिय्या करून, वायबारांनीं त्यांना बुजवून त्यांची पांगापांग झाल्यास पाहावी म्हणून फडाफड आवाज काढावयास सुरुवात केली. तीं प्रमत्त जनावरें अधिकच खवळलीं, आणि आम्हीं असलेल्या दरडीच्या भोंवतीं भोंवतींच चक्रा घालूं लागलीं.

आतां आम्हीं जिवंत काडतुसें बंदुकींत भरलीं, आणि कांहीं एक विचार न करितां जिवाचें नांव अल्ला ठेवून— फैरीवर फैरी झाडूं लागलों.

बंदुकीच्या गोळीपुढें, केवढ्याहि बलाढ्य प्राण्याची ताकद व्यर्थ आहे एवढें खरें! जिवाच्या आशेनें ते प्राणी रान सोडून सैराटासारखे पळावयास लागले! थोड्याच वेळांत तेथें निश्चल शांतता पसरली, आणि इतका वेळ घोरपडीसारखे कपारीला चिकटून बसलेले आम्ही, चोरासारखे भीतिग्रस्त मनानें त्या खोल नाल्यांतून एकदांचे बाहेर पडलों. आम्हीं टॉर्च उजळला, आणि त्या जखमी होऊन पडलेल्या ऐरावताची काय वार्ता आहे ती पाहण्यास त्याच्यापाशीं गेलों.

त्याच्या कुडींतून निघून त्याचा प्राण पंचत्वास केव्हांच मिळून गेला होता!

* * *

सकाळीं जागे होऊन पाहतों तों, आमच्या कॅम्पावर तद्देशीय जंगली लोकांची मारे गर्दी होऊन राहिली आहे. आम्हीं मारिलेल्या हत्तींच्या मांसाकरितां ते आमची परवानगी विचारण्यास आलेले होते. हत्तीचें मास कोणी खात नाहींत अशी हिंदुस्थानांतल्या लोकाची समजूत आहे. पण तिकडले जंगली लोक काय खात नाहींत हाच प्रश्न आहे! त्यांना खावयास कांहींच न मिळाल्यास, ते एकमेकांस मारून खाण्यासहि कमी करणार नाहींत!

त्या मारलेल्या दोन्ही हत्तींचे दांत काढून आणून आमच्या कॅम्पावर पोंहोचविण्यास आम्हीं त्यांस सांगितलें, आणि त्या मानवी गिधाडांस हवी असलेली परवानगी त्यांस बहाल केली!

फुकटांत पदरांत पडलेला भलेपणा कोणास नको असतो?

* * *

एक दिवस पूर्ण विश्रांति घेऊन, आम्हीं उद्दंड सिंहाच्या शिकारीला निघण्याचा बेत मुक्रर ठरविला. सिंहाचा रहिवास विशेषेंकरून 'ब्लाउडब

व्हॅली'च्या भागांत होता. तें ठिकाण बरेंच दूर होतें. हरएक प्रकारची तरतूद करतां करतां आमचे नाकीं नऊ आले.

दुसऱ्या दिवशीं मोठ्या पहांटेस आम्ही उठलों. चहा वगैरे घेऊन, सह-कुटुंब सहपरिवार जंगलचा रस्ता सुधारला. मध्यान्हीच्या सुमारास आम्ही आमच्या इष्ट स्थलीं येऊन पोंहोचलों. वाटेनें आम्हांस एके ठिकाणीं जंगलांत चरत असलेले दोन हत्ती आढळले. पण त्यांचा मोह न धरतां दुरूनच वळसा घेऊन आम्ही पुढें निघून गेलों.

रानकाढे आपल्या कामगिरीवर गेले.

टेहळे आणि बाहुटेवाले ठिकठिकाणीं झाडांवरून चढून बसले, आणि आम्हींहि आपापल्या वाहनांवर आरूढ होऊन बसलों.

आज गाठ सिंहांशीं होती!

प्रत्येकाजवळ रायफल आणि डबल बॅरल् गन् जय्यत होती. प्रत्येकाच्या चेहऱ्यावर आज विशेष प्रकारचें गांभीर्य दिसत होतें. हंटिंग्टन् एका हत्तीवर आणि आर्मस्ट्रॉंग व मी दुसऱ्यावर, एकेक सशस्त्र मदतनीस घेऊन सावजाची वाट पाहत बसलों.

हाक्यांच्या आरोळ्यांनीं रान दुमदुमून गेलें. हंटिंग्टन् त्या सरोवराच्या उंच पाळीच्या आडोशाला जाऊन उभा राहिला, आणि आम्ही दोघे नाल्या-पलीकडच्या जरा आखूड आखूड गवत असलेल्या उतरणीवर दबा धरून बसलों.

साडेतीनचा सुमार झाला, पण सावज बाहेर पडण्याचें कांहीं लक्षण दिसेना. तशांतच हाक्यांच्या गलबल्यामुळें उठलेल्या डुकरांच्या एका खांडव्यावर आर्मस्ट्रॉंगनें, मी नको म्हणत असतांहि, दोन आवाज टाकले. आवाज ऐकून हंटिंग्टन् आमच्यापाशीं आला आणि पाहतों तों, सिंहांऐवजीं दोन डुकरें समोर मरून पडलीं आहेत!

आपल्या दोस्ताचा हा पोरकटपणा पाहून तो मनांत अगदीं चिडून गेला. पण करतो काय?

हीच चूक माझ्या हातून झाली असती तर त्यानें मला कच्चा खाल्ला असता!!

शिखळ पडूं लागण्याचा सुमार झाला, आणि त्याबरोबरच सावज बाहेर पडण्याचा संभवहि नाहींसा झाला. सर्वांची जमाजम झाल्यावर निराश मनानें आम्हीं कॅम्पावर जाण्याकरितां परतलों.

* * *

अंधारांतच आज आम्ही जंगलाची वाट चालूं लागलों, आणि दहा साडे-दहाच्या सुमारास खेळाच्या जागीं येऊन पोंहोचलों. हंटिंग्टन्नें आपल्या दोस्तास, कालच्या प्रकाराची पुनरावृत्ति न करण्याबद्दल जरा खडसावूनच सूचना दिली आणि आम्ही आपापल्या जागीं निघून गेलों. रोजचा खुलास-पणा आज आर्मस्ट्रॉंगच्या वागण्यांत दिसत नव्हता, आणि त्याचा चेहराहि थोडासा आठरल्यासारखाच झाला होता. कालच्या रात्रीं, त्या गोऱ्या दुकलीमध्यें झालेल्या गरम वादविवादांत याचें कारण सापडण्यासारखें होतें.

दीडच्या सुमारास एक पिलेंवाली सिंहीण उठल्याचा पुकारा झाला. डोळ्यांत तेल घालून, आम्ही या बारीवरून त्या बारीवर सारखे फिरत राहिलों. पण सावज आमच्या दृष्टीस पडलें नाहीं. आम्हांस बगल देऊन, दाट झुडपांनीं गजबजलेल्या एका लवणानें ती सायसंगीन निघून गेली.

तीन वाजण्याच्या सुमारास दोघे टेहळे आमच्यापाशीं येऊन दाखल झाले, आणि त्यांनीं आम्हांस, आम्ही असलेल्या बारीपासून एक मैलावर असलेल्या दुसऱ्या एका बारीवर नेऊन उभें केलें. दोन मोठीं जनावरें हललीं आहेत, म्हणून सावध राहण्याबद्दल त्यांनीं आम्हांस सूचना दिली आणि लगेच ते जंगलांत दिसेनासे झाले.

एकेक क्षण आम्हांस आतां युगासारखा भासूं लागला. घटकेंत दुर्बिण डोळ्यांवर धरावी, घटकेंत रायफल खवाटयास जोडून कोठें तरी शिस्त धरून पाहावी, काडतुसांचा पट्टा पुनःपुन्हा चाचपून पाहावा, अशी आमच्या जिवाची नुसती उलघाल होऊन राहिली होती.

त्या दोन्ही श्वापदांनीं जागा सोडली होती पण पुन्हा तुरमुंडी देऊन तीं दाट गचपणांत खुपसून बसलीं होतीं. रानकाढे उखळीचे आवाज काढीत धीमेपणानें रान सोडवीत चालले होते. इतक्यांत बाहुटेवाल्यांनीं पांढरीं निशाणें हलवून सावजें बाहेर भडाडल्याचा इशारा केला. श्वापदें परतून

फिरून माघारीं फिरूं नयेत म्हणून, वरच्या अंगानें हाके लोकांनीं एकच धेंगद उठवून दिली, आणि जंगलचे ते दोन्ही राजे आपल्या पूर्ण ऐश्वर्यानें तळपत एकामागें एक बाहेर पडले!

माहुतांनीं इशारा करण्याच्या अगोदरच हत्तींना त्यांच्या पिढीजात शत्रूचा वास लागला होता, आणि तेहि हलचलून गेले होते.

आम्हांस दुरून हेरून, आणि आम्हांवर आपली करडी नजर रोखून ते गजांतक क्षणभर थोपल्यासारखे झाले. जणूं काय, 'सरळ सरळ निघून जाण्यापुरती आमच्या हक्काची वाट आम्हांस तुम्हीं दिलीच पाहिजे', असा त्या नजरेंत भावार्थ सामावला होता!

निसटून जाण्यास अवसर न देतां, त्यांना चिमट्यांत धरून घेरण्याच्या इराद्यानें आम्हीं दोघे दोहों बाजूंनीं त्वरेनें निघालों, आणि त्या रणझुंजारांनींहि आमचें आव्हान स्वीकारून, जंगल दणाणून टाकणारी आणि प्राणिमात्राचा थरकाप उडविणारी प्रचंड गर्जना केली.

आम्ही नेटांत येतांच हल्ला चढविण्याच्या इराद्यानें ते दोघेहि वीर पवित्र्यांत उभे होते.

ज्या क्षणाची इतका वेळ आम्ही मोठ्या उत्सुकतेनें मार्गप्रतीक्षा करीत होतों तो क्षण येऊन ठेपला; आणि हंटिंग्टन्नें तात्काळ एकावर आवाज टाकून त्यास जागच्या जागीं ठार केलें. आर्मस्ट्राँगनेंहि घाचच्या घाबऱ्या त्याच्या दुसऱ्या जोडीदारावर आवाज टाकला. पण गोळी बराबर लागू न होतां, त्यास ओझरती चाटून गेली, आणि विद्युल्लतेच्या चपळाईनें तें खवळलेलें जनावर तीनचार झेपांतच आम्हांशीं येऊन भिडलें. त्याच्या डोळ्यांतून जणूं काय ठिणग्याच बाहेर पडत होत्या. एक उंच किरण घेऊन त्वेषानें तो आमच्या स्वारीच्या हत्तीच्या डाव्या कुशीवर चढून आला. साक्षात् मृत्यूच आम्हांपुढें येऊन उभा होता!

आर्मस्ट्राँगनें, 'मला प्रथम चान्स हवा', म्हटल्यावरून मी इतका वेळ तटस्थ होतों. पण आतां कालहरण करणें म्हणजे मृत्यूच्या दाढेंत आपण होऊन शिरण्यासारखें होतें. जिवावर उदार झालेल्या त्या पंचाननाचें उग्र स्वरूप पाहून, एवढा धिप्पाड गडी, पण तो हौद्याच्या पाठीमागल्या बारवर,

एखाद्यानें जोरानें ढकलून दिल्यासारखा जाऊन आदळला. आमचा ग्रास गिळण्याकरितां वासलेल्या त्या श्वापदाच्या जबड्यावर मीं आपली रायफल टेकली आणि ट्रिगर खेचला. त्याचा विशाल जबडा अक्षरशः दुभंग झाला, आणि अलगलेलें फळ झाडावरून गळून पडावें त्याप्रमाणें तो मागल्यामागें उलथून पडला!

हंटिंग्टननें अर्थसूचक नजरेनें आर्मस्ट्रॉंगकडे पाहिलें.

त्याचा चेहरा अगदीं पडून गेला होता!

वाङ्मयशोभा,
ऑगस्ट १९४२

---

# माझी आफ्रिकेंतील तिसरी शिकार : : २१

मार्टिन् हंटिंग्टन् आणि आर्म्स्ट्रॉंग या दुकलीचें आणि माझें आतां बरेंच सूत जमलें होतें, आणि माझें सहकार्य पुढल्या कार्यक्रमांतहि हवेंसें वाटण्याइतकी माझी लायकी त्यांच्या दृष्टोत्पत्तीस आली होती.

कीनियांत हरणांच्या आणि गेंड्यांच्या शिकारीकरितां जाण्याचा त्यांचा मानस होता. 'आमच्याबरोबर कीनियांत येण्याची तुमची मर्जी आहे काय?' अशी विचारणा त्यांचेकडून मला झाली होती, पण मी 'हिंदी' असल्यामुळें मला तेथल्या शिकारीच्या कार्यक्रमांत भाग घेतां येईल किंवा नाहीं हा प्रश्नच होता. शिवाय हिंदुस्थानांत हरणाची शिकार मीं जवळ जवळ अठरा वर्षें सतत करीत आलों असल्यानें मला त्यांत कांहीं नाविन्य आणि अर्थातच विशेषसें औत्सुक्य वाटत नव्हतें. पण गेंड्यांच्या शिकारीचें आमिष मला दिसल्याबरोबर माझ्या तोंडास पाणी सुटलें आणि 'कमिशनरांकडून तशी परवानगी मिळाल्यास, माझी येण्याची तयारी आहे' असें मीं हंटिंग्टन् यांस कळविलें.

'स्वतंत्र शिकारी' या नात्यानें, मला तेथला लायसेन्स लवकर मिळण्याचें लक्षण दिसेना, म्हणून थोड्या दिवसांकरितां मी हंटिंग्टन्‌चा नोकर बनलों. लायसेन्स फी भरून परवाना हातांत पडण्यास सरासरी एक पंधरवडा लोटला.

हत्तींच्या आणि गेंड्यांच्या शिकारीस लायसेन्स फी फारच जब्बर असते. शिकार चांगली साधल्यास, त्यांतील थोडीफार वसुली होते. स्थळ, काळ, मुदत वगैरे बंधनें कडक रीतीनें सांभाळावीं लागतात.

नैरोबीहून आम्ही मोटारीनें निघालों आणि आमच्या कॅम्पावर येऊन दाखल झालों. आमचा कॅम्प, 'टेबल लँड स्प्रींजिंग' आणि 'डेन् रिनॉसिरॉस' या दोन पठारांच्या दरम्यान एका लहानशा ओहोळाच्या कडेला पडला होता. हरणांच्या शिकारीस आणि गेंडयांच्या शिकारीस सोयीचें व्हावें अशा बेतानें शिकारी या ठिकाणींच बहुधा मुक्काम ठेवतात. रिफ्टच्या लगत्याच्या पठारावर फार करून गेंडयांचें वास्तव्य असतें, असें कळलें.

येथें येतांच आम्हीं, गेंडयांच्या शिकारीसाठीं कांहीं मसाई टेहळे आणि शिकारी ठरविले, आणि प्रथम दोन दिवस हरणांवर खेळून नंतर गेंडयांच्या शिकारीस निघण्याचा बेत केला.

इकडील हरणें, हिंदुस्थानांतील हरणांएवढींच, परंतु त्यांच्या सर्वांगावर सुशोभिवंत ताऱ्यांप्रमाणें ठिपके ठिपके असतात व रंगहि जरा जास्त पिवळसर असतो. बोडक्या ( माद्या ) व पाडस मारण्याची सक्त मनाई आहे. अवचुकून मारलें गेल्यास ठराविक दंड भरावा लागतो. हिंदुस्थानांतल्याप्रमाणें 'मुक्तद्वार' येथें नाहीं; आणि नाहीं तेंच बरें आहे.

लवकरच उठून चहा व थोडीशी न्याहारी घेतली आणि सिगारेट पिऊन आम्हीं 'फ्रीजिंग'च्या रोखानें निघालों. पांच-चार मैलांवर आलों तों, तेथें दुसरे कांहीं शिकारी खेळत असलेले दिसले. आम्हांस येथून आणखी बरेंच दूर जावें लागलें. अकरा सव्वाअकराच्या सुमारास आम्ही एका लवणाशीं आलों तों आम्हांस दूरवर कांहीं हरणें स्वस्थ रवंथ करीत बसलेलीं दिसलीं. जवळ जाण्यास आडोसा नव्हता, म्हणून आमच्या माणसांपैकीं तिघांचौघांस त्यांस आमच्यावर वळवून घालण्याकरितां रवाना केलें आणि आम्ही तेथेंच गवतांत मुरकुंड्या मारून बसलों.

आमच्या माणसांस त्या हरणांनीं लांबूनच हेरलें, आणि आमच्या बाजूसहि न वळतां तीं सरळ त्यांच्या अंगावरून निघून गेलीं. आम्ही जागच्या जागीं चुरमुरे खात बसलों !

पुन्हा आम्ही सर्वजण तीं हरणें गेलेल्या दिशेनें वाट चालूं लागलों. साडेचार वाजून गेले, पण आम्हांस हरणांचा ठावाठिकाणा कांहीं लागला नाहीं. अस्तमानाच्या आंत आम्हांस कँपावर जाणें भाग असल्यामुळें आम्ही आतां परत फिरलों. इतक्यांत एक मोठा हरणांचा खांडवाच्या खांडवा धावत धावत आम्हांस आडवा आला व आम्हीं तिघांनींहि त्यांतल्या तीन सरसशा काळ्यांवर आवाज टाकला. त्या खांडांतले दोन काळे जागचे जागीं पडले आणि बाकीचा खांडवा इतस्ततः उधळला. त्या मघांच्या शिकाऱ्यांनीं बुजविल्यामुळें किंवा त्यांचा आवाज खाऊन हा खांडवा अचानकपणें, आम्हांस आनंदविण्याकरितांच जणूं काय आमच्या दैवानें आमच्यापुढें आणून उभा केला होता !

आम्ही कॅम्पावर आलों तों दिवे लागणीचा सुमार झाला होता.

खाना घेतल्यावर, बाहेर खुर्च्या टाकून गेंड्यांच्या शिकारीसंबंधीं गप्पा करीत घटकाभर आम्ही बसलों होतों. वारा मंजुळ वहात होता. रातकिड्यांचा किर्र् आवाज साऱ्या पठारावर निनादून राहिला होता, आणि तेथला निबिड अंधःकार असंख्य काजव्यांच्या चमचमाटानें जास्तच भयानक भासत होता.

* * *

कालच्याप्रमाणेंच आज आम्ही लवकर उठून चहा ढोसून बाहेर पडलों. घटकाभर वाट चाललों असूं तों आम्हांस वाटेंत एक 'शिकारा' ( माळ ठिसकी म्हणून हरणांची एक जात असते त्यांतील नर. ) आढळला. आर्मस्ट्रॉंगनें लगेंच त्यावर गोळी चालविली आणि आज प्रातःकालींच आमची 'भवानी' तर झाली. त्यास कॅम्पावर रवाना करून देऊन आम्ही पुन्हा वाट चालूं लागलों. 'फोमिंग स्ट्रीम्' नांवाच्या एका प्रवाहाच्या किनाऱ्याकिनाऱ्यानें हरणांचे दाट कळप राहतात, असें कळल्यावरून आम्हीं तिकडे मोर्चा फिरविला व मध्यान्हीच्या सुमारास आम्ही तेथें जाऊन दाखल झालों. किंचित् विश्रांति घेऊन आणि एकेक सिगरेट पिऊन आम्ही आतां ताजेतवाने झालों होतों. हंटिंग्टन्नें दुर्बिण डोळ्यांस लाविली आणि तो सावजें कोठें दृष्टीस पडतात कीं काय म्हणून सभोंवार टेहळूं लागला. जवळपास सावजांचा मागमुद्दा लागेना. आम्ही त्या प्रवाहाच्या किनाऱ्याकिनाऱ्यानें तसेंच पुढें निघालों. तों, पाण्यावरून परत निघालेली हरणांची एक हरमळच्या हरमळ दूरवर आमच्या दृष्टीस पडली. त्या खांडांत सात-आठ सुंदर काळे होते. आम्ही थोडा वेळ तेथेंच बसून राहिलों. तीं हरणें कोठें तरी विसावतील असा आमचा अंदाज होता. तीं जरा दूर गेल्यावर आम्ही तिघे तिन्ही बाजूंनीं अतिशय सावधपणानें मुरत मुरत निघालों.

कशामुळें काय कीं, तो खांडवा आणखी थोडासा लांबलाच ! पुन्हा आम्ही तीं चरणावर नादावतील म्हणून वाट पाहत बसलों. निःशंकित होत्सातीं तीं खालीं तोंडें करून चरूं लागलीं, त्याबरोबर आम्ही हललों. वारा बिलकुल नसल्यामुळें आणि चांगली दडण असल्यामुळें आम्हांस अगदीं त्यांच्या नेटांत जातां आलें. खांडाजवळ जातांच, आम्हीं एकमेकांनीं चोकस बुद्धीनें एक-

मेकांची चाहूल घेतली आणि तत्काल आवाज टाकून त्या खांडांतील तीन काळे जागच्या जागीं पाडले.

दोन-तीन फर्लांग गेल्यावर, तो उधळलेला खांडवा पुन्हा आम्हांकडे रोखून पहात निश्चल उभा राहिला. त्या खांडव्यांतील हरणांचें लक्ष वेधून घेण्या· करितां आर्मस्ट्रॉंग व मी जागचे जागींच उभे राहिलों, आणि हंटिंग्टनला 'त्यांचे पिछाडीस जाऊन पुन्हा आवाज टाक,' म्हणून सूचना देण्याकरितां मी एक माणूस रवाना करून दिला.

* * *

आमच्या दैवाचे फांसे आम्हांस आज सारखे अनुकूल पडत होते. माझ्या सूचनेप्रमाणें हंटिंग्टन त्या खांडव्याच्या पिछाडीस गेला. आणि पुन्हा दोन आवाज टाकून त्या गहाळ पडलेल्या खांडव्यांतले दोन लांब शिंगांचे काळे त्यानें जमिनीवर लोळविले. आम्हांस आतां आणखी यातायात करण्याची जरूर राहिली नाहीं. शिकार पोटभर झाल्यामुळें आम्ही तावडतोब कॅम्पावर जाण्याकरितां परतलों.

अस्तमानाच्या सुमारास आम्ही कॅम्पावर येऊन दाखल झालों. ओहोळावर जाऊन स्नानें केलीं, आणि खाना तयार होईतोंपावेतों कॉफी झोकीत बाहेर गप्पा छाटीत बसलों. एक दिवस पूर्ण विश्रांति घेऊन दुसरे दिवशीं गेंड्यांचे शिकारीस निघण्याचा [illegible]रविला. उदईक रानांत जावयाचें नसल्यामुळें, खाना घेतल्यावर आम्ही पुनश्च बराच वेळ बाहेर बोलत बसलों होतों.

काळोख मिट्ट पडला होता. 'एडवर्ड' सरोवराच्या कांठावरल्या कुठल्या तरी बंदरांतले विद्युद्दीप दूरवर लुकलुकत होते, आणि वरचेवर होणारी कोल्हेकुई तेथल्या भयाण शांततेचा भंग करीत होती.

* * *

तांबडें फुटावयाच्या आधींच आमची मसाई पलटण आमच्या कॅम्पावर येऊन थडकली. त्यांच्यापैकीं कांहीं टेहळे आम्हीं पुढें रवाना करून दिले आणि चहा व न्याहारी घेऊन आम्हीहि त्यांचे पाठोपाठ जंगलाकडे निघालों. आजचा कार्यक्रम कसा काय पार पडतो याची विवंचना आमच्या सर्वांच्याच मनांत

ठाण मांडून बसली होती. गेंडा हा प्राणी आम्हीं पूर्वी झूऑलॉजिकल गार्डन्-मध्येंच पाहिलेला होता. हें श्वापद फारच मस्त आणि हेंगाडें पण भयंकर खुनशी असतें असें ऐकिवांत होतें. तें जंगलांत एकांडेंच वावरतें ही गोष्ट आम्हांस अनुकूल अशी होती. आवाज झाल्यावर तें जनावर जिवावर उदार होऊन, बंदुकींतून सुटलेल्या गोळ्यांची तम्मा न बाळगतां शिकाऱ्यावर बेजरबपणानें तुटून पडतें, असें आमच्याबरोबरच्या माणसांनीं आणि टेहळ्यांनीं सांगितल्यावर आम्हांस मोठाच पेंच पडला. असा प्रसंग येऊन ठेपल्यास, झाडावर चढून जीव बचावणें एवढाच एक मार्ग आम्हांस दिसत होता. पण माझ्या दोघांहि गोऱ्या सहकाऱ्यांस झाडावर चढण्याचा सराव नव्हता. शिवाय, या विशिष्ट प्रसंगीं आणि विशिष्ट स्थळीं झाड नसेलच तर ? 'कसें करावें, काय करावें,' असा आमच्या मनांत नुसता कोलाहल चालला होता. शेवटीं, बचावाचें दुसरें कांहीं साधन, आडोसा—आश्रयस्थान सापडला तरच श्वापदावर आवाज टाका-वयाचा, अशी तोड निघाली, आणि पुन्हा मोठ्या तडफेनें आम्ही मार्गक्रमण करावयास लागलों.

सूर्य माथ्यावर आला तरी आम्ही रान तुडवीत रानोमाळ भटकत होतों. आमची इष्ट वस्तु आमच्या नजरेंत येईना. टेहळ्यांकडूनहि सावजाबद्दल कांहीं बातमी लागेना. नाहीं म्हणावयास, दोन-तीन झेब्रा जातीचे प्राणी मात्र माळावरून दौडत गेलेले आमच्या दृष्टीस पडले. कंटाळून कंटाळून आम्ही एका बारीकशा प्रवाहाच्या कडेला विसांवा घेत बसलों होतों. सकाळची न्याहारी पार बेपत्ता झाली होती म्हणून पुन्हा थोडीशी पोटपूजा केली. थोड्या वेळानें दोघे-तिघे टेहळे आम्हांपाशीं आले, आणि त्यांनीं आम्हांस एक एकांडा 'ऱ्हिनो' हेरून ठेविल्याची वर्दी दिली. आम्ही तत्काळ उठून त्यांचेबरोबर निघालों. तें ठिकाण फारच दूर होतें. चांगली शिरवळ पडून गेली होती. त्या टेहळ्यांनीं, हेरलेल्या श्वापदावर नजर ठेवण्याकरितां दोघांस तेथें ठेविलें होतें. ते आम्हांस पाहून आमचेपाशीं आले, आणि त्यांनीं आम्हांस, जनावर थोड्या वेळापूर्वींच रिफ्टच्या बाजूस निघून गेल्याचें सांगितलें.

निराश मनानें आम्ही समळेजण परत फिरलों. वाटेंत, जखमी झालेला

एक लंगडा काळा, खांडांतून फुटून एकटाच अडचण जवळ करण्यास बघत होता. त्यास 'चोराच्या हातची लंगोटी' या न्यायानें पदरांत पाडून घेतला, आणि दिवस मावळण्याच्या सुमारास आम्ही कॅम्पावर येऊन दाखल झालों.

* * *

चांगला काळोख असतांच आज आम्हीं टेहळ्यांस जंगलांत रवाना करून दिलें. 'माणसास माणूस दिसूं लागलें नाहीं तोंच तुम्हीं ठिकाणावर जाऊन दाखल झालें पाहिजे, आणि श्वापदांचा तल्लास लावून आम्ही तेथें येतांच आम्हांस वर्दी दिली पाहिजे, तर तुम्हांस चांगली बक्षिसी देऊं' अशी आज्ञा आम्हीं त्यांस लावून ठेविली.

फटफटावयास लागतांच आम्हीं जंगलाची वाट धरली. आठ साडेआठ वाजण्याच्या सुमारास आम्ही 'फ्लाइट् ऑफ ॲरोज्' नांवाच्या एका दलदली-च्या आणि लव्हाळ्याच्या बेंदाडांनीं व्यापलेल्या टापूंत येऊन दाखल झालों.

'येथें श्वापद आढळलें तरी, आमची त्यावर आवाज टाकण्याची हिम्मत होणार नाहीं,' असें आम्हीं आमच्याबरोबरच्या माणसांस सांगितलें. या ठिकाणीं कांहीं भलाबुरा प्रसंग आल्यास पळ काढून जीव बचावणेंसुद्धां आम्हांस अशक्य होतें. श्वापदाच्या तडाक्यांत सापडण्याच्या धास्तीपेक्षां आम्हांस त्या दलदलींतच फसून मरण्याची धास्ती जास्त वाटली, आणि आम्हीं आमच्या माणसांस, आम्हांस दुसऱ्या एखाद्या सुरक्षित जागीं घेऊन चलण्याबद्दल सांगितलें.

दोघां इसमांस तेथेंच ठेवून, आम्हीं तीन साडेतीन मैलांची चक्कर खाऊन एका साचरीच्या रानांत येऊन पोंहचलों आणि तेथें कांहीं वर्दी मिळण्याची वाट पाहत स्वस्थ बसलों.

* * *

माथ्यावरला सूर्य पश्चिमेच्या बाजूला चांगला वावभर सरला होता. पाणी पिऊन पिऊन आमचीं पोटें फुगून गेलीं होतीं, तरी घशाची कोरड कमी पडत नव्हती. वाराहि कढत वाहत होता, आणि आमच्या रायफलींच्या नळ्यांना हातसुद्धां लावण्याची सोय उरली नव्हती. 'हुश्श' 'हुश्श' करीत आम्हीं एका

थोडक्या साबरीच्या वृक्षाखालीं बसलों होतों. इतक्यांत, घामाघूम झालेले पांचचहा टेहळे आमच्यापाशीं आले, आणि त्यांनीं दोन मोठाले ‘-हिनो’ हेरल्याची वर्दी आम्हांस दिली.

‘मघांच्या त्या दलदलीच्या आसपास श्वापदें असतील, तर आम्हांस त्यांचें कारण नाहीं,’ असें त्यांस आम्हीं सांगतांच, ‘त्याच्याहि पलीकडे दीड दोन मैलांवर असलेल्या एका पाणथळ ओशाडीला श्वापदें सावलींत अगदीं गहाळ उभीं आहेत, आणि अलीकडल्या अंगाला माळ असून थोडीशीं झाडेंझुडपेंहि आहेत,’ असें त्यांनीं सांगितलें. तत्क्षणीं आम्ही त्यांचेबरोबर निघालों. काय वाटेल तें करून, शिखळ पडण्याच्या आंत, आम्हांस तो जरा दूरचा टप्पा गाठावयास पाहिजेच होता.

आम्ही झपाझप रस्ता काटीत होतों. कावळ्यांचा एक थवा आमच्या पाठमोरा येऊन पुढें निघून गेला. ‘हा शुभ शकुन आहे,’ असें मी म्हणतांच, हंटिंग्टन् आणि आर्मस्ट्रॉंग् दोघेहि पोट धरधरून हसावयास लागले. हां हां म्हणतां आम्ही आमच्या इष्ट स्थलीं येऊन पोंहोचलों. तीं दोन्ही जनावरें पहिली जागा सोडून थोडींशीं दूर झुकलीं होतीं. ‘प्राण गेला तरी तीं दोन्ही जनावरें आज हातचीं जाऊं द्यायचीं नाहींत, आणि बंदुकींतलीं काडतुसें खलास होईपर्यंत बिलकुल दम घ्यावयाचा नाहीं’ असा मनाशीं निश्चय करून आम्हीं टोप्या काढून आमच्या माणसांपाशीं दिल्या, आणि अगदीं सरपटत झुडपांच्या आडोशानें जाऊन जमिनीवर सपशेल पालथे पडून एकामागें एक चार फैरी झाडल्या. रबरी फुग्यासारखीं फुगलेलीं तीं दोन्ही जनावरें चांगलींच जरषून गेलीं, आणि एका सुकलेल्या डबक्यापाशीं जाऊन डुकराप्रमाणें नाकाडानें धसाधस चिखल खंदाळूं लागलीं. कुलपी गोळ्याऐवजीं चिखलाचे घट्ट गोळेच तोफेंतून जणूं काय गोलंदाज चौफेर फेकीत होते! बेसुमार चिखल त्यांनीं दशदिशां उडविला, आणि एकदोनदां त्या चिखलांत सर्वांग घुसमळून पुन्हा ते उठून उभे राहिले. त्यांनीं अंग झटकल्याबरोबर, त्यांच्या अंगास लडबडलेला गाड्यावारी चिखल बदाबद खालीं पडला, आणि तो विलक्षण ध्वनि कानांवर पडून आमचीं अंगेंहि शहारल्यासारखीं झालीं. त्यांचें तें हेंगाडें आणि अकटोविकट लालित्य पाहून अशा वेळींहि आम्हांस हसूं येऊं लागलें.

चिखलानें त्यांचे डोळेसुद्धां पार माखून गेले होते. असल्या या गव्हार श्वापदांची, आमच्या बरोबरच्या माणसांनीं प्रथम आम्हांस निष्कारणच भीति घातली होती हें आतां आमच्या लक्षांत येऊन चुकलें. आम्ही तिघेहि उठून उभे राहिलों, आणि स्वस्थ मनानें पुन्हा दोन फैरी त्यांचेवर झाडल्या. एक फर्लांगभर ते प्राणी धुमाट पळत गेले, आणि धचाधच त्यांनीं धरणीवर आपले अवाढव्य देह टाकून दिले!

गेंड्याच्या चमड्यास आणि शिंगांस चांगली किंमत येत असल्यामुळें, तद्देशीय जंगली लोकांनीं रात्रींतून शिंगें लांबवूं नयेत म्हणून, आम्हीं चार इसम तेथें रखवालीस ठेवून दिले, आणि आम्ही कॅम्पावर जाण्यासाठीं परतलों.

* * *

सूर्यास्ताचा सुमार झाला होता. प्रमुदित मनानें आम्ही सावकाशपणें मार्ग आक्रमीत होतों. बक्षिसीच्या आशेनें आमचे मसाई सहकारीहि लंब्या लंब्या बाता झोकीत मोठ्या खुषींत वाट चालत होते. आणि आम्हांस भेडसावून प्रथम आमची उगाचच हवेलंडी उडवून दिल्याबद्दल 'बक्षिसीदाखल' या मूर्खांना, दोन दोन बुटाच्या ठोकरा लावाव्या कीं काय, हें कोडें सोडविण्याकरितां हंटिंग्टन्नें आम्हां दोघांपुढें टाकलें होतें.

* * *

सोपें म्हटल्यास सोपें, अन् अवघड मानल्यास अवघड असेंच कोडें होतें तें!!

सत्यकथा,
नोव्हेंबर १९४३

# पाणघोड्यांची शिकार : : २२

या श्वापदांची शिकार फार करून कोणी करीत नाहीं. या जातीचीं श्वापदें आफ्रिका आणि अमेरिका या दोनच खंडांत आढळतात. आफ्रिकेंत हीं श्वापदें अलीकडे फार पातळ झालीं आहेत. निर्मनुष्य अशा पाणथळीच्या ओसाड जागा आणि मोठमोठ्या डोह असलेल्या नद्या हीं या श्वापदांचीं आश्रयस्थानें आणि त्यांच्या निर्वाहाचीं साधनें दिवसानुदिवस मानवजातीच्या आक्रमणामुळें कमी कमी होत चाललीं आहेत, आणि जंगलहि तुटून हळूहळू जंगल खालच्या जमिनी लागवडीस येत चालल्या आहेत हेंच याचें कारण असावें असें वाटतें.

पाणघोड्यांच्या शिकारींत आणि रानडुकरांच्या शिकारींत विशेषसा फरक नाहीं. पण, डुकरें खोंतून हुसकून मैदानांत काढतां येतात, त्याप्रमाणें हीं श्वापदें मैदानांत निघत नसल्यामुळें डुकरांच्या शिकारीसारखा खेळ या शिकारींत होऊं शकत नाहीं, आणि त्यामुळेंच ही शिकार अगदीं नीरस—कंटाळवाणी वाटते. या शिकारींत माणसेंहि फार लागत नाहींत. मागांनीं जाणारीं आणि जनावरें हेरणारीं पांचसहा माणसें असलीं म्हणजे काम भागतें. हीं श्वापदें बहुतेक दलदलीच्या भागांत आणि नदीकिनाऱ्याला चिखलांत किंवा नदीच्या पात्रांत पण दाट अडचणींत जमावानें पडून राहतात. डुकरां-प्रमाणेंच ही जात कमालीची रगेल, मजबूत आणि हेंगाडी. डुक्कर लहान आणि हा प्राणी आकारमानानें प्रचंड. याचें मांस तद्देशीय नीग्रो मोठ्या आवडीनें खातात.

* * *

माझ्या ध्यानींमनींहि नसतां, अचानकपणें मला आफ्रिकेचा हा मुलूख पाहण्याची संधि मिळाली. ग्यांबिआच्या कमिशनर-ऑफिसकडून मागणी झाल्यावरून इकडील एक सिंधी इंजिनिअर मि. वीरचंदानी आणि कांहीं सर्व्हेअर्स असे तिकडील भागाची सर्व्हे करण्याकरितां निघण्याच्या तयारींत

होते. त्या पार्टीच्या प्रवास-पासांत दोन-तीन फालतूक नौकरमाणसें बरोबर घेण्याची सवड होती. प्रवासापुरता मी बनलों त्यांचा एक नौकर, आणि गोपाळरावांच्या रायफलीसह त्यांचेबरोबर निघालों. हे सिंधी इंजिनिअर आमच्या गोपाळरावांचे परमस्नेही होते.

* * *

ग्यांबिआ नदीच्या किनाऱ्याला अलीकडे पुष्कळ ठिकाणीं नीग्रो लोकांची वस्ती झालेली असून ते तेथें भातशेती करून राहतात. या नदीचा बराचसा भाग किर्र जंगलांतून जात असून याच भागांत रानरेडे आणि पाणघोडे ( हिपो ) वगैरे जंगली श्वापदें असतात. नदीमध्यें कोसकोस दोन दोन कोसांचे मोठमोठाले डोह असून, त्यांतून अनेक प्रचंड सुसरी वास्तव्य करून असतात. उन्हाच्या वेळीं कडेच्या वाळूवर त्या निर्भयपणें येऊन पसरलेल्या कित्येक वेळां नदीच्या पात्रांतून बोटीनें प्रवास करणाऱ्या प्रवाशांच्या नजरेस पडतात. मला वेळ घालविण्यास माझ्या आवडीचें दुसरें कांहीं साधन तेथें नसल्यामुळें, करमणुकीखातर आणि केवळ एक पर्याय म्हणून मीं या शिकारीचा बेत ठरविला. बिलकुल मेहनताना न घेतां, झालेली शिकार देण्याच्या करारावर ( नाहीं तरी मला त्या शिकारीचें काय करावयाचें होतें ! ) वाटतील तितकीं माणसें अल्पायासानेंच येथें मला मिळूं शकलीं. मग काय विचारतां ! जंगलांत डुकरेंहि विपुल आहेत असें त्या लोकांकडून कळलें. विशेष लक्षांत राहण्यासारखी एक गोष्ट मला येथें आढळली ती ही कीं, यांच्यांतल्या पुष्कळ जमाती धर्मानें मुसलमान असूनहि डुकराच्या मांसाकरितां त्या अगदीं प्राण कासावीस करतात !

डुकरें उठल्यास डुकरें, वेळीं जी बनेल ती शिकार साधून घ्यावयाची, असें मनाशीं ठरवून मी पुढल्या उद्योगास लागलों. दोन-तीन दिवस मीं जंगल भटकण्यांत आणि जंगलाची माहिती करून घेण्यांत घालविले, आणि एक दिवस पूर्ण विश्रांति घेऊन दुसऱ्या दिवशीं मी माझ्या निगर दोस्तांसह जंगलाचा रस्ता सुधारला.

* * *

जंगलांत सर्प वगैरेसारख्या जीवजीवाणूंचा मनस्वी उपद्रव असल्यामुळें,

पायांत गुडघ्यांइतक्या उंचीच्या चढविलेल्या बुटांचें मला एक ओझेंच होऊन राहिलें होतें. पण तें ओझें वागविण्याशिवाय गत्यंतरच नव्हतें. बराच वेळ जंगल तुडविल्यावर आम्हीं किर्र अशा जंगलाच्या अंतर्भागांत प्रवेश केला. भर दिवस असूनहि जिकडे तिकडे सूर्यास्ताच्या वेळेप्रमाणें दाट काळोख असल्यासारखा भासत होता. सवयीमुळें त्या लोकांस त्याचें कांहीं विशेष वाटत नव्हतें. पण मी मात्र मनांत दरारूनं गेलों होतों. अकस्मात् एखादें सावज उठून त्यानें आपणांवर चाल केली तर बंदूक हातांतल्या हातांत तरी राहील कीं नाहीं अशी मला खरोखर या वेळीं भ्रांत पडली. पण तसें बोलून दाखविण्याची अर्थातच सोय नव्हती. दैवावर हवाला ठेवून त्यांच्या पावलावर पाऊल टाकून मी चाललों होतों. आणखी बरेचसे आंत आंत आम्ही शिरलों. कुणी कुणाशीं एक शब्दहि आतां बोलत नव्हता. जवळपास कुठें तरी श्वापदाच्या अस्तित्वाचा वास या निगरांना लागला होता. मला मात्र काय घडत होतें त्याचाच उमज पडेना. असल्या श्वापदांच्या शिकारींत आणि असल्या जंगलांच्या बाबतींत मी पुरा अनभ्यस्त होतों. 'असंगाशीं संग अन् प्राणाशीं गाठ!' आज माझी पडल्यासारखी झाली होती. चालतां चालतां सगळे निगर एकदम खालीं मुरून गुडघ्यांवर बसले, आणि मलाहि त्यांनीं ती कवाईत करावयास लावली. दोन मिनिटेंहि पुरतीं झालीं नसतील, तोंच एकांत एक मिसळलेले अनेक कर्कश आवाज एक-समयावच्छेदेंकरून माझ्या कानांवर पडले! इतका भयंकर भेसूर शब्द मला वाटतें, जगांतल्या कोणत्याहि प्राण्याचा नसेल! किंचित् उसंत त्यांनीं घेतली, आणि बसून बसूनच त्या दाट गच्चपणांतून त्या आवाजाचे रोखानें ते निगर पुढें पुढें सरूं लागले. सवयीमुळें ते सरसरा सरत. पण माझी त्रेधा मात्र पुसूं नका. 'असें जावयाचें तरी किती?' माझ्या पिंढऱ्या भरून आल्या. 'किंचित् कळ काढा,' ते म्हणत. आणखी एक फर्लांगभर आम्ही अशा तऱ्हेनें गेलों असूं. आतां ते जरासे थबकल्यासारखे झाले. त्यांच्यापैकीं एकजण हलकेच उठून उभा राहिला. त्याला हवें होतें तें त्याला खचितच दिसलें होतें. पुन्हा तो खालीं बसला आणि बसत बसतच माझ्या अगदीं अंगाशीं येऊन भिडला. तो आणि मी दोघेहि सावधगिरीनें उठून उभे राहिलों. त्या उंच गवतावरून डोकें वर करून मीं पाहिलें. त्यानें मला जे दाखविले, ते सजीव

प्राणीच होते, कीं काळ्या खडकाचे ओबडधोबड सुळके उभे होते हें मला समजेना. मीं माझे दोन्ही डोळे एकवार जोरानें चोळले आणि पुन्हा नीट न्याहाळून पाहिलें. आतां माझी खात्री झाली. रायफल खोलून साही काडतुसें मीं पुन्हा मोजून भरलीं, आणि माशी पाहण्याचीहि कोशीस न करतां मी एका-मागें एक चार आवाज टाकले. त्या पर्वतप्राय प्राण्यांच्या पळापळींत कितीक झाडेंझुडें मोडलीं, कितीक दगडगोटे उलथेपालथे झाले, आणि जखमी झालेला तो प्रचंड 'हिपो' कुठें अंतर्धान पावला हें त्या वेळीं कुणालाच कळून आलें नाहीं.

*　　　*　　　*

दुसरे दिवशीं उजाडतांच आम्ही जंगलांत निघालों. आदले दिवशीं त्या प्रचंड हिपोवर आवाज टाकला होता, त्या जागेपासून धडक राजरस्त्यानें जावें त्याप्रमाणें आम्ही वाट चालत होतों. साऱ्या वाटेनें त्या हिपोच्या रक्ताचा नुसता सडा झाला होता. तेथून चार-पांच मैलांवर असलेल्या एका अडचणीच्या पाणथळ जागेंत, त्या प्रचंड हिपोचा निर्जीव देह माझ्या निगर दोस्तांच्या वाटेकडेच डोळे लावून थंडगार चिखलांत लवंडला होता!

'झंकार' दिपवाळी अंक,
ऑक्टोबर १९४३